पुढें वाळिची मूर्छना शांत जाली। रवी-सूनु ऊभा वरी दृष्टि गेली॥
बहूतां परी सुग्रिवा हीत सांगे। झळंबे मनीं लोभ तेणें प्रसंगें१३०
जगन्नाथ हा राम कारुण्यसिंधू। कृपाळूपणें भेटला दीनबंधू॥
महासूकृतें जोडले पाय तूझे। बहूतां परी आदरें साह्य कीजे१३१
कपी सर्व घेऊनि जा त्रीकुटासी। रघूनाथ मारील त्या रावणासी॥
सिते विश्वमातेसि आणूनि देई। तया ऊपरी तूं पुरीमाजि जाई॥
पुढें सर्वदा सख्य त्याशीं करावें। कदाही अणूमात्र रीती नसावें।
तुला थोर आधार हा जाण भावें। पुरीमाजि त्वां राज्य सूखें करावें
महा थोर हें राज्य किष्किंधपूरीं। असावें बहू विक्रमें नामधारी॥
परी पाहतां सर्वही तूज आहे।परी युक्तिनें बुद्धिनें नीति राहे१३४
अरे पद तें मंत्रिया अंगदाला। जसा मीं तसा तूंचि आहेसि त्याला॥
किती सांगणें तूं भला दक्ष आहे। बरी कीर्ति जे तेचि ते ऊरताहे॥

अती नीरवूं मीं तुला काय कीं तें।
असे मृत्यु त्याची तुवां पाळिजेतें।
प्रवृत्ती जनामाजि हे गोष्ट आहे।
परी सांगतों जीव माझा न राहे॥ १३६॥

पुढें अंगदा देखतां कंठ दाटे। बहूसाल नेत्रोदकें पूर लोटे।
प्रसंगीं महा मोह आला कपीसी। रुदे बोलतां अंगदा कूमरासी॥
अरे अंगदा अंतरीं फार होतें। मला देखतां राज्य देईन तूतें।
परी कल्पिलें हें कदाही घडेना। विधीसूत्र निर्माण हें लोटवेना॥

बहूतां परी बोलिला सुग्रिवासी।
मशीं साम्य रे मानि तूं आदरेंशीं।
महा सूकृतें जोडली रामसेवा।
अखंडीत हा भाव पायीं असावा॥ १३८॥

---

१ स्पर्शे. २ स्वाधीन करूं.

बहू शीकवीलें तया अंगदाला ।
पुढें लक्षिता जाहला राघवाला ।
ह्मणे धन्य हें भाग्य ती भेटि जाली ।
करूणास्वरें स्तुति ऊदंड केली ॥ १४० ॥
किती साधनें साधिती योगधारी । गिरीकंदरीं उग्रता पूर्णहारी ।
तयालागिं तूं किंचिती भेट देसी । नसे तूळणा आमुच्या सूकृतासी
महा पातकी घातकी थोर वाला ।
किती ब्रह्महत्या वदे कोण त्याला ।
अहल्या शिळा कष्टली त्वां वनांतीं ।
सदा सर्वदा तूज चिंतीत होती ॥ १४२ ॥
बहूतां दिनां दीन तूं उद्धरीसी । नसे तूळना आमुच्या सूकृतासी ।
असंख्यात नामें तया भेटलासी । नसे तूळणा आमुच्या सूकृतासी
वनामाजि भिल्ली महा भक्त होती ।
अखंडीत ते मानसीं पाय चिंती
उचिष्टें तरी सेविसी त्या फळांसी ।
नसे तूळणा आमुच्या सूकृतासी ॥ १४४ ॥
कळेना लिला राहिले वेद चारी । बहू शीणला वर्णितां सृष्टिधारी
अकस्मात पायींच धावूनि येसी । नसे तूळणा आमुच्या सूकृतासी
नसे अल्पही स्वल्पही पुण्य कांहीं । बहू चंड ऊदंड पाखंड देहीं ।
महा सूख अद्भूत वालीस देसी । नसे तूळणा आमुच्या सूकृतासी ॥
तुझें नाम हेंची महा पुण्य भासे । तुझे दर्शनें हेतु तो सर्व नासे ।
तुझे बाण या हृदयीं स्पर्शलासी । नसे तूळणा आमुच्या सूकृतासी
परी अल्प ही होय देहासि वेथा ।
कृपागरा सोडवावें समर्था ।

---

१ शेष.

तुझा बाण निर्वाण जाला न सोडी।
दयाळा तुझा तूंचि येऊनि काढीं॥ १४८ ॥

प्रसंगें वदे वाळि हा दैन्यवाणा। कृपाळूपणें ऊठिला रामराणा।
उरीं पाय देऊनियां बाण काढी। मुखीं रामनामेंचि तो प्राण सोडी
सुरांचा नभीं सर्व मेळा मिळाला। बहू तोष तो पुष्प-वर्षाव केला।
अनंदें बहू गर्जना रामनामें। बळें वाजली टाळिलें विघ्न रामें॥१५०
पुढें सर्व गंधर्व तेथं मिळाले। अकस्मात स्वर्गांगनीं नृत्य केलें।
मनोरम्य आरंभिलें गायनासी। अलापेंचि तो रोध सिंधूजळासी॥

दमामें बहू रंगसंगीतरंगें।
फणी तो भ्रमें ऊर्ध्व धांवे प्रसंगें।
स्वरांच्या स्वयें क्रोधल्या देवकोटी।
झणी जाणते त्या कळे स्वर्ग लोटी॥ १५२ ॥
पुढें नारदादीक कीतेक आले।
समस्तां मनें सूख ऊदंड जालें।
कथाभाग तो पाहिजे चालवीला।
प्रसंगें तया वाळिला मृत्यु आला॥ १५३ ॥

अती लोळकल्लोळ कोल्हाळ जालामहाशब्द नानापरी घोष जाला
बहू दुःख जालें तया सुग्रिवाला। कृपाळूपणें राम बोले तयाला॥
उभा राम निष्काम लावण्यखाणी। मुनी देव गंधर्व गाती पुराणीं।
धनुष्यासि टेंकोनियां वाम बाहे। कृपाळूपणें सुग्रिवाळागें बाहे॥

विचारें अवीचार कां प्राप्त जाला।
उजेडासि अंधार जिंकोनि आला
महाज्ञानिया तो भवीं बूडवीला। असें दीसतें भासतें या मनाला॥
सुबुद्धा तुवां शीघ्र आतां उठावें। विधीयुक्त तें कर्म सर्वें करावें।
बहू शोक केल्या पुढें काय आहे। जनीं जाणता तूं विचारूनि पाहें

१ मोठा नगारा.

असंभाव्य दुःखानळें प्राण फुटे । प्रभू बोलतां वीर तत्काळ ऊठे
रवीसूनुच्या बोलिले हृदयासी । विधीयुक्त आरंभिलें या विधीसीं
महा पाप त्या नाम घेतां न राहे । असा राम विश्राम दृष्टीस पाहें ।
देहवेशघातासि संपादियेलें । यथासांग जें कर्म तें सांग केलें ॥१९
पुढें रामभेटी कपीराज गेले । उभे हात जोडूनि ऊदीत ठेले ।
रघूनायकें सुग्रिवा बैसवीलें । प्रधानाप्रती आदरें वाक्य बोले ॥
तुह्मीं सर्व तत्काळ पूरीसि जावें । कपीलागिं भद्रासनीं बेसवावें ।
प्रधानीं तिहीं रामआज्ञे प्रमाणें । महावीर सुग्रीव नेला स्फुराणें ॥
समस्तीं विधीयुक्त तो पट्ट दीला । कपीराज भद्रासनीं बैसवीला
रघूनाथनामेंचि निर्घोष केला । निशाणीं बहू वाद्यकल्लोळ जाला
कपी अंगदा-लागिं प्राधान्य दीलें । समस्तां मनीं सूख उदंड जालें
पुरी सर्वशृंगारमंडीत केली । रघूनाथनामें गुढी ऊभवीली॥१६३॥
प्रधानासि घेऊनि ये रामभेटी । त्वरें चालिला जाहली थोर दाटी ।
पुढें राम संनीध येऊनि ऊभा । वदे राम लक्षूनि कंदर्पगाभा ॥१६४
समर्था तुवां दीनउद्धार केले । तयेंचीं प्रमाणें कृताकृत्य जालें ।
मनीं वाटतें हें जरी भक्तिभावें । दयाळा यथायुक्ति तूला पुजावें ॥
अनूपम्य तो राम मंजूळवाणी । कृपाळूपणें बोलिला चापपाणी ।
व्रतस्थीं अह्मीं पट्टणातें न यावें । सदा दंडकारण्यवासी फिरावें१६६
कपींद्रा तुवां शीघ्र पूरीस जावें । चतुर्मास पर्यंत सर्व्वां क्रमावें ॥
अह्मी या ऋषीपर्वतीं निश्चयेंशीं । प्रजन्यासि जातांचि यावें त्वरेंशीं
रघुनायका सव्य घेऊनि वेगीं । नमस्कार साष्टांग केला प्रसंगीं ॥
कपीराज गेला निरोपें पुरीसी। रघुराज सौमित्र आरण्यवासी१६८
बहू सूख जालें तया सुग्रिवासी । पुरी आणि तारा दिली आपणासी ।
प्रभू थोर सामर्थ्य याचें कळेना । श्रुती भांडतां त्यां कदा आकळेना
चतुर्मास गेल्या कपी रीस येती । शिळासेतु बांधोनि लंकेसि जाती ।

---



१ उत्साहानें.

दशग्रीव मारूनि तेतीस कोडी। रघूराज हा आदरें देव सोडी १७०
दिनानाथ हा दीनचिंता पहातो। जनीं भक्तिभावार्थ हाही पहा तो
मनीं दृढता भक्ति केली जयानें। स्वयें घेतलें जन्म सर्वोत्तमानें॥
दहाही बरे वेश सर्वोत्तमाचे। पहील्या प्रसंगींच शंखासुराचे।
दुजा कूर्मरूपें धरी भारधारी। तिजाही तसा दाढ देऊनि वारी।
चतुर्थामध्यें भक्त प्रल्हाद पाहें। धरी खुजटु पंचमामाजि देहे।
पुढें साहव्यामाजि क्षत्रीय नाहीं। दिलें राज्य विप्रासि सर्वत्र कांहीं॥
बळें सप्तमामाजि तो देव सोडी। पुढें अष्टमा कंस झाडूनि पाडी।
प्रसंगीं असे बौद्ध मौनावतारी। कलंकी मलेंच्छासि होतांचि मारी॥
दहा सार अवतार सर्वोत्तमाचे। तयांमाजि दोनी प्रसिद्धीस साचे।
क्रिडा आठव्यामाजि गोपाळपाळीं। रघूराज हा वानरीं रीसमेळीं॥
असे भिन्न नामें परी भक्त त्याचा। चिरंजीव हा दास विख्यात ज्याचा
कळेना मला अल्पही बुद्धि नाहीं। दयाळा कृपाळा कृपादृष्टि पाहीं॥
बहूसाल विस्तारली कीर्ति तूझी। कळेना बळें आकळे वाणि माझी॥
परी राहवेनाचि मी दीन तूझें। किजे हो क्षमा अल्प अन्याय माझे॥
किती पीडिलें वाळिनें सुग्रिवासी। बहूतां परी राज्य दीलें तयासी।
कृपाळूपणें पावला राम तेथें। दिलें राज्य कांता तयाची तयातें॥
अशी हे कथा ऐकतां सर्वभावें। तयाला रघूनाथ तत्काळ पावे।
पुढेंही कदा दुःख होणार नाहीं। सदा छंद आनंद ऊदंड देहीं १७२॥
बहू पाप-तापासि हें नाम वारी। हरा मानसीं गुंज जें सौख्यकारी।
म्हणोनी कथा राघवाची करावी। सदा सर्वदा सृष्टि सूखीं भरावी॥
सदा सर्वदा यकयेकाचि श्लोकीं। अरे ऐकतां होइजे धन्य लोकीं।
नसे हो नसे जन्ममाळा तयाला। पुढें संतसंगेंचि तो मुक्त जाला ८१

॥ इति श्रीरामदासकृत किष्किंधाकांड समाप्त॥



१ समूहीं. २ शंकराच्या.

## सुंदरकांड.

नमूं सर्वकर्त्ताचि तो विश्वभर्ता। गुणी शोकहर्ताचि हर्ता विवर्ता।
परेहूनि पर्ताचि पर्त्ता विवर्त्ता। भुतें भूतधर्ताचि धर्ता उधर्त्ता[1] ॥१॥
महीमंडळींचे कपीरीसराजे। तयांमध्यभागीं महावीर माजे।
महारुद्र आज्ञेप्रमाणें निघाला। सिताशुद्धि आणावया सिद्ध जाला

सवें मंडळी चालिल्या वानरांच्या।
नभोमंडळामाजि फौजा विरांच्या।
गिरीकंदरें देश नानापरीचे।
तटाकें नद्या ओघ जाती नदीचे ॥ ३ ॥
पुरें पट्टणें अट्टणें धुंडिताती।
कपी वीर दाही दिशा हिंडताती।
सिता शोधितां शुद्धि कोठें न लागे।
बळें धुंडितां ते विरें वीरु भागे ॥ ४ ॥

वनें भुवनें रम्य नानापरीचीं। बरीं शोधिलीं तीं गिरीकंदरींचीं।
दरे शृंग पाठार मैदान दारी। कपाटें गव्या वीवरें तीं भुयेरीं ॥५॥

कपी शोधितां शोधितां सुस्त जाले।
नव्हे कार्य तें दैन्यवाणे मिळाले।
समुद्रातिरीं ते उदासीन जाती।
गळाल्या तनू थोर उद्वेग चित्तीं ॥ ६ ॥

कपी बोलती काय आतां करावें। न लागे सिताशुद्धि तेव्हां मरावें।
ह्मणे मारुती वीर हो स्थीर बैसा। तिन्ही लोक पाहून येतां तमासा
भयासूर तो भीम सिंधू उडाला। त्रिकूटाचळाहून पैलाड गेला।
पुढें सर्वही पाणजंजाळ पाहे। हनूमंत विस्मीत होऊनि राहे ॥ ८ ॥
समुद्रामधें भेटला तो अतीतू। ह्मणे रे अरे रे अरे कोण रे तूं।
हनूमंत घाली नमस्कार त्याला। मनामाजि तो थोर संतुष्ट जाला

---

१ उद्धरणारा. २ फिरण्यानें.

मुनी तो त्रिकूटाचळीं शुद्धि सांगे। किराणें उडे तो कपी वीर मागें
अकल्पीत लंकापुरी कांचनाची ।पुढें देखिली सौख्यदाती मनाची
गुढ्या गोपुरें देउळें तीं अपारें। हुडे कोट जाळांधरें थोरथोरें।
सुवर्णाचळामाजि तें तेज फांके। तया पाहतां कीरणीं दृष्टि झांके
कपाटें लोहो अर्गळा पंथ मोठे। वळी बैसले थोर आश्चर्य वाटे।
बहूसाल वाद्यें दडाडां धडाडां। खुसीहाल आवाज होती भडाडां
पुढें पाहतां जावया रीग नाहीं। न सूचे मनीं मानसीं यत्न कांहीं।
पुढें भीम तो अंतराळें उडाला। लघूरूप लंकेंत होऊनि गेला ॥१२
गृहां गोपुरांचा बहू दाट खेटा। सदा सर्वदां वाहती सर्व वाटा।
बिदी हाट बाजार कुंचे दुकानें। सदा मस्त ते हस्ति जाती गुमानें

सिलेभार सज्जांत ते राउतांचे।
बरे फार संगीत होती विरांचे।
दिसेना तयांलागि झुंजार कोणी।
बळें जिंकिले पीडिले लोक तीन्ही॥ १९ ॥

बहू सज्ज तें राज्य लंकापुरीचें। पुरीमाजि तें सैन्य मोठ्या बळाचें
उफाळेंचि जाती भुजा फुर्फुरीती। तयां देखतां देव ते थर्थरीती।

त्रिकूटाचळीं ख्याति केली भिमानें।
लघूरूप तो हिंडताहे धिरानें
गृहें गोपुरें पाहिल्या धर्मशाळा।
अकस्मात त्या देखिल्या बंदिशाळा॥ १७॥

हिनासारिखे देव ते दीन झाले। नसे शक्ति ना युक्ति पोटीं गळाले
भयाभीत ते कांपती दीनवाणे। बहू गांजिले दुःख तें कोण जाणे।
सुरांकारणें कोप भीमासि आला।मनामाजि आवेश तो थर्थरीला
रूपें भर्भरीला तमें गर्गरीला। प्रसंगीं तये मारुती गुप्त जाला॥१९

मनामाजि आवांकिलें सर्व कांहीं।

---

१ उडणें.

सिमा सांडिली तूळणा त्यासि नाहीं।
बहू मातले गर्व मोठ्या बळाचा।
तयां झोडितों दास मी राघवाचा॥ २०॥

त्रिकूटाचळीं ख्याति केली भिमानें। पुढें पत्रिका धाडिली ब्रह्मयानें
तिये वाचितां वाचितां राम हांसे। क्रिडाकौतुकें अंतरा माजि तोषे
नेटें नाटकू श्रीकुटामाजि कैसा। महा कांड सुंदर्य जाला तमासा।
देह आपुलें सर्वही गुप्त केलें। प्रसंगीं तयें पुच्छ तें वाढवीलें॥२१॥
बहू व्यापिली वेढिली सर्व लंका कितेकां मनीं वाटली थोर शंका।
गृहांतूनि अंतर्गृहीं पुच्छ घाली। बहू पाडितां फोडितां हांक जाली
बळें लांगुलें रूधिल्या सर्व वाटा। बहू तुंबला लोक तो दाट खेटा।
तयाभोंवतें पुच्छ बांधोनि भारें। नभीं पोकळीमाजि नेटें उभारे॥
बहू भार ते स्वार मध्येंचि खंडी। महामस्त ते हस्ति नेटें उलंडी।
गुरें शाकटें राक्षसालागिं पाडी। पदीं पुच्छ बांधोनि पाडी पछाडी
पडों लागले दैत्य नेटें बदादां। कितीएक ते दीर्घदेही भदादां।
बळाचीं दळें पाडिलीं पुच्छभारें दिसेना परी गर्जतो भूभुकारें २६
धरी पंथ कोण्हासही जाऊं देना। पुरीमाजि पाणी कदां येउं देना।
चुली पेटल्या वन्हि तेथें विदारी। बळी धांवती त्यांसि तेथेंचि मारी
गळे पाय बांधी। किती हात बांधे। पुरीमाजि हाकेस ते हांक सांदे
महावीर चौताळले ते धरेना। बळें वावरे पुच्छ तें आवरेना॥२८॥

जना ओढितां पाडितां आपटीतां।
समस्तां जनांलागिं पाडूनि जातां।
पशू राक्षसीं सर्वही हाक केली।
कितीएक तीं चिर्डचिर्डोनि मेलीं॥ २९॥

कितीएक तीं राक्षसें हाकलीतीं। कितीएक तीं राक्षसें वोंबलीतीं।
कितीएक तीं थोर जालीं रुदंतीं। कितीएक तीं राक्षसें चर्फडीतीं।

---

१ अडविल्या.

असंभाव्य तें पुच्छ झाडी उलंडी।
कडाफोडि होतांचि येतांचि झोडी।
पुरीमाजि सर्वांसही आट केला।
विरें वीर राक्षेस सर्वे बुडाला ॥ ३१ ॥

नसे अन्नपाणी मुखामाजि घाणी। कितीएक ते जाहले दैन्यवाणी।
पुरीमाजि नानापरी घोळ केला। पुढें अस्तमानासि तो दीन गेला।
उदासें घरें मंदिरें थोरथोरें। महापुच्छ तें वावरे अंधकारें।
भुजंगापरी सर्व वेंटाळिताहे। विरें वीर चाकाटला सर्व पाहे ॥ ३२ ॥
मुलां लेंकुरांमाजि तें खेळताहे। निजेल्यांमधें पुच्छ तें लोळताहे।
कुमारीकुमारां गळां हार घाली। भयाभीत अंतःपुरीं हांक जाली।
त्रिकूटाचळीं सर्व ऊदंड आले। भयाभीत ते सर्वही लोक जाले।
कळेना बरें सर्प कीं काय आहे। करी तें महामार त्याचा न साहे।
अकस्मात तें काय होतें कळेना। कळेना वळेना कदा आकळेना।
सभेमाजि रायापुढें हाक गेली। अहो पाहतां काय लंका बुडाली।
उगा लोळसा घोळ मोटा करीतो। कराकूनि बांधोनि सर्वां धरीतो।
बहूतांपरी सांगती रावणाला। बहूतांजणांचा घरीं कोंड झाला।

नव्हे जी नव्हे सर्व सामान्य मातू।
महाघोर हा थोरला पुच्छकेतू।
सभामंडपीं कोप रायासि आला।
ह्मणे सांगती त्यास मारून घाला ॥ ३८ ॥

तया मारितां पुच्छ तेथेंचि आलें। सभामंडपामाजि नेटें निघालें।
दिवे पाडिले दीवटे आपटीले। अकस्मात हीलाल हीरोनि नेले।
मुखें बोलती दीप रे दीप आणा। दिवे आणितां मूकती दैत्य प्राणा।
असंभाव्य त्या दीवट्या दीपथावे। बळें लागवेगें समूदाय धांवे।
पुन्हा मागुती दीप घेऊनि आले। बळें धांवतां पुच्छमारे विझाले।

१ विस्मित झाला. २ दीपसमूह.

तया लांगुलें रुंधिलीं सर्व दारें। कपी वीर तो वावरे अंधकारें॥४१
सभामंडपीं गुदगुल्या तो करीतो। मुखें नासिकें कर्ण छेदून नेतो।
बळें गाल सर्वांगहीं वर्बडीतो। चिरें फाडितो ओढितो गुर्गुरीतो।
बळाचे महावीर तेथें मिळाले। परी अंधकारेंचि कांहीं न चाले।
किती लोटिले कूटिले चूर केले। भयाभीत कोणास कोणी न बोले।
कपी वीर तो थोर लाहान होतो। धरीतां बळें हात मोडोनि जातो।
बुक्या मारितो पांपरा वज्रथापा। असंभाव्य तो कोपला राव कोपा।
ह्मणे वीर हो काय रे काय झालें। कळेना मुखें बोलती काय आलें।
भयासूर तें गुर्गरीतें कळेना। करूं काय आह्मांसि तें आकळेना।
कपी वीर रायाकडे शीघ्र गेला। बळें थाप मारून मूगूट नेला।
वरे ठोंसरे मारिले रावणाला। ह्मणे मारितों रे तुझ्या आस्वयाला।
चिरें सुंदरें फाडिलीं रावणाचीं। करी भूषणें चूर मुक्ताफळांचीं।
कपीनें सभा सर्वही नग्न केली। त्रिकूटाचळीं ख्याति ऊदंड जाली।
हाहाकार जाला सभेमाजि मोठा। बळें मारुती मारिताहे चपेटा।
सभामंडपीं फार आकांत झाला। कपीनें पुढें मोकळा मार्ग केला।

लपाला कपी पुच्छ ओढूनि नेलें।
लघू मश्यकाचे परी रूप केलें।
असंभाव्य त्या दीवट्या चंद्रज्योती।
असंख्यात राक्षस धांवूनि येती॥ ४९॥

सभामंडपामाजि धांवोनि आले। तेणें नागवे लोक लज्जीत जाले
महावीर मागें पुढें हात देती। कपीनें बहूसाळ केली फजीती।

सभामंडपीं वस्त्र कोठें दिसेना।
भुतासारिखे नागवे लोक नाना।
चिरें आणिलीं नेसले स्वस्थ झाले।
मनोमाजि लज्जीत कोणी न बोले॥ ५१॥

---

१ लाथ.

कपीवीर तेथूनि वेगें उडाला। अशोकावनामाजिं वृक्षीं दडाला।
अधोमुख तो जानकीलागिं पाहे। कपी राममुद्रा पुढें टाकिताहे।
सितेनें पुढें मुद्रिका ओळखीली। बहूतांपरी शब्द कारुण्यबोली
पुढें मारुती भेटला जानकीला। समाचार सांगोनि आनंद केला
क्षुधाक्रांत मी जाहलों फार माते। तनू चालतां चांचरी सर्व जाते
बहूतांपरी बोलिला जानकीला। समाचार सांगोनि आनंद केला
अशोकीं बहू लागले वृक्ष नाना। पहातां असंख्यात संख्या असेना
नव्हाटें जुनाटें वनें दाट थाटें। वनें मोडितां जाहला कडकडाटें५९
फळें भक्षिलीं सर्व नाना परीचीं। बहू स्वाद वर्णूं कळाकूसरीचीं।
कपी वीर तो तृप्त जाला निवाला। पुढें वृक्ष मोडावया सिद्ध जाला
तरू मोडिले पाडिले ऊपटीले। किती झोडिले झाडिले चूर केले।
गिरीसारिखे ढीग सांडूनि टाकी। तयाला असंभाव्य राक्षेस हांकी।
वनें मोडितां मोडितां हांक जाली। कितीएक ते दैत्यमांदी मिळाली
गलोला कमाना करीं भिंडमाळा। बळें हांकितां नाद गेला भुगोळा।
बहुता बळाचे बहू लोक आले। कितीएक ते धिंग मोठे मिळाले।
वनें वेढिलीं धांवले काळ जैसे। भुतां खेचरां थोर कल्पांत भासे ॥
कपी वीर चोताळला वेग केला। कितीएक राक्षेस भंगोनि गेला।
त्रिकूटाचळीं रावणा जाणवीलें। वनीं वानरें थोर अद्भुत केलें॥६०॥
बळें धांविन्ला कुमरु रावणाचा। सदा अक्षयी वीर मोठ्या बळाचा।
असंभाव्य राक्षेस धांवोनि आले। कपीलागिं मारावया सिद्ध जाले॥
बळें आगळा आखया लक्ष भेदी। चुकावी कपी वीर लागोंच नेदी।
बहू भागले मारितां भग्न जाले। कितीएक ते दैत्य पोटीं गळाले ६२
पहा हो कपी धीट मोठा पळेना। सदा सर्वदा लक्ष याचें चळेना।
पुन्हा मागुते वीर ते सिद्ध जाले। कितीएक ते पाश घेऊनि आले ॥
मुखें बोलतां मर्कटा बैसलेंसी। समारंगणामाजि युद्धा न येसी।

१ गोफीण.

कपी वीर तो गर्जला भूभुकारें । समारंगणीं चालिला घोर मारें ६४
रिपू झोडिले पाडिले वृक्षघातें । भुमी लोळती दैत्य होऊनि प्रेतें ।
पुढें देखिलें जंबुमाळ्या कुटीला । बळें आखया आपटीला पिटीला॥
पळाले फळी फूटली राक्षसांची । पुढें हाक गेली तया आखयाची ।
त्रिकूटाचळीं शोकआरंभ जाला प्रितीचा बहु आखया तो निमाला
पुरींमाजि अंतःपुरीं घोष जाले । सुखानंद मंदोनि गेले विझाले ।
बहू दुःख जालेंच मंदोदरीला । तिनें कूमारालागिं आकांत केला ॥
पुसे रावणू काय रे काय झालें । तुह्मांलागिं मारावया कोण आलें ।
कपी येकला बैसला तो पळेना । चळेना ढळेना कदा आकळेना॥६८
तया टाकितां पाश मोठाचि होतो । लघूरूप होऊनि नीघूनि जातो।
कदाही पडेना कदा सांपडेना । तेणें मारिली दैत्य उदंड सेना ॥६९
विधीलागिं बोलाविलें रावणानें । कठींणोत्तरीं गांजिलें दुर्जनानें ।
ह्मणे जाइं रे आणि वेगें कपीला । तया नाणितां शीघ्र ताडीन तूला
विरंची पुढें घातला चालवीला । असंभाव्य तो लोकमेळा मिळाला ।
वनामाजि येतां नमस्कार घाली । तया मारुतीची बहू स्तूति केली।
बहूतांपरी कीर्तिचें येश घ्यावें । दयाळा कपी ये घडीं शांत व्हावें ।
न होतां मल्रा मारिती ब्राह्मणाला । बहूसाल कल्याण व्हावें तुह्मांला
कपी वीर तो थोर कोपें कडाडी । करी गर्जना मेघ जैसा गडाडी
परी सांकडीमाजि कांहीं न चाले । मिळाले कपीलागिं घेऊनि आले
अरे मर्कटा थोर अन्याय केला । ह्मणे रावणू मारितों शीघ्र तूला ।
तुझा मृत्यु कोठें खरें सांग आतां ।मुढा कडमळा मारितों जातजातां
ह्मणे मारुती काळ मारूं शकेना । कृपाळूपणें तोपला रामराणा ।
न वाटे खरें सांगतां रावणाला । ह्मणे वानरूलांगुलीं अग्नि घाला ॥
ह्मणे रावणू पाहतां काय आतां । चिरें आणवा सांगताहे समस्तां ॥
असंभाव्य ते वीर धांवोनि गेले । त्रिकूटाचळीं लोक ते नग्न केले॥७६

१ संकट.

पुढें पुच्छ ओढोनि गुंडाळिताती। सिमा सांडली वीर गुंडाळिताती।
तया वेढितां तें असंभाव्य लांबे। विरेंवीर त्या लांगूलालागीं झोंबे।
कितीएक तीं आणिलीं आज्य तेलें। कितीएक तीं मोगरेलें फुलेलें।
महापुच्छ तें सर्वही भीजवीलें। पहा हो कपी बापुडें व्यर्थ मेलें॥७८
तया लावितां वन्हि तेथें न लागे। बळें फुंकितां तो विरे वीरु भागे ।
तया देखतां रावण शीघ्र आला। बळें फुंकितां फुंकितां तो गळाला॥
पुढें रावण थोर कोपें कडाडी। बळें फुंकितां जाळ नेटें धडाडी।
जळालीं मुखें भस्मल्या खांड मीशा।बहूसाल लंबीत होत्या विशेषा
बळें चेतला वन्हि नेटें तडाडी। कडाडीत ज्वाला दडाडी धडाडी ।
कपी वीर तो वांड जाला उडाला। पुढें जाळिता जाहला त्रीकुटाला
गृहां गोपुरांमाजि तें पुच्छ घाली। त्रिकूटाचळीं आगि नेटें निघाली
बिदी हाट बाजार चौबार कुंचे। बळें बोंबली नागवा लोक नाचे८२

बहूतापरीची बहू हांक जाली।
पळा रे पळा रे पळा आगि आली॥
गुरें वासुरें शिंगरें लेंकुरें तीं।
शुनीं मार्जरें तें खरें येसरें तीं॥ ८३॥

किती शेरडें मेंढरें तों अचाटें। पळालीं किती राक्षसें कल्कलाटें ।
किती शाकटें कुंजरें दिव्य घोडे। महीमंडळीं त्यांसि नाहींत जोडे॥
बहूतां परीचीं बहू रम्य यानें। बहूसाल छत्रें विचित्रें निशाणें।
बहूतां परीच्या बहूसाल शाळा।जळाल्या विवीधा विचित्रा विशाळा
वळे लोक तेथें बळें पुच्छ घाली। बहूतां विरांची बहूशांति जाली ।
महा पुच्छ तें जाळ बंबाळ जाला। बहू साक्षपें वन्हि तो चेतवीला॥
पळाले भयासूर ते दूरि थांवे। कपी वीर लांगूल घेऊनि धांवे ।
बहू भोंवताहे बहू धांवताहे। उठे वन्हिचें चक्र लांगूल पाहें॥ ८७॥
फिरे गर्गराटें कपी चक्र जैसा। विधी शक्र अव्यग्र पाहे तमासा ।

---

१ मोठा. २ खेंचरें. ३ स्थिरावे.

विरां खेचरां भूचरां अंत झाला। त्रिकूटाचळा थोर कल्पांत आला
बहूसाल दारूमधें पुच्छ घाली। उसाळे नभामाजि दारू निघाली।
तडाडी थडाडी दडाडी धडाडी। शशी सूर्य नक्षत्रमाळा कडाडी८९
बहू धूम्र तेणें कदाही घडेना। बहूसाळ वढोंणि ते सोसवेना।
बहू घोष तो शब्द कानीं पडेना। कपी रोषला झाडतांही झडेना।
पुढें धूम्र त्यागी धगागीत आगी।महावन्हि कांपेचि जाला विभागी
त्रिकूटाचळू कांचनाचा तखाकी। सतेजीक तेजें झकाकी लखाकी।।

महावज्र लांगूल कल्लोळ जाला।
परी पाहतां रोम नाहीं जळाला।
गदादीत काया समुद्रांत घाली।
निवाला कपी पुच्छज्वाळा विझाली॥ ९२॥

समुद्रीं शुचिष्मंत होऊनि आला। नमस्कार घाली तये जानकीला।
ह्मणे जानकी येकला तूं विदेशी। कपी रे बहूतांपरी कष्टलाशी ९३
ह्मणे मारुती धन्य हे दीस आले। तुह्मां देखतां सर्वही कष्ट गेले।
प्रभू वाट पाहील तो रामराजा। निरूपाचि मी शीघ्र जाईन काजा॥
सिते मारुती योग वीयोग जाला। बहूसाल नेत्रोदकीं पूर आला।
ह्मणे मारुती लोभ आतां असावा। सुरांचा बळें राम येतो कुडावा॥
कपी मागुती मागुती वाट पाहे। उदासीन जातां गळा दाटताहे।
विवेकें जिवामाजि तो धीर केला। पुढें मारुती शीघ्र सिंधू उडाला॥
कपीलागिं सांगे सिताशुद्धि जाली। सुखें एकतां मंडळी ते निवाली।
समस्तांजणांलागिं आनंद जाला। कपी मारुती रामभेटी निघाला
दळेंशीं बळें राहिला रामराजा। कपी रीस ते वीर वेष्टीत फौजा।
स्फुरद्रूप ऊभारिला दिव्य बाहो। रघूनायकें देखिला भीमदेहो ९८॥
कपी लागवेगें मुखें बोलताहे। अशोकीं जगन्मात कल्याण आहे।
पुढें मारुती तो नमस्कार घाली। मनोवृत्ति ते राघवाची निवाली॥

१ आरडा ओरड. २ रक्षण. ३ सीता.

समस्तांसि देखोनि आनंद जाला। सिताशुद्धि घेऊनियां रुद्र आला
बहूतां बहू सांगती येकमेकां। सिता शोधितां सौख्य जालें अनेकां
सभामंडपीं राम सन्मूख पाहे। उभा दास साकल्य तो सांगताहे।
महत्कृत्य व्हावें जनीं येश यावें। प्रभूसी समस्तांसि कल्याण व्हावें

सुंदरकांड समाप्त.

## युद्धकांड.

नमूं विघ्नहर्ता मुखीं सैन्यभर्ता। मुढां धूर्तकर्ता विभांडी विवर्ता।
चतुर्भूज मत्तानन शोभताहे। तया चिंतितां भ्रांति कोठें न राहे॥१॥
सदा भेदहंती महंती महंता। सदा ज्ञानवंती नियंती नियंता।
सुविद्या कळा स्फूर्ति-रूपा अमूपा। नमस्कारिली शारदा मोक्षरूपा
नये बोलतां चालतां रूप कांहीं। नये भावितां दावितां सर्वथाही।
सदा संत आनंदरूपीं भरावें। पदीं लागतां सद्गुरूचे तरावें॥ ३॥
नमस्कारिला राम कोदंडपाणी। पुढें गावया रामरामेति वाणी।
भविष्योत्तरें बोलिलीं तीं पुराणीं। उमाकांत ध्यातो सदा शूळपाणी

कथा शंकराची कथा कार्तिकाची।
कथा चंडिकेची कथा मोरयाची।
कथा वेंकटाची कथा विठ्ठलाची।
कथा मल्ल याची कथा भैरवाची॥ ५॥

कथा नरहरी वामना भार्गवाची। कथा कौरवां पांडवां माधवाची।
कथा देव इंद्रादि ब्रह्मादिकांची। समस्तांमध्यें श्रेष्ठ या राघवाची॥
जिणें फोडला पांग ब्रह्मादिकांचा बळें तोडिला बंध त्या त्रीदशांचा
म्हणोनि कथा थोर या राघवाची। जनीं ऐकतां शांति होते भवाची
कथा थोर रामायणीं सार आहे। दुजी ऊपमा या कथेला न साहे।
तिन्ही लोक गाती सदा आवडीनें। भविष्योत्तरें वानिली शंकरानें॥

१ क्षीण. २ संसाराची.

ऋषींमाजि श्रेष्ठ विचारें वरिष्ठ। सदा येकनिष्ठ सगुणीं प्रविष्ठ।
चरित्रें विचित्रें वनामाजि वस्तां। सुखें बोलिला राम नस्तां समस्तां
कथा राघवाची सदाशीव पाहे। तळीं ऐकतां शेष थक्कीत राहे।
कथा श्रेष्ठ हे ऐकतां दोष जाती। महासूकृती ऐकतीं धन्य होती॥
कथा संपली कांड सुंदर्य मागें। प्रवाहो पुढें चालिला लागवेगें।
स्वयें श्रोतयांतें कवी प्रार्थिताहे। पुढें युद्धकांडीं कथा रम्य आहे११
ऋषीपर्वतीं रामसौमित्र होते। अकस्मात आला हनूमंत तेथें।
ह्मणे जानकी देखिली रामचंद्रा। क्षमारूप लंकेसि आहे नरेंद्रा१२॥
सिता रावणें रक्षिली वाटिकेसी। प्रभू पाहिली म्यां स्वयें निश्चयेंशीं।
तये घोर नीशाचरी रक्षणेंसीं। बळें ठेविल्या कर्कशा गर्वराशी१३॥
पुढें राघवें सुग्रिवाचे निमित्तें। विचारूनियां सर्वही वानरांतें।
दळेंशीं बळें दक्षिणे चालि केली। विरांची असंभाव्य सेना मिळाली॥
कपी सुग्रिवें सर्व भूमंडळींचे। बहू आणिले वीर मेरू बळाचे।
विरा पाठिशीं भार कोट्यानुकोटी। रिसा वानरांची असंभाव्य दाटी
अती आदरें स्कंधभागीं विरानें। रघूनायका घेतलें मारुतीनें।
सुमित्रासुता लागिं त्या अंगदानें। प्रभू चालिले ते बळी थोर मानें१६
सिता शोधिली भीमराजें विशाळें। दळें झोटिलीं वानरांचीं द्दिसाळें
गिरीतुल्य झेंपावती वायुवेगें। करा पल्लवीं झेलिती शैलशृंगें १७॥
अपारें कुरें वानरें सैरें मेळा। कठोरें करें फोडिती चंडशीळा।
रिसें कर्कशें भीस भिंगोळवांणी। मध्यें सांवळा राम कोदंडपाणी॥
पुढें चालतां भार गोलांगुलांचे। कडे लागले थोर विंध्याचळाचे।
तया पर्वतामाजि चंडें उदंडें। विशाळें बहू लागलीं झाडखंडें १९
कपीभार विंध्याचळामाजि आले। असंभाव्य ते झाडखंडीं निघाले
वरी वाड झाडें तळीं दाट छाया। कपी सर्वही सिद्ध जाले उडाया
तळीं पोटळे ऊंच शाखा फुलांचे। वरी लोंबती घोंस नाना फळांचे

1 स्वैर. 2 भयानक.

बहुतांपरींच्या बहू पक्षियाती। बहू श्वापदें तीं फळें भक्षिताती ॥
तयांमाजि ते भार कोट्यानुकोटी।
रिसां वानरांची असंभाव्य दाटी।
झडा घालिती एकमेकां पुढारें।
खडाडां बळें वृक्षवल्ली विदारें ॥ २२ ॥
कितीएक ते बैसले वृक्षअग्रीं। वरी वाइलीं वक्र पुच्छें समग्रीं।
कितीएक मध्येंच ते गुप्त जाले। कितीएक ते वृक्षमाथां मिळाले २३
स्वइच्छा फळें भक्षिती आदरेंशीं। बहू वांटिती येकमेकां त्वरेशीं।
फळें तोडिती टाकिती ते अपारें। वनामाजि ते क्रीडती भूभुकारें॥
कितीएक हेलाविती वृक्ष आंगें। कितीएक ऊफाळती लागवेगें।
कितीएक ते झोंबती आंग व्यस्ते। कितीएक ते लोंबती एक हस्तें
कितीएक पाटाळिती वाड झाडें। किती मोडिती आंगभारें कडाडें
बहू मांडिली झाडखंडीं धुमाळी। कितीएक झेंपावती अंतराळीं २६
वनें व्यापिलीं वानरें गर्जताती। दिशा लंघिती श्वापदें पक्षियाती
भुतें खेचरें थोर धाकें पळालीं। चळी कांपती दैन्यवाणीं गळालीं॥
कपींचीं पुढें चालिलीं दाट थाटें। वनें चालतां सर्व होती सपाटें।
महा थोर विंध्याचळा लागवेगें। पुढें चालिले सर्व सांडूनि मागें २८
तयां चालतां चालतां दक्षणेसी। बहूसाल आवेश माहा विरांसी।
पुढें देखिलें शृंग मैळाचळाचें। तयामस्तकीं भार गोळांगुळांचें २९
गिरी-शृंग-पाठार पाहोनि वेगीं। बळें चालिले भार ते दक्षणांगीं।
पुढें चालतां चालतां अस्तमाना। समुद्रातिरीं लोटली भीम सेना ॥
कपीसैन्य सिंधूतिरामाजि आलें। असंभाव्य देखोनि चकीत जालें।
जळें मातला सिंधु लाटे घडाडी। करी गर्जना मेघ जैसा घडाडी ॥
दिसे पाहतां सर्व आकाश जैसें। कळेना सिमा दाटलें तोय तैसें।
बहूपाण-जंजाळ देखोनि डोळां। भयासूर त्यां कंप सूटे चळाळां॥

---

१ बहुत.

समुद्रातिरीं राहिली चंड सेना। असंभाव्य तें सैन्य भूमी दिसेना।
गिरी-वृक्ष देखोनि येती फुराणं। बळें साधिती अंतराळीं किराणें
कपीभार ते सर्वही स्वस्थ जाले। महापर्वतांचेपरी ते मिळाले।
समुद्रातिरीं राहिलें सैन्य जैसें। पुढें वर्तलें त्रीकुटामाजि कैसें ३४॥
सिताशुद्धि घेऊनियां रुद्र गेला। तयीं आखयातें क्षयो प्राप्त जाला
बहू मानसीं दुःख मंदोदरीला। तिनें शीघ्र पाचारिलें देवराला ३५

म्हणे देवरालागिं बीभीषणा हो।
तुह्मी आजि वेगीं सभेमाजि जा हो।
मदोन्मत्त तो अंकुशें आवरावा।
विवेकें बळें राव तैसा वळावा॥ ३६॥

ह्मणे धन्य हो धन्य तूं राजकांते। मनीं माझिया हीत ऐसेंचि होतें।
बरी अंतरीं मात घेऊनि पुर्ती। निघाला सभेमाजि तो धर्ममूर्ती ३७
तया रावणाच्या गृहामाजि गेला। बहूतांपरी रावणू शीकवीला।
पुढें दोघहि ते सभेमाजि आले। महावीर राक्षेस सर्वै मिळाले॥३८॥
सभे श्रेष्ठ तो रावणू कुंभकर्णू। सभेमाजि बिभीषणू अग्रगण्यू।
सभे सर्वही पुत्र मंत्री मिळाले। तयांलागिं तो रावणू काय बोले ३९
तया रावणें सर्व सांडूनि शुद्धी। पुढें प्रेरिता जाहला पाप-बुद्धी।
ह्मणे ऐक गा बुद्धिवंता प्रहस्ता। करीं रे मला वश्य ते रामकांता॥
सिते कारणें म्यां बहू कष्ट केले। परी पाहतां सर्वही व्यर्थ गेले।
मनीं चिंतिलें कोड कांहीं पुरेना। उरे शीण तो शोक पोटीं धरेना॥
सिते सुंदरीलागिं संभोग द्यावा। समूळें बळें रामशत्रु वधावा।
न हें इतुकें सर्वहीं कृत्य जालें। सुखें सर्वदा चित्त माझें निवालें॥४१॥
अहंकारला रावणू कोटिगूणें। मनीं मानिलें सर्व ब्रह्मांड ऊणें।
समस्तांमध्यें आगळा मेघवर्णू। पुढें बोलता जाहला कुंभकर्णू ४२॥
वदे कुंभकर्णू तया रावणाला। मदें सर्वही नीतिधर्मू बुडाला।

१ दिराला (बिभीषणाला).

अकस्मात लंकापती बुद्धि नासे। पुढें सर्वही सूख तेणें विनाशे॥४४
जगें निंदिलें तेंचि टाकून येतां। पुढें वेळ नाहीं तया दुःख होतां।
विषें घोळिलें ठेवितां प्रीति तेथें। पुढें सत्वरा जाइजे मृत्युपंथें ॥४५
ह्मणे कुंभकर्णू असें काय केलें। सिता आणितां सर्वही राज्य गेलें।
पुढें भंगलें चित्त जाणूनि जीवें। मनासारिखें बोलिला तो स्वभावें॥
शुभाशूभ जें मानलें तूजलागीं। घडो तेंचि आतां भलें या प्रसंगीं।
बळें माझिया सर्व सूखें रहावें। पुढें काय होईल तैसें पहावें ॥ ४७ ॥
कपी मानवी सर्व कैसे मिळाले। क्षुधेकारणें माझिये प्राप्त जाले।
रिपू घालितों ऊदरामाजि सांठा। नरें वानरें घांस घेतों घटाटा४८
उदेल्या महा घोर माझेनि कोपें। पुढें देखतां तो चळी काळ कांपे।
रिसें मर्कटें बापुडीं दैन्यवाणीं। रिपू आमुचे थोर वाटे शिराणी॥
तया बोलतां रावणा सूख जालें। स्तुतीउत्तरें आदरें गौरवीलें।
महावीर पारॅश्व ऊदीत वेगीं। पुढें बोलता जाहला ते प्रसंगीं॥५०
अहो कासया मंत्र पूसा रिपूचा। जनीं कोण लेखा तया मर्कटांचा॥
समर्थांपुढें दूसरा कोण कैंचा। करूं येकला सर्व संहार त्यांचा ५१
सितेची बहू प्रार्थना कां करावी। प्रभू सांगतों बुद्धि पोटीं धरावी।
ह्मणे वीर पारश्व त्या रावणाला। बळात्कार राया करावा सितेला
ह्मणे रावणू धन्य गा बुद्धिवंता। तुझें बोलणें मानलें दृढ चित्ता।
परी शाप आहे मला ब्रह्मयाचा। करींना बळात्कार हे सत्य वाचा
तया बोलतां दुःख बीभीषणाला। बहूमाल संतापला क्रोध आला
ह्मणे रे रघूनाथ पूर्ण प्रतापी। दुरात्मे तुह्मी नष्ट चांडाळ पापी५४॥
तुह्मी राक्षसें निर्बळें बुद्धिहीनें। मती मंदली पातकाचेनि मूणें।
सुरांकारणें राम आला कळेना। मदें मातला रावणू ओळखेना ५५
कपी वीर ते दूरि टाकूनि शंका। मिळाले करायास निर्मूळ लंका।
त्रिकूटाचळू दृश्य नाहीं तयांला। तंव जानकी भेटवा राघवाला५६

१ आवड. २ नामविशेष.

रूपें कर्कशें कोपला वीर गाढा। रणा मंडळीं राम वाहील मेढा।
ज्या देखतां काळ भीडूं शकेना।तुह्मी मश्यकें राक्षसें सर्व सेना५७
रणीं तीव्र त्या राघवाचेनि बाणीं। तुटों लागले तूमचे पादपाणी।
धडें मस्तकें मेदमांसें चिडाणी। न होतां सिता भेटवा चापपाणी॥
तया बोलतां ते सभा तप्त जाली। सुता मंत्रियांचे मुखीं तीव्र बोली
असंभाव्य तो रावणा कोप आला। कुशब्दें बहू त्रास बीभीषणाला
सभेमाजि धिक्कारिलें रावणानें। उठोनी पदें ताडिलें दुर्जनानें।
बहूतांमध्यें एकला धर्ममूर्ती। मनीं खोंचला तो उदासीन चित्तीं॥
मनू भंगला हो तया धार्मिकाचा। पुढें त्याग तत्काळ केला सभेचा
उडाला नभोमंडळामाजि वेगीं। पुरोहीत चत्वारि ते पृष्ठभागीं ६१
झळंबे मनीं लोभ त्या सांडि केली। अकस्मात ते वृत्ति भंगूनि गेली
पुढें वाक्य बोलोनियां रावणातें। उदासीन तो चालिला व्योमपंथें
पुरोहीत चत्वारि ते पृष्ठभागीं। त्वरें उत्तरे चालिले लागवेगीं।
समुद्रासि लंघूनि पैलाड गेले। नभीं पारखे सुग्रिवें ओळखीले६३॥
कपींद्रू ह्मणे पैल पाहें विशाळू। नभीं येतसे कोण हा पंचै-मेळू।
अकस्मात खालावला व्योम-पंथें। भिडों पाहती वानरें त्या अनर्थीं।
मिळाले कपी बोलती त्यासि वाचा।
अकस्मात आलास तूं कोण कैंचा।
ह्मणे बंधु मी होय लंकापतीचा।
परी दास अंकीत या राघवाचा॥६५॥
पुरी त्यागिली सर्व एका जिवेंशीं।
करा हो तुह्मी भेटि या राघवाशीं।
ह्मणे सत्य बीभीषणू नाम माझें।
नव्हे अन्यथा सर्वथा वाक्य दूजें॥६६॥
कपी सर्वही जुत्पती धर्म्ममूर्ती। बहूतांपरी ऐकिली वाड कीर्ती।

---

१ धनुर्गुण. २ बाण. ३ पांचजण.

समस्तीं तुह्मीं हीत माझें करावें। कृपाळू-पणें राघवा भेटवावें६७॥
ह्मणे वीर सुग्रीव नावेक बैसा। त्वरें मात हे जाणवीतों सुरेशा ।
कपींराज तो लागवेगें निघाला। अती आदरें भेटला राघवाला ६८
समाचार साकल्य तो सांगताहे। ह्मणे भेटि नीशाचरू इच्छिताहे ।
परी अंतरीं कोण कैसा कळेना। तया ठेवितां राजनीती मिळेना॥
समस्तांकडे पाहिलें राघवानें। बहूतांपरी बोलिलें ते सभेनें।
मनीं पाहतां देखिला दैन्यवाणा। कृपाळूपणें आणवी रामराणा॥
उभें राहिलें भाग्य बीभीषणाचें। करी अंतरीं ध्यान पादांबुजाचें।
भिजे दिव्य सर्वांग त्या अश्रुबिंदीं। मिठी घातली रामपादारविंदीं
कृपा-सागरें ठेविला हस्त माथां। चिरंजीव लंकापती होय आतां।
मधूरें गिरे राघवें ऊठवीला। पुढें तिष्ठतू हात जोडोनि ठेला॥७२॥
बहु स्तुति केली रघूनायकाची। करी आदिनारायणाची विरिंची
तयाचेपरी शब्द कारुण्य बोले। पुढें पाउलें लक्षितां अश्रु आले॥
ह्मणे राम बीभीषणा बैस आतां। पुरे स्तूति सांडीं तुझी सर्व चिंता।
सुमित्रासुतालागिं संकेत केला। दिजे मंगळ-स्नान बीभीषणाला॥
त्वरें ऊठला बंधु त्या राघवाचा। घटू आणिला पूर्ण सिंधूदकाचा।
पुढें शीघ्र बीभीषणालागीं शेषें। विशेषें दिलें सौख्य राज्याभिषेकें
ह्मणे राम बीभीषणा सत्य वाचा। प्रतापें वधू जालिया वैरियाचा।
तुला दीधलें राज्य लंकापुरींचें। चळेना चिरंजीव जैसें ध्रुवाचें ७६
वरू दीधला रामचंद्रें दयाळें। कृपासागरें दासपाळें नृपाळें।
प्रसंगीं तये थोर आनंद जाला। दिल्हें अक्षयी राज्य बीभीषणाला
कपी सुग्रिवादीक मादी मिळाली। समस्तीं विरीं आदरें स्तूति केली
जगीं धन्य हें भाग्य बीभीषणाचें। प्रितीपात्र जाला रघूनायकाचें
रघूनायका देखतां सूख जालें। बहु दुःख मागील सर्वै निमालें।
जगीं धन्य गा धन्य बीभीषणा तूं। प्रसन्नू तुला जाहला श्रीअनंतू

१ भक्तरक्षकानें.

समस्तांसि सन्मानिलें आदरेंशीं । नमस्कार केला रघुनायकासी ।
पुढें मंत्रियांमाजि तो बैसवीला । तदा थोर आनंद बीभीषणाला ॥
ह्मणे राम बीभीषणा बैस आप्ता । त्रिकुटाचळू सांग साकल्य वार्ता
वदे राज्य लंकापुरी सर्व सेना । मनामाजि संतोषला रामराणा ॥८
पुढें राम बीभीषणा मंत्र पूसे । कपी-भार पैलीकडे जाति कैसे ।
विचारूनियां सुग्रिवाचेनि मत्तें । ह्मणे हो क्षमा मागिजे मार्ग यातें ॥
समुद्रासि देऊनियां श्रेष्ठ मानू । करावा अती आदरें सुप्रसन्नू ।
मनीं बोलणें सत्य मानूनि देवें । समुद्रातिरीं बैसिजे शुद्ध भावें ॥८३
त्रिकूटाचळाहून तो हेर आला । पुढें सर्व पाहूनि शार्दूळ गेला ।
समाचार सांगे तया रावणाला । ह्मणे वानरेंशीं बळें राम आला ॥

समाचार हा सत्य हो जी भुपाळा
नव्हे मिथ्य हें देखिलें म्यांचि डोळां ।
मिळाले कपी रीस कोट्यानुकोटी।
समुद्रा तिरीं जाहली थोर दाटी ॥ ८५ ॥

बळें राहिली ते असंभाव्य सेना। विरांची असंख्यात संख्या असेना
शिळा-शीखरें झेलिती वृक्षपाणी।सदा सर्वदा गर्जती घोर वाणी ॥
तयांमाजि ते मानवी वेषधारी । रुपें रम्य लावण्य कामावतारी ।
असंख्यात मेळा रिसां-वानरांचा। कपिश्रेष्ठ सुग्रीव राजा तयांचा॥
प्रभू सांगतों सिद्ध आतां असावें । पुरीमाजि दुश्चीत कांहीं नसावें।
तयें सांगतां थोर उद्वेग जीवा । ह्मणे मागुता कोण रे पाठवावा८८
पुढें शूक बोलाविला आदरेंशीं।ह्मणे जायरे बोल त्या सुग्रिवासी।
ह्मणावें कपी तूं सखा आमुचा रे । अनुचीत हें वागणें कासया रे८९
बहूतांपरी शूक तो शीकवीला । अळंकार देऊनियां तोषवीला ।
नमस्कार केला तयें रावणासी।निघाला बळें हेर तैसा त्वरेंशीं ॥९०
नभोमंडळीं शीघ्र उड्डाण केलें । देहें आपुलें सर्वही पालटीलें ।

१ सिंह. २ भय.

रूपें सुंदरू जाहला शुद्ध पक्षी। निराळा नभामाजि तो सैन्य लक्षी।
ह्मणे सुग्रिवा ऐक रे एक भावें। कपी व्यर्थ आलासि मागें फिरावें।
त्वरें आपुल्या भूवनामाजि जावें। समारंगणीं वाउगें कां मरावें॥
त्रिकूटाचळा रामकांतेसि नेलें। कपी सांग पां रे तुझें काय गेलें।
तया मानवा साह्य जालासि कैसा। मनीं नेणतां चालिला मूर्ख जैसा

बळें हीन झुंजासि त्याच्या न जावें।
कदा कृपणाचें वऱ्हाडी न व्हावें।
महा मूर्ख रे सख्य याचें नसावें।
स्वयें हीत तें ज्ञान पोटीं वसावें॥ ९४॥

त्रिकूटाचळू लभ्य नाहीं सुरेशा। नरां वानरां प्राप्त होईल कैसा।
कपीपुंगवा व्यर्थ आलासि वांयां। समारंगणीं बाण-घातें मराया॥
समस्तीं रणामाजि जीवें मरावें। तये मैत्रिकेचें जनीं काय घ्यावें।
बहूतांपरी हेंचि आतां करावें। तुवां आपुल्या भूवनामाजी जावें॥

शुकें निंदिलें सर्वही वानरांतें।
बहूसाल धिक्कारिलें हो तयांनें।
तिहीं पाडिला ताडिला कुस्त केला।
पुन्हा सोडिला तो नभामाजि गेला॥ ९७॥

ह्मणे शूक ऐका रिसें वानरें हो। तुह्मां रावणें रक्षिलें निर्बळें हो।
अरे मूर्ख हो व्यर्थ आलांत येथें। समारंगणीं जावया मृत्युपंथें॥९८
अरे सुग्रिवा वानरा भूललाशी। रिसांमर्कटांमाजि तूं मूर्ख होशी।
मुदा व्यर्थ घेऊनि आलासि सेना। तुला रावणू कोण कैसा कळेना
पुन्हा बोलता जाहला घोर वाणी। कपी मागुते क्षोभले वृक्षपाणी
धरूनी बळें आणिलें पक्षियाला। तिहीं राक्षिलें पाशबंधीं तयाला।
पुढें शीघ्र कोपेल हा रामचंद्रू। ह्मणे दास भेटेल भावें समुद्रू।
प्रतापें बळें तारिती चंड शीळा। बळें सेतु बांधूनि घेती सुवेळा॥

१ चीत. २ हातांत वृक्ष घेतलेले.

द्वितीय प्रसंगः

समुद्रातिरीं राम राजीवनेत्रें। भुमी सेज दर्भासनीं तीन रात्रें।
बहूतांपरी दीधला श्रेष्ठ मानू। परी सागरू तो नव्हे सुप्रसन्नु ॥१॥
फळें तोय सांडूनियां नित्य नेमें। बहूतांपरी प्रार्थिला सिंधु रामें।
परी नायके जो बळें धुंद जाला। रघूनायका कोप तत्काळ आला।
उभा राहिला काळ कृतांतु जैसा। बळें सिंधु जाळावया राम तैसा।
दिसे रूप अद्भूत वज्रांग ठाणें। करीं चाप तें सज्जिलें अग्निबाणें ॥२
बळें ओढितां घोर-घोषें करारी। दिशा दाटल्या वन्हि शीतें थरारी
भयें बैसला काळ पोटीं दरारा। चवों लागल्या त्या असंभाव्य तारा

बहू क्षोभला राम जाळूं निघाला।
पुढें सिंधु भेटावया शीघ्र आला।
ह्मणे स्वामि हो थोर अन्याय झाला।
समुद्रासि हो शीघ्र पाळाण घाला ॥ ५ ॥

नळाचेनि हस्तें चळीं चंड शीळा। गिरी शृंग तर्तील हो जी नृपाळा
वदे निश्चयें आदरें हा समुद्रू। तदा थोर संतोषला रामचंद्रू ॥ २ ॥
बहूतांपरी राम संतोषवीला। पुढें सिंधु तोही जळामाजि गेला।
नळें वानरांचीं दळें सिद्ध केलीं। गिरी-शृंग आणावया शीघ्र गेलीं।
त्वरें उत्तरे चालिले भार सैरा। बळी धांवती एकमेकां पुढारां।
शिळा शीखरें झाड खंडें प्रचंडें। बळाचे कपी चालवीती उदंडें ॥८॥
कपी धांवती लक्ष कोट्यानुकोटी। बळें गर्जती थोर आनंद पोटीं।
गिरीकंदरें देश लंघूनि जाती। शिळा शीखरें शीघ्र घेऊनि येती ॥
निळे पींवळे श्वेत आरक्त काळे। फिके जांभळे गोर जांभे गव्हाळे।
बहू रंग पाषाण नानापरीचे। उभे वक्र वर्तूळ गाभे गिरीचे ॥ १० ॥
कपीवीर ते शीघ्र घेऊनि जाती। बळें वृत्रहाचेपरी वर्षताती।
शिळीं सेतु बांधी नळू लागवेगें। असंभाव्य तीं चालिलीं शैलशृंगें ॥

१ पडूं. २ झांकण. ३ चित्रविचित्र.

कपी मोडिती वांड झाडें कडाडां । कडे पाडिती पर्वतांचे खडाडां ।
उड्या घेति आकाशपंथें धडाडां । बळें टाकिती सिंधुमध्यें थडाडां ।
विशाळा जडा वर्तुळा त्या उदंडी । बहु मस्तकीं वाहती चंड धोंडी।
शिळा शीखरें फोडिती ते अभंगें । नभीं भार झेंपावती लाववेगें ॥
कपी मारुतीसारिखे जे उडाले । गिरी मंदरासारिखे चालवीले ।
कपी साक्षपी देव-रूपी बळाचे । कडे लागले ते सुवेळाचळाचे॥१४॥
बळें सेतु बांधावया वेगु केला । शतें योजनें लांब विस्तीर्ण जाला ।
दहा योजनें भव्य रूंदी तयाची । जळीं बांधणी सर्व पांचां दिसांची
कपी सर्व आनंदले कार्य झालें । बळें गर्जती चित्त सूखें निवालें ।
सुवेळाचळा सेतु बांधोनि नेला । नळा वानराला जयो प्राप्त जाला ॥
ह्मणे रामराणा तया सुग्रिवातें । दळें चालवा सागराचेनि पंथें ।
निरूपी कपी शीघ्र सेनापतीला । निळें सर्व सेनेसि संकेत केला ॥
दळें सर्वही वानरांचीं निघालीं । पुढें चालतां दाटणी थोर जाली ।
कडेचा पडे तो उडे अंतराळीं । सुवेळाचळा पावले शीघ्रकाळीं ॥१८
सुवेळाचळाभीतरीं राजभारें । दळें लोटलीं वानरांचीं अपारें ।
बळें घोरघोषें कपी गर्जताती । दिशाचक्र सिंधू गिरी पाहताती ॥
त्रिकुटागिरीशीखरीं दिव्य जे कां । रघूनायकें देखिली रम्य लंका ।
दिसे तेज-पुंजाळ लावण्यराशी । तया देखतां पारणें लोचनाशी ॥
ह्मणे धन्य रे धन्य तो विश्वकर्मा । असंभाव्य या पर्वताचा महीमा ।
सुवर्णाचळा सारिखा दीसताहे । सिता सुंदरी या स्थळामाजि आहे।
पुढें राम बोले रिसांवानरांशी । असावें तुह्मीं सर्व सेना-प्रदेशीं ।
कपी-चक्र अव्यग्र तें सिद्ध जालें । निळें वानरें सर्व सन्नद्ध केलें॥२२॥
कपी-भार ते सर्वही स्वस्थ जाले । पुढें धर्मता उत्तरीं राम बोले ।
ह्मणे सुग्रिवा बापुडें शूक सोडा । तया पायिंचे सर्वहो पाश तोडा२३
तया अंगदें सोडतां तो उडाला । मुखीं रामनामें नभीं गुप्त जाला ।

१ बहुत.

बळें चालिला शुक्र मूखें त्वरेंशीं। त्रिकूटाचळीं भेटला रावणाशी२४
ह्मणे रावणू गा शुका काय झालें। नऊ रात्र पर्यंत कोठें क्रमीलें।
वदे शूक हो लंकनाथा वरिष्ठा। मुखें व्यर्थ बोलों नये अप्रतिष्ठा२५॥
तयां वानरांच्या दळामाजि गेलों। देहें पालटीलें स्वयें शूक जालों।
नभोमंडळीं राहिलों अंतराळीं। बळें वानरांचीं दळें तीं निहाळीं २६
समुद्राचिये उत्तरे भीम सेना। दहा योजनें दाट भूमी दिसेना।
तिथें मुख्य ते राम-सौमित्र बंधू। कपिश्रेष्ठ सुग्रीव राजा अगाधू॥
उचिष्ठोत्तरें तूमचीं त्या कपीला। मुखें बोलिलों सर्वही सुग्रिवाला।
मला सांगतां वीर कोपासि आले। कितीएक ते पाठिलागीं उडाले॥
कपी-वीर धांवोनियां पाठिलागीं। मला ताडिते जाहले ते प्रसंगीं।
बहू सूख जालें तयां वानरांतें। कठोरें करें ताडिलें या देहातें॥२९॥
बहू कष्ट जाले प्रभो या जिवासी। नसो वांखटी वेळ ती वैरियाशीं।
रिसां वानरांची असंभाव्य मांदी। पुढें घातलें हो मला पाश-बंदीं॥
प्रभू काय सांगों चमत्कार जाला। समुद्रांतुनी सिंधु बाहेर आला।
रुपें भव्य तो मूर्तिमंतू निघाला। अती आदरें भेटला राघवाला॥३१
पुढें बोलता जाहला तोयराशीं। तयें शुद्धि सांगीतली राघवासीं।
ह्मणे जी बळें सिंधु बांधा दयाळा। नळाचेनि हस्तें जळीं चंडशीळा॥
कपी प्रेरिले त्या रघूनायकानें। शिळा तारिल्या त्या नळा वानरानें
कपीभार ते सर्व ऐलाड आले। सुवेळाचळा मस्तकीं ते मिळाले ३३
कृपाळूपणें बोलिला रामचंद्रू। कपींला ह्मणे शूक सोडा नरेंद्र।
पुढें वानरीं सोडिलें लागवेगीं। समर्था तुला भेटलों ये प्रसंगीं॥३४॥
प्रभू सांगतों बुद्धि आतां करावी। त्वरें जानकी राघवा भेटवावी।
सिता पाठवीतां बरें लंकनाथा। न होतां असें प्राप्त होईल वेथा ३५
शुकें सांगतां रावणा कोप आला। ह्मणे कोण लेखा नरां वानरांला।
रणामंडळीं सोडितां बाण-वृष्टी। बळें आपुल्या सर्व जाळीन सृष्टी॥

---

१ वाईट. २ समुद्र.

बळें बूजितों भूमि आकाश बाणीं । ह्मणे काय तीं लेंकुरें दैन्यवाणीं॥
न होतां असंभाव्य त्या बाणवृष्टी । सुखें सांगती थोर संग्राम-गोष्टी
अंमित्रीं तिहीं एक अद्भूत केलें । समुद्रासि पालाणिलें सैन्य आलें ।
नव्हे पाहतां गोष्टिसामान्य कांहीं।परी राक्षसां शुद्धि अद्यापि नाहीं
पुढें हेर बोलाविले आदरेंशीं । शुका सारणातें ह्मणे गर्वराशी ।
मिळालीं दळें श्रावणारी-सुताचीं । तुळा रे बळें त्या रिसां वानरांची
तयें बोलिल्या नंतरें लंकनाथें । बळें चालिले शीघ्र आकाशपंथें ॥
सुवेळाचळा देखतां सिद्ध जाले । देहे आपुले ते तिहीं पालटीले ॥
रूपें जाहले वानरू वेषधारी । कळेना कळा बाणलीसे शरीरीं ।
दळीं कोटिच्याकोटि संख्या असेना।तिहीं राक्षसीं तूळिली सर्व सेना
सभे बैसले राम सौमित्र जेथें । शुका सारणाला नव्हे रीग तेथें ।
पुढें अंतरीं दूर राहून वेगीं । बळें तूळिते जाहले ते प्रसंगीं ॥ ४२॥
सभे अंतरें लक्ष लावोनि ठेले । अकस्मात बीभीषणें ओळखीले ।
धरीलें करीं त्या शुका सारणातें । ह्मणे दूत हे धाडिले लंकनाथें ।
तदा बोलिला राम बीभीषणाला । दळें दाखवा सर्वही शीघ्र त्याला॥
तुळा जा दळें तीं शुका-सारणाहो॥तुह्मी आपुलेंकार्यसिद्धीसन्याहो॥
स्तुतीउत्तरें सारणू शीघ्र बोले । कृपा-सागरें हेर ते रक्षियेले ।
प्रभू देइजे स्नेह आज्ञा दयाळा । तुजलागिं कल्याण हो जी नृपाळा॥
निरोपेंचि तत्काळ ते हेर गेले । तया रावणाला नमस्कार केले ।
प्रभू मृत्यु आला बळें लागवेगें । परी सूटका जाहली थोर भाग्यें ।
दळांमाजि बीभीषणें ओळखीलें । धरूनी बळें तें सभेमाजि नेलें ।
उदारें रघूनायकें सोडवीलें । कृपाळू-पणें भूपती मुक्त केलें ॥४७॥
कळेना दळीं कोण संख्या बळाची॥असंभाव्य सेना बहू विक्रमाची
तयांच्या बळा ऊपमा काय द्यावी॥समारंगणा भेटि त्यांची न व्हावी
रघूनाथ सौमित्र बीभीषणानें । कपी सुग्रिवें अंगदें मारुतीनें ।

१ शत्रूंनीं २ दशरथ.

बळें घेउं लंका असा नेम केला। घडीनें घडी कोप येतो तयांला।
मनीं वाटतें बुद्धि ऐशी करावी। सिता आदरें राघवा भेटवावी।
तया बोलतां कोपला गर्वराशी। ह्मणे ताडिलें काय नेणों तुह्मांसी
भया सांगतां त्या नरां वानरांचे। सदा सर्वदा भक्ष्य जे राक्षसांचे।
मज रावणासा रिखा कोण आहे। समारंगणीं काळ भांडों न राहे।
महा थोर दामोदरीं गर्वराशी। पुढें रावणू वेंघला सारणेंशीं।
तया मस्तकीं उंच आकाश-पंथीं। पुढें पाहतां दृष्टि फांके दिगंतीं।
सुवेळाचळीं दृष्टि घालोनि पाहे। असंभाव्य तें सैन्य पोटीं न साहे।
पुढें रावणू सारणालागिं पुसे। कपी सांग रे सर्व आहेत कैसे।
कपीभार पाहूनियां हेर आले। पुसे रावणू सारणू शीघ्र बोले।
वदे देखिल्यासारिखें सत्य वाचे। पुढें दाखवी भार गोळांगुळांचे।
ह्मणे सारणू ते कपी वीर जेठी। मिळाले असंभाव्य कोट्यानुकोटी
देहे पर्वतासारिखे काळरूपी। रणीं भीडतां शूर संग्राम कोपी।
ह्मणे लंकनाथा कपी पैल पाहें। समस्तांमधें आगळा बैसलाहे।
समारंगणीं वीर नेता विरामा। महा मुख्य सेनापती नीळनामा।
दिसे दूसरा त्याचिये दक्षिणांगीं। बळें डुल्लतू वीर लोहीत अंगीं॥
धरा हाणितां पुच्छ-घातें थरारी। कपी अंगदू नाम त्याचें सुरारी।
मिळाले कपी रीस कोट्यानुकोटी पुढें बैसला भार घालोनि पाठी।
सदा सर्वदा लक्ष ज्यांचें त्रिकूटीं। बहूसाळ युद्धा उतावीळ पोटीं।
करी चंड उड्डाण आकाश-पंथें। महा मेघ वीतूळती अंगवातें।
समारंगणीं भीडतां अग्रवादू। बळें आगळा नाम त्याचें कुमूदू ॥५९
देहे सिंधुरासारिखा पैल पाहे। महावीर विंध्याचळामाजि राहे।
सुपर्णास सांडून उड्डाण ज्याचें। कपी थोर हा ऋषभू नाम त्याचें।
दिसे पैल पुच्छासनीं वीरभारें। खचे स्वर्ग तें याचिया भूभुकारें।
कपी शर्म ऐसें तया नाम राया। उतावीळ हा थोर शत्रू जिताया।

---

१ मंदिरीं. २ लाल. ३ भूमि. ४ हत्ती.

कपी वीनतू पैल पाहा विशाळू। रणीं धांवतां वीर-प्रेतां सुकाळू।
देहे आचळासारिखा ताम्रवर्णी। विरा वानरांमाजि अद्भूत कर्णी।
भ्रूकुटी भयासूर त्या भीस पाहें। भुमी अंग रोमावळी रूळताहे।
कपी क्रंदनू भूपती नाम ज्याचें। तयासारिखें देह नाहीं बळाचें ६३
प्रमांथी कपी वीर कैसा कडाडी। महामेघ गंभीर जैसा गडाडी।
रणीं झुंजणा थोर कल्पांत मांडे। तया वानरांशीं बळें कोण भांडे।
सुवर्णाचळासारिखा देह ज्याचा। मुखें विक्रमू बोलवेना बळाचा।
गवायू कपी वीर तत्काळ कोपे। उडाणें सवीतारथीं अश्व कांपे।
विशाळ गजू वानरू पैल पाहो। तुळींतो सदा सर्वदा सव्य बाहो।
त्रिकूटाचळीं लाविली दृष्टि जेणें। बळें सर्व रोमांच येती फुराणें ६६
विरांमाजि हा धूम्रचंड प्रतापी। महा पर्वतासारिखा चंडकोपी।
रिसू कर्कशू घोर घोषू अगाधू। बळी होय हा जांबवंतासि बंधू॥६७
कपींचें बहूसाल सामर्थ्य वानी। मुखें बोलतां रावणू वीट मानी।
ह्मणे रावणू सारणा मूर्ख होशी। मला देखतां मर्कटा वर्णितोशी६८
असोंदे रिसें मर्कटें या प्रसंगीं। रिपू दाखवीं मुख्य तो राम वेगीं।
अभिप्राय जाणूनि लंकापतीचा। वदे सारणू मागुती रम्य वाचा६९
पहा राम तो पैल कोदंडपाणी। रुपें सांवळा रम्य लावण्यखाणी।
रतीचा पती तूळितां तुच्छ होये। विराजे रिसां वानरांमाजि पाहें॥
पहा राम विश्राम आत्मा जगाचा। बळें काळहर्ता विहर्ता अघाचा।
तुणीरांबरें कांस माथां लपेटा। झणत्कारिती वाजटा चाप-घंटा७१
महावीर तो देखतां धाक सूटे। समारंगणीं भीडतां काळ वीटे।
तयाशीं बळें भीडतां पूरवेना। कदाही जयो प्राप्त होतां दिसेना॥
तया दक्षिणे दूसरा बैसला हो। महावीर सौमित्र राया पहा हो॥
असंभाव्य सामर्थ्य याचें कळेना। बळें आगळा जिंकितां जिंकवेना।
कपी राघवा वामभागींच आहे। त्रिकूटाचळू दृष्टिनें वक्र पाहे।

---

१ बलवान. २ सूर्यरथीं. ३ भाता. ४वाजणाऱ्या.

कपीनाथ सुग्रीव तो ओळखावा। कळेना असंभाव्य त्याचा उठावा॥
कपी आणिले सर्व भूमंडळींचे। असंख्यात संख्या नसे भार त्यांचे।
वनीं मैत्रिकी जोडिली राघवाशीं। रघूनायका साह्य जाला जिवेंसीं
सिता शोधिली मारिलें कूमरासी। वनें मोडिलीं जाळिलें त्रीकूटाशी
बळें आगळा भूपती पैल पाहें। समस्तांमधें मारुती शोभताहे॥७६॥
महाभीस भिंगाळ काळा कराळ। विशाळें नखें फोडितो ब्रह्मगोळ।
रिसां कर्कशांमाजि हा काळकेतू। बळें आगळा पैल जो जांबवंतू॥
उतावीळ माराचया दैत्य पाहे। महा वीर बीभीषणू शोभताहे।
तयें सांगतां रावणा दुःख जालें। असंख्यात कोपानळें दग्ध केले॥
करीं खड्ग घेऊनियां सारणाला। प्रसंगीं तये शीघ्र मारूं निघाला
ह्मणे सारणू जी पिडा कां करितां मुखें बोलिलों सर्वही सत्य वार्ता
तुळाया दळें पाठवीलें भुपाळें। रिपूचीं दळें पाहिलीं तीं विशाळें।
तया सारिखें बोलिलों सत्य भावें। समर्थापुढें मिथ्य कैसें वदावें ८०

प्रभू आमुचा कोण अन्याय जाला ।
खरें सांगतां कोप येतो तुह्मांला ।
नसे पाहतां अल्प अन्याय कांहीं ।
नसे मिथ्य आह्मी नसों स्वामिद्रोही॥ ८१ ॥

पुढें रावणू कोप सांडून ठेला। पुसे आदरें मंत्र माहोदराला।
सुवेळाचळा कोण रे पाठवावा। रिपूचा विवेकें बरा शोध घ्यावा८२
वदे वीरु माहोदरू रावणातें। सुवेळाचळा पाठवा शार्दुलातें।
महा धूर्त हा जाणतो सर्व मत्तें। बळें शीघ्र तूळील रीपू-दळातें॥८३
पुढें दैत्य बोलाविला आदरेंशीं। ह्मणे सैन्य पाहोनि यावें त्वरेंशीं।
अलंकार देऊनियां तोषवीला। बळें हेर तो शीघ्र जाऊनि आला८४
नमस्कारिला राव तो आदरेंशीं। ह्मणे रावणू म्लान कां दीसतोशी
अधोमूख राहोनि शार्दूल बोले। ह्मणे हो कपी काळ जैसे उदेले ८५

---

१ भयंकर.

बहू दाटलीसे असंभाव्य सेना। नसे रीघ तेथें कदा जाववेना।
परी मी तयांमाजि तैसाच गेलों। बहू ताडिलों पाडिलों कुस्त केलों
निरोपें तुझ्या शीघ्र गेलों सुरारी। रुपें जाहलों वानरू वेष-धारी।
मला हिंडतां हिंडतां थोर मानें। पुढें लक्षिलें धूर्त बीभीषणानें ॥८७
कपी धांवले दूत त्या सुग्रिवाचे। पुरोहीत चत्वारि बीभीषणाचे।
धरूनी मला चालविलें त्वरेंशीं। पुढें चालतां देखिलें राघवासी ८८
ह्मणे धन्य तो रामराजा दयाळू। मला देखितां शीघ्र सोडी नृपाळू।
मनीं माझिये वाटतें निश्चयेंशीं। रघूनायका भेटावावें सितेसी ॥८९
समाचार तो सर्वही श्रूत केला। तया सांगतां रावणा क्रोध आला।
पुढें राक्षसें शीर केलें रिपूचें। वनीं चालिला सत्व घ्याया सितेचें९०
अशोकीं वसे जानकी भूमि-बाळा। वदे रामनामावळी सत्वशीळा।
पहा रावणें शीर मायीक केलें। छळाया सितेकारणें शीघ्र नेलें॥९१
ह्मणे रावणू व्यर्थ तां धीर केला। रणीं दीर भर्तार तूझा निमाला।
कपी राक्षसांतें महा मार जाला। प्रहस्तू जयो शीघ्र घेऊनि आला॥
रिपू सांगतां ते भयातूर जाली। भयें जानकी शोकसिंधू बुडाली।
शिरें देखतां मूर्च्छना शीघ्र आली। देहे सांवरेना भुमी अंग घाली ॥

भविष्योत्तरें बोलिलीं वाल्मिकाचीं।
ह्मणे कायसा बोलिला तो विरिंची।
पहा आजि तें सर्वही व्यर्थ जालें।
कृतांतापुढें मश्यका येश आलें॥ ९४ ॥

बहु शोक होतां देहेभाव सांडी। ह्मणे रावणू सत्त्व सीता न सांडी।
महा प्रेत्न सायास म्यां व्यर्थ केला। पुढें शीघ्र लंकापुरीमाजि गेला
दळें सिद्ध केलीं बळें लंकनाथें। प्रती-मल्ल राक्षेस चत्वारपंथें।
महा वीर ते सर्वही शस्त्रपाणी। बुजूं पाहती भूमि आकाश बाणीं ॥
कपी-चक्र तेंही बळें सिद्ध जालें। निळें वानरेंसीं प्रतीमल्ल केलें।

---

१ चीत. २ त्वां.

महा वीर ते गर्जती मेघ जैसे।भुतां खेचरां थोर कल्पांत भासे ॥१७
सुवेळाचळा राम पाहे स्वभावें। तया मस्तकीं शृंग तें दोन गांवें।
नभीं लागला उंच आकाश-पंथें। ह्मणे राम गा सुग्रिवा जाइं तेथें ॥
ह्मणे वीर सुग्रींव आज्ञा प्रभूची। असंभाव्य सेना रिसां वानरांची
महा वीर तत्काळ सर्वे मिळाले। बळें शृंग वेंघावया सिद्ध झाले ॥
कथेलागिं श्रोतीं पुढें चित्त द्यावें। ह्मणे दास अर्थांतरीं वीवरावें।
स्वहीता कथामृत घ्यावें फुकाचें। सदा सेवितां दुःखदारिद्र्य कैंचें॥

तृतीयप्रसंगः

पुढें चालिला शीघ्र तो रामराजा। कपी धांवती वीर वेष्टीत फौजा
करीं हस्त घेऊनि बीभीषणाचा। बळें वेंघले शृंग त्या पर्वताचा ॥
कितीएक ते राहिले भार मागें। बळें वेंघती शृंग तों लागवेगें।
पुढें शीघ्र आटोपिलें जातजातां। मिळाले कपी राम सौमित्र माथां
सुवेळागिरीं-शीखरीं राम पाहे। अती साजिरा त्रीकुट शोभताहे।
उभा रावणू गोपुरीं थोर धीट। तिथें पावला सुग्रिवाचा चपेट॥३॥

कवे घातली पेटला शीघ्र कोपा।
बळें रावणू ताडिला चंड थापा।
बळें झोडिलीं तोडिलीं दिव्य छत्रें
ह्मणे जानकी आणिली या कुपात्रें ॥ ४ ॥

पुढें देखतां रावणा कोप आला। पदीं झाडिलें ताडिलें सुग्रिवाला।
मदें मातले दूर टाकून शंका। कळा लाविली नीकरें एकमेकां॥ ५॥
बहू कोपले मल्ल-युद्धासि आले। रिपू भीडतां अंग अंगीं मिळाले।
बळें हाणिती पृष्ठिसी वज्रमुष्टी। दणाणीतसे त्रीकुटीं सर्व सृष्टी॥६॥
विरश्री-बळें वीर झोंबीस आले। झडा[1] चांचरा भूतळामाजि गेले।
पुढें रावणें देह संकोचवीलें। अनर्थास भीऊनि गंतव्य[2] केलें॥ ७ ॥

१ धडपडत. २ गमन.

कपीनाथ तो येश घेऊनि आला। रिपू-गर्व हो सर्वही भग्न केला।
नमस्कारिलें राघवा ते प्रसंगीं। कपी-भार ते सर्व आनंद-संगीं ॥८
कपीशीं सुवेळाचळा राम आला। असंभाव्य तो वीर-मेळा मिळाला।
दळें भूतळीं लोटले भार सैरा। पुढें आणिलें राज-नीतीविचारा॥

कपी शोधितां शोधितां लक्ष कोटी।
तयांमाजि हा अंगदू वीरजेठी।
बळें आगळा दक्ष चातुर्य जाणे।
वयें अल्प लावण्य तारुण्य बाणे॥ १०॥

स्तुती-उत्तरीं राम बोले तयासी।
ह्मणे धन्य गा अंगदा गूणराशी।
मिळालासि तूं आमुच्या स्नेह-वादा।
विवेकें तुवां सोडिलें पितृ-द्वंद्वा॥ १०॥

बहूतांपरी राघवें गौरवीला। तेणें शोभला शीघ्र ऊदीत जाला।
प्रती-उत्तरें अंगदें स्तुति केली। उभा दृष्टि हे राम-पायींच ठेली॥
पुढें आपुला विक्रमू वाड बोले। महावीर ते सर्व चकीत जाले।
तया अंगदा थोर आवेश आला। तेणें राघवा थोर संतोष जाला॥
ह्मणे रामराणा तया अंगदासी। त्रिकूटाचळीं भेट रे रावणासी।
तया सांग रे भीम पुरुषार्थ माझा। वदे सर्व संहारिशी कोण काजा॥
प्रसंगोत्तरें अंगदा त्वां वदावें। बहूतांपरी रावणा बोधवावें।
सिताकारणीं युद्ध मागून घ्यावें। परी शेवटीं भाग तोडून यावें॥

नमस्कारिलें त्या रघूनायकाला।
समस्तांसि सन्मानिलें सिद्ध जाला।
कपी रामआज्ञेसि घेऊनि माथां।
उडाला बळें चालिला व्योमपंथा॥ १६॥

नभामाजि झेंपावला वेग केला। बळें शीघ्र लंकापुरीमाजि गेला।

---

१ गमनमार्ग.

अकस्मात खालावला व्योम-पंथें।रिपूची सभा बैसली भीम जेथें १७
पुढें पावला तो सभेमाजि कैसा। कपी राक्षसां भासला काळ जैसा।
रिपू शस्त्रपाणी बळें सिद्ध जाले।उगे सर्व कोणासि कोणी न बोले
कपीनें सभा सर्व आमान्य केली। पुढें रावणू लक्षिला भेटि जाली।
मनीं पाहतो तों रिपू उच्च होतो। महापुच्छसिंहासनीं बैसला तो १९
रिपू सर्वही बैसले स्तब्ध जाले। तयालागिं हा अंगदू काय बोले।
पुढें बोलतां बोलतां येरयेरां। बहूसाल धिक्कारिलें थोरथोरां २०
बहूतांपरीच्या बहू शब्द-याती। महा वीर तोंडागळे गर्जताती।
रिपू घोर तो आपुलाल्या वंगत्रें। बळें मातले हाणिती शब्दशस्त्रें
बहू बोलती बोल नानापरीचे। महा युक्तिचे भक्ति संख्या रसाचे।
तया बोलतां मातला शब्दसिंधू।असंख्यात संख्या नसे तो अगाधू
बहूतांपरी रावणू बोधवीला। परी नायकें मानसीं गर्व केला।
ह्मणे काय रे पाहतां घ्या कपीला। महावीर तो अंगदू अक्रमीला ॥
कपीनें बळें थोर उड्डाण केलें। सभामंडपा मस्तकीं शीघ्र नेलें।
रिपू घोर तेही भयातूर जाले। धिराचे बहू स्तंभझोंकें उडाले २४
विरें अंगदें त्रीकुटीं ख्याति केली। नभीं अंतराळीं बळें झेंप भेली।
बळाचे भुजीं मल्ल राक्षेस कैसे। गळाले तळीं मारिले सर्प जैसे ॥२५
पुढें अंगदू भेटला रामचंद्रा। नमस्कारिलें आदरें त्या नरेंद्रा।
कपी सर्वही तो समाचार सांगे। ह्मणे शत्रुचा गर्व ताठा न भंगे २६
बहू बोलिलों जी तया रावणासी। परी नायके मातला गर्वराशी।
भिजेना जळामाजि पाषाण जैसा। धरीना मनीं सांगतां शब्द तैसा
बहूसाल त्या रावणें गर्व केला। रघूनायका कोप तत्काळ आला।
ह्मणे राम गा सुग्रिवा ये प्रसंगीं। त्रिकूटाचळू पालथा घालि वेगीं ॥
कपींद्रू वदे शीघ्र सेनापतीला। निळें सर्व सैन्यास संकेत केला।
बळें चालिलीं तीं दळें वानरांचीं। अयूधें करीं शैलशृंगादिकांचीं

---

१ मुखानें.

कपी क्षोभले गर्जती मेघ जैसे। बळें भार ऊठावले शीघ्र तैसे।
महा घोर घोषें भुमीकंप जाला।त्रिकूटाचळा थोर कल्पांत आला
हुडे कोट आटोपिले लंकनाथें। कपीभार झेंपावले व्योमपंथें।
महायुद्ध आरंभिलें एकमेकां। बळें घेतली वानरीं शीघ्र लंका॥३१
त्रिकूटाचळीं वानरीं वेग केला। कपीराक्षसांतें महामार जाला।
बहू कोपले वीर ते चंडकोपा। बळें हाणिती मस्तकीं वज्रथापा॥३
ग्रिवा तोडिती मोडिती पंजरातें। कपी झोडिती पाडिती वृक्षघातें।
रिपू भांडतां थोर आवेश पोटीं। बळें वोढितां हात घालोनि झोटीं
कपी कोपले गर्जती युद्धकाळीं। शिळा टाकिती पाडिती दुर्गपौळी
गिरी हाणिती थोर नेटें धडाडी।बळें लागतां दिव्य लंका घडाडी
त्रिकूटाचळीं लोटली सर्व सेना। असंभाव्य ते भार लंका दिसेना।
कपी क्षोभले गर्जती काळ जैसे। दळेंशीं बळें धांवती वीर तैसे ३५
दळें पायिचीं थोर अश्वां गजांचीं। रणीं चालिलीं दाट थाटें रथांचीं
बहू भार शृंगारिले राक्षसांचे। महावीर ते घोर नानापरीचे ॥३६॥
रणीं पातली ते भयातूर सेना। रजें[३] मातलीं चंद्र सूर्यो दिसेना।
बहूसाल वाद्यें बहूतांपरीचीं। महा कर्कशें वाजती राक्षसांचीं॥३७
समारंगणीं चालिले राजभारें। दळें दाटलीं वानरांचीं अपारें।
बळें हाणिती एकमेकां धबाबां। झरे लागले शोणिताचे थबाबां॥
पुढें धांविले पायिंचे शस्त्रधारी। जयां देखतां रोम आंगीं थरारी।
कपी राक्षसांतें महा मार जाला। तेणें शोणिताचा नदी पूर आला
रणीं तोडिती वीर वीरां धसासां। भगाडें बहू पाडिती ते घसासां।
बळें टोंचिती शूळ पोटीं भसासां। शिरें फोडिती मुष्टिघातें ठसासां
पुढें झुजतां भार ते मृत्यु पावे। करीती बळें वीर मागें उठावे।
कपी कोपले थोर काळाग्नि जाले। रिपू पायिंचे सर्वही भग्न केले॥
निमाले रणीं देह त्या पायिच्यांचे। बळें ऊठले भार त्या राउतांचे

१ माना. २ किल्यांचे तट. ३ धुळी.

देहे टाकिती झुंजती स्वामि-काजा पुढें धांवती वीर मागील फौजा
कपी झुंजतां भंगल्या अश्व-याती। रणीं लोटलीया बळें भद्रजाती
गिरीसारिखे थोर किंकोटघोषें। गर्जीं वानरां त्रासिलें हो विशेषें।
कपीराज ते हाणिती मत्त हस्तें। बळें झोडिती कुंजरें स्वस्तव्यस्तें।
दळें पायिंचीं अश्व-रत्नें अपारें। रणीं पाडिलीं कुंजरें थोरथोरें ४४
कळेना महामार त्या वानरांचा। रणीं थोर संहार केला गजांचा।
तया पृष्ठिभागीं पुन्हा भार आले। रिपू वानरीं सर्व संहार केले ४५
पुढें चालिले भार नाना रथांचे। बहू बाणजाळें कपी-सैन्य खोंचे।
रणीं धांवती चक्रचाली घडाडां। कपी टाकिती चंडशीळा धडाडां
रथी सारथी सर्वही चूर्ण केले। महा वीर ते भार मागूनि आले।
रणीं राक्षसांते क्षयो प्राप्त जाला। जयो वानरां शीघ्र टाकून आला
रणीं मारुतें पाडिला जंबुमाळी। सुखेणें विदूणा पुढें तेचि काळीं।
विरें सुग्रिवें क्षिप्र भट्टांशिं द्वंदें। बळें झोडिलें वज्रमुष्टीस मैंदें ॥४८
द्विवीदा करें वज्रस्पर्शू निमाला। नळें ताडिलें शीघ्र प्रातीपनाला।
रणीं लक्ष्मणें भेदिले वीरुपाक्षा। चतुर्थांशिं रामें शरें एक शिक्षा॥
बळीं राक्षसांचे हहाकार जाला। दळेंशीं बळें वीरुपाक्षू निमाला।
कपी राक्षसांची बहूसाल सेना। रणीं माजलें युद्ध तें वोहटेना५०
निशी प्राप्त जाली रणीं घोर मारें। महावीर ते झुंजती अंधकारें ॥
बळें हाणिती कोण कोणा कळेना। विरश्री-बळें मातले ते ढळेना॥
पुढें शीघ्र चंद्रोदयो शुद्ध जाला। दिसों लागलें राक्षसां वानरांला
रिपू हाणिती एकमेकां कडाडां। नद्या वाहती शोणिताच्या भडाडां
कपी वीर चंद्रोदयाच्या उजेडें। बळें हाणिती एकमेकां निवाडें।
दळें भांडती राक्षसां वानरांचीं। असंभाव्य भ्यासूर प्रेतें विरांचीं।
कपी तापले कोपले वीर जेठी। बळें ताडिले दैत्य कोट्यानुकोटी॥
समारंगणीं आटली सर्व सेना। रणीं राक्षसां येश येतां दिसेना।

---

४ १ किंकाट्यांच्या गर्जनेनें. २ सुषेणानें.

क्षयो प्राप्त जाला बहू राक्षसांतें। पुढें युद्ध आरंभिलें इंद्रजीतें।
दिसे पाहतां सर्वही यश गेलें। तया राक्षसें शीघ्र कापटय केलें।
अकस्मात तो इंद्रजीतू उडाला। नभोमंडळीं रावणी गुप्त जाला।
पुढें घोर नीशाचरें तेंचि काळीं। कपी पाडिले सर्वही सर्पजाळीं।
बहू सर्प झेंपावले व्योमपंथें। बळें धांवती वानरी सैन्य जेथें।
महा काळ कर्कोट नानापरीचे। रणीं पाडिती भार गोळांगुळांचे॥
कपींची पडों लागली सर्व सेना। पुढें पाहतां युद्ध-कर्ता दिसेना।
गमे सर्व आकाश व्यालें विखारीं। बळें झोंबती सर्पकूळें जिव्हारीं।
कपी-भार ते सर्व निर्जीव जाले। निचेष्टीत ते राम-सौमित्र केले।
रिपु पाडिले थोर आनंद जाला। पुढें शीघ्र लंकापुरीमाजि गेला।
नमस्कारिला राव तो आदरेंशीं।तये पुत्र आलिंगिला सौख्य-राशी
अती आदरें सुंदरें रम्य सारें। पिता अंगिचीं दे अलंकार चीरें॥६
ह्मणे हो रणीं शांति केली रिपूची।बळें सर्वही त्या रिसां वानरांचीं
बहूतांपरी राव संतोषवीला। निरोपेंचि तो भूवनामाजि गेला ६१
बहू सूख जालें तया रावणाशी। तयें शीघ्र पाचारिलें त्रीजटेशी।
ह्मणे हो विमानीं सिता बैसवावी।रिपू मारिले शीघ्र तेथेंचि न्यावी
रणीं पाडिले ते तये दाखवावे। सिता वीट मानील ऐसें करावें।
बहूतांपरी रावणें शीकवीली। वनामाजि ते त्रिजटा शीघ्र गेली॥
पुसे जानकी ते तये त्रीजटेला। सभामंडपीं कोण वृत्तांत जाला।
ह्मणे त्रीजटा सोडि चिंता स्वभावें। रणामंडळा राजआज्ञेस जावें
अहो जानकी दुःख चिंतीन तूतें। तरी देह माझा पडो वज्रघातें।
ह्मणे सोडि चिंता सिते सर्व कांहीं। तया लंकनाथा जयो प्राप्त नाहीं
सिता ऐकतां शोक सांडूनि ठेली। तये त्रीजटेची बहू स्तूति केली
पुढें बैसल्या शीघ्र दोघी विमानीं।रणामेदिनी पावल्या घोर वाणी
पुढें पाहतां लक्ष कोट्यानुकोटी। रणीं पाडिले हुंबती वीर जेठी।

---

१ रावणपुत्र.

धडें तूटलीं राक्षसां वानराचीं । शिरें दाटलीं घोर माहाविरांचीं ॥
भयासूर हा घोर संहार जाला । रणीं राक्षसां वानरां अंत आला ।
असंभाव्य उत्पाटिले वृक्ष जैसे । रणीं भग्न केले महा वीर तैसे ॥६८
असंभाव्य ते तूटले पादपाणी । धडें मस्तकें थोर विक्राळत्राणी ।
बहू जाहली मेदमांसें चिडाणी । महा दर्प ते माजली वोरढाणी ६९
रणीं एक ते छेदिले सर्व अंगीं । तेणें काळिजें दीसती पृष्ठ-भागीं ।
शिरें तोडिलीं मेंदु नीघे बरारां । बहू घाय ते रक्त वाहे झरारां ७०

कितीएक ते वीर जाले उताणे ।
किती पालथे दीसती दैन्यवाणे ।
कितीएक ते वीर घालूनि मेटें ।
भुमी पीटिती थोर दुःखें ललाटें ॥ ७१ ॥

कितीएक भूमी वमीती अशुद्धें । कितीएक ते मोडले माज मध्यें ।
कितीएक ते वीर चौरंग जाले । कितीएक ते दूधडी भग्न केले ॥७२
कितीएक ते मुंडकीं हीन जाले । कितीएक वक्षस्थळीं चूर्ण केले ।
कितीएक तीं तूटलीं जानुघोटीं । कितीएक ते कंठ बोटीं ललाटीं ॥
कितीएक वोटारिती तीव्र डोळे । निघाले बहू पोटिंचे मांसगोळे ।
पितें चारटें फोफसें रक्त मेंदू । शिसें आंतडीं कातडीं मूळ कंदू ७४
कितीएक जालीं शिरें चूर चेंदा । बहू दाटलासे रणीं रक्त-रेंदा ।
कितीएक हुंकारिती दैन्यवाणी । कितीएक ते मागती अन्न पाणी॥
कितीएक ते खूडितीपाद पाणी।कितीएक ते शब्द कारुण्य वाणी
कितीएक ते दंशिती भूमि दंतीं। कितीएक ते लागले मृत्युपंथीं॥७
शिरें राक्षसांचीं धडें वानरांचीं । रणीं लागलीं एकमेकां विरांचीं ।
विरा शाकटा कुंजरा घोडियांचीं ।रिसां वानरां सर्व इत्यादिकांचीं
नदी शोणिताचे महापूर जाती । धडें कोथळे फूगले वाहताती ।
शिरें पाद पाणी बहू मांस माळा।धन खेटकें भातड्या त्या विशाळा

---

१ ओरडाओरड. २ शकट.

गिधें श्वापदें तीं असंभाव्य आलीं।स्वइच्छा बहू मांस भक्षूं निघालीं
भुतें सर्वही ओट कोटी मिळालीं। बहूतां परीचीं बहू तृप्त जालीं७९
पुढें जानकी बोलिली त्रीजटेशीं। रणीं पाडिलें सर्वही वानरांशीं।
महा वीर ते कोण वेळा तयांतें। ह्मणे त्रीजटे दाखवीं सर्व मातें॥८०
रणीं त्रीजटा दाखवी जानकीशी। महा वीर ते पाडिले नाग-पाशीं
दिसे राम सौमित्र तोही निमाला। पुढें जानकीनें महा शोक केला॥
बहूतांपरी जानकी शांत केली। तये त्रीजटा शीघ्र घेऊनि गेली।
समाचार सांगे तया रावणाला।वनामाजि आली सिता रक्षणाला

कपी सर्वही पावले मृत्युपंथू।
जिती मारुती आणि नैर्ऋत्यनाथू।
जयालागिं जाली दया राघवाची।
पहाया तया शक्ति काळाशि कैंची॥ ८३॥

रणें शोधिलीं सर्व बीभीषणानें। विरां लागिं आश्वासिलें थोर मानें
पुढें दृष्टिनें पाहिलें राघवानें। गरूडास्त्र नीरूपिलें व्योमजानें ८४
तयालागिं प्रायोजिलें शीघ्र पंथें। असंभाव्य झेंपावले व्योमपंथें।
उड्या घालिती पक्षिकूळें झडाडां। बळें तोडिती सर्पकूळें तडाडां॥
विहंगीं तिहीं सर्पसंहार केला। कपीभार तो मोकळा सिद्ध जाला।
गिरीशीखरीं सर्व सेना घडाडी। त्रिकूटाचळीं घोष तेणें धडाडी८५
ह्मणे रावणू थोर आश्चर्य जालें। कपीचक्र तें सर्व निर्जीव केलें।
सुतें वैरियां दाविली थोर ख्याती। रणीं मागुती ते कपी गर्जताती
रणीं शत्रु जिंकील धूम्राक्ष नामा। तया पाठवी जे प्रभू सार्व-भौमा
पुढें मंत्र ऐकों नका मंत्रियांचा। वदे रावणू आदरें त्यासि वाचा॥
ह्मणे गा विरा शीघ्र तूं ये प्रसंगीं। रिपूलागिं मारावया जाय वेगीं॥
अलंकार देऊनियां तोषवीला। महावीर धुम्राक्ष युद्धा निघाला॥
रणीं वीर धूम्राक्ष तो वज्रदंष्ट्री। तिजा अंकपू चालिला मारपृष्ठीं।

१ बिभीषण. २ इंद्रानें.

रणामंडळीं थोर संहार केला। पुढें राक्षसांतेंक्षयो प्राप्त जाला ९
बहू युद्ध केलें तया राक्षसानें। महावीर धूम्राक्ष त्या अंकदानें।
बळें दोघेही मारिले मारुतानें। रणीं वज्रदंष्ट्री तया अंगदानें॥९१
महावीर ते झुंजतां भग्न जाले। बहूसाल घायाळ धाकें पळाले।
तिहीं सर्व सांगीतली युद्ध-वार्ता। तेणें रावणामानसीं थोर चिंता॥
रणीं राक्षसांतें क्षयो प्राप्त जाला। प्रहस्तू पुढें शीघ्र युद्धा निघाला।
कपी राक्षसां थोर संहार जाला। निळें झोडिला पाडिला भग्न केला॥
पुढें रावणू चालिला लागवेगें। तयालागिं मंदोदरी नीति सांगे।
न मानीत तो चालिला आवरेना बळें लोटली ते असंभाव्य सेना ९४
महावीर झुंजार ते भार आले। बहूसाल शृंगार-मंडीत जाले।
बळें पुत्र-प्रधान-मेळा मिळाला। रणामंडळा रावणू शीघ्र आला ९५
बहू त्रासिलें सैन्य गोळांगुळांसें। रिपू-बाण-जाळें बहू सैन्य खोंचे।
महावीर तेही बळें भग्न केले। पळाले कपी राघवा आड गेले॥९६॥
बहू त्रासिले राक्षसांचेनि बाणीं। कपी-भार ते बोलिले दैन्यवाणीं।
चळें कांपती खोंचति देति धापा। बळें रक्षिं गा राघवा मायबापा॥
तया देखतां राम कार्मुक वोढी। पुढें शीघ्र सौमित्र तो हात जोडी।
ह्मणे वीर तो स्थिर व्हावें समर्थं। करीतों बळें भग्न त्या रावणातें९८
रणीं रावणा वीरसामर्थ्य नेलें। नटे नीळ माया तया भग्न केलें।
पुढें शीघ्र पाचारिलें रावणाला।महा वीर सौमित्र युद्धा निघाला ९९
सुमित्रा-सुता रावणा युद्ध आतां। पुढें देइंजे आदरें चित्त श्रोतां।
ह्मणे दास हा वीर कोदंड-पाणी। रणीं रावणालागिं त्रासील बाणीं

प्रसंग ३ रा समाप्त.

---

चवथा प्रसंग.

दशाशीर सौमित्र युद्धा निघाले। समारंगणीं वीर सम्मुख जाले।

महावीर संग्रामआवेश पोटीं। पुढें देखिलें येकमेकांसि दृष्टी ॥ १ ॥
बहूसाल धिक्कारिलें येरयेरां। बहू सोडिलीं बाणजाळें सरारां ।
दळीं टाकिती थोर शस्त्रें शरांचीं। बळें तोडिती एकमेकां विरांचीं २
रणीं भीडतां हाणिती एकमेकां। ह्मणे रावणू वीर हा थोरु नीका ।
पुढें शक्ति काढूनियां ब्रह्मयाची। बळें सोडिली वोळि विद्युल्लतेची ॥
शरें वारितां बैसली शक्ति अंगीं। रणीं वीर सौमित्र तो देह त्यागी।
पुढें धांवला रावणू शीघ्र तेथें। बळें ताडिता जाहला मुष्टि-घातें॥४॥

तया देखतां मारुती कोप आला।
अकस्मात तो व्योम-पंथीं उडाला।
कठोरें करें ताडिलें वज्रमुष्टी।
वमूं लागला रावणू रक्तसृष्टी॥ ५ ॥

रिपू रावणू मागुता शीघ्र गेला। पुढें लक्ष्मणू ऊठला स्वस्थ जाला
पुन्हा रावणू कोपला काळरूपी। विरां राक्षसांमाजि चंडप्रतापी ॥
दहा मस्तकीं त्या दहा दिव्य छत्रें। पताका बहू मत्स्य मार्तंड-पत्रें।
महावैभवेंसीं रथारूढ जाला। तया मागुती थोर आवेश आला॥७॥
बहू बाणजुंबाड वाहोनि पृष्ठीं। दहाही धनुष्यें करीं दृढ मुष्टी ।
करूं लागला मागुती बाणवृष्टी। रघूनायकें देखिलें त्याशि दृष्टी ॥८
उभा राहिला राम वज्रांग ठाणें। करीं सज्जिलें चाप चंद्रार्ध-बाणें।
दहा हेममूगूट छत्रें धनूष्यें। बळें तोडिलीं पाडिलीं तीं निमेषें ॥ ९ ॥
पुढें रावणू तो भयातूर जाला। बहूतां परी राघवें शीकवीला।
ह्मणे जाइं रे रक्षिलें आजि तूला। रिपू प्राण घेऊनि तैसा पळाला१०
महा मेघनादू असे नाम ज्यासी। पळे लंकनाथासवें तो त्वरेंसी।
तयासारखीं मूढ मूढें मिळालीं। रणीं भ्रष्टलीं सर्व मागें पळालीं ॥११
न पाहात मागें पुरीमाजि गेले। विरांमाजि कोणी कुणासी न बोले।
पुढें सर्वही मंडपामाजि आले। समस्तांशि तो रावणू काय बोले१२

भयातूर लंकापती दैन्यवाणा। ह्मणे ऊठवा हो बळें कुंभकर्णा।
तया वीण आणीक कोणा दिसेना। रिपू घोर हा थोर संहारवेना १३
पुढें धाडिलें शीघ्र माहोदराला। महा घोर वाद्यें बळें सिद्ध जाला।
किती एक ते धीट मोठे पळाले। कितीएक पोटीं भयातूर जाले॥१४
निजेला जरी भीतरी कुंभकर्णू। दिसे काळ विक्राळ तो मेघवर्णू।
शरीरें भयासूर हा घोर रूपी। विरां भासला मृत्यु येमस्वरूपी॥१५
तया ऊठवितां भयातूर जाले। महावीर ते कंप अंगीं उदेले।
पुढें जाहले धीट ते नेटपाटें। उभीं पाहती सर्व नैर्ऋत्यथाटें ॥ १६ ॥
बहूसाल वाद्यें बहूतां परींचीं। महा कर्कशें चंड घोरध्वनींचीं।
तयाच्या पुढें जाहला एक वेळा। नभोमंडळीं नाद गेला भुगोळा १७
गदा तोमरें हाणिती वज्रघातें। महा मार आरंभिला राक्षसांतें।
कळा लाविती टाकिती वृक्ष नाना। गळाले परी कुंभकर्णू उठेना १८
शिळा टाकिती टोंचिती शूळ शस्त्रें। महा घोष संपूर्ण तो कर्णपात्रें।
बळें लोटले मस्त ते हस्ति वेगीं। शरीरावरी चालती ते प्रसंगीं ॥१
विरा ऊठवाया बहू यत्न केला। परी नूठतां सर्वही व्यर्थ गेला।
तया मारितां हिंपुटे वीर जाले। उठेना महा वीर सर्वै गळाले॥२०॥
नव्हे कार्य तेणें बहूसाल शंका। पुढें बोलती वीर ते येकमेकां।
उठेना महा वीर कैसें करावें। तयीं अंतरीं जाहलें वर्म ठावें ॥ २१ ॥
तया किन्नरी रम्य गाती विशेषें। अलापें शिळा वीरती तोय जैसें।
जयांचेंनि नट्वांग लावण्य-वेषें। मनीं होय शक्रादिकां काम-पीसें॥
तयांलागिं बोलाविलें आदरेशीं। पुढें आलिया गायकी स्वर्गवासी।
करीं टाळ मृदंग यंत्रें उपांगें। बहू गीत संगीत तें रागरंगें ॥ २३ ॥
सुखें भोगिती देव त्या गायनाचीं। मनें धांवती ऊर्ध्व शेषादिकांचीं
सुधा सेवितां त्यापुढें वीष वाटे। खरा सुस्वरें अमृतानंद लोटे॥ २४
तिथें गायनाची कळा रम्य जाली। तेणें कुंभकर्णाशि जागृति आली

---

१ राक्षससमूह.

भुकेला दिसे बैसला काळ जैसा। बहू भक्षिलें शोणिता मेदमांसा॥
रिपू सिद्ध होऊनि लंकेंत चाले। कपी देखतां ते भयातूर जाले।
उभा राहतां शीर बाहेर आलें। रघूनायकें थोर आश्चर्य केलें॥२६॥
पुसे आदरें राम बीभीषणाला। महावीर हा कोण हो सिद्ध जाला।
कथी सर्व साकल्य तो मंत्र त्याचा। ह्मणे राघवा बंधु हा रावणाचा
बळें आगळा वीर हा कुंभकर्ण। महा पर्वतासारिखा मेघवर्ण।
समारंगणीं काळ भीडों शकेना। सखा बंधु हा रावणा होय साना॥
पुढें कुंभकर्णू सभेमाजि गेला। नमस्कारिलें भेटला रावणाला।
ह्मणे भोगणें लागलें कर्म केलें। सिता आणितां दुःख हें प्राप्त जालें॥
मनीं भंगला राव जाणोनि तेणें। पुन्हां तोषवीला विरें कुंभकर्णें।
रिपू मारणें हेचि आज्ञा प्रतिज्ञा। उभा राहिला शीघ्र घेऊनि आज्ञा॥
पुढें पावला तो रणीं शीघ्रकाळें। दळेंशीं बळें चालिला एक वेळे।
कपी ग्रासिले त्रासिले घोर मारें। समारंगणीं लागले घायवारे॥ ३१
रिसां वानरां मांडिली थोर आटी। कपी गींळिले लक्ष कोट्यानुकोटी
उठे सृष्टि भक्षावया काळ जैसा। रणीं वावरे तो महा वीर तैसा॥३२
रिपूभार तो भक्षिला भग्न केला। कपीनाथ काखे दुपाडें उडाला।
पुरी पावतां पावतां सुग्रिवानें। त्वरेनें पणू सिद्ध केला विरानें॥ ३३
तया सुग्रिवें कर्ण नाशीक नेलें। पुढें पाहतां दर्पणीं दुःख केलें।
ह्मणे व्यर्थ आतां जिणें रूप-हाणी। रणीं लोटला मागुती शूळपाणी
बहू कोपला वीर राक्षस कैसा। कडाडी बळें थोर काळाग्नि जैसा।
कपी-वाहिनीची[1] मनीं सांडि केली। रणीं रामचंद्रा उजू धांव घाली।
तया राक्षसें खांडिल्या वज्रदाढा रणीं राघवें वाहिला चंडमेढा।
बळें लागतां मेरु-मांदार फोडी। रघुनायकू क्रूर तो बाण सोडी ३६
रणामाजि तें तीव्र संधान ऐसें। गिळूं लागला आदरें खाद्य जैसें।
बहू सोडिले बाण कोट्यानुकोटी। बळें राक्षसें घातले सर्व पोटीं॥

---

१ सेनेची.

मुळासारिखे बाण पोटीं निघाले। असंभाव्य मध्येंच ते गुप्त जाले।
महा घोर संधान या राघवाचें। गिळीतो रणीं कोण सामर्थ्य याचें॥
महा घोर त्या मुद्गलाचेनि घातें।रणीं हाणिता जाहला राघवातें।
रघूनायकें छेदिला वामबाहो। भुमी चालिला शोणिताचा प्रवाहो॥
रणीं जाहलें हस्त सव्यांग ऊणें। पुढें दैत्य तो कोपला कोटिगूणें।
बळें ताळ उत्पाटिला वाम हस्तें। रघूनायकें तोडिला बाण-घातें॥
बहू कोपला दैत्य सम्मूख आला रणीं पाद छेदूनि चौरंग केला।
पदें वीण चाले महा सर्प जैसा। बळें ऊदरें चालिला वीर तैसा॥ ४१
पुढें राघवें शीर छेदूनि नेलें। बहूसाल तें व्योम-पंथें उडालें।
रणीं कोथळा फोडिला बाण घातें। महा वीर तो चालिला मृत्यु-पंथें
तया देखतां वीर मागें पळाले। भयें शीघ्र लंकापुरीमाजि गेले।
पुढें देखिला रावणू मेघवर्णू। तया सांगती पाडिला कुंभकर्णू॥ ४३
करूं लागला रावणू शोक भारी। पुढें त्रीशिरा त्याशि बोधें निवारी
ह्मणे हो रणीं आजि युद्धासि जातों।रिपू थोर सामर्थ्य याचें पहातों
महावीर तो त्रीशिरा प्राप्त जाला।सुतां आणिकां थोर आवेश आला
करूं लागले पुत्र मंत्री प्रतिज्ञा। निघाले बळें शीघ्र घेऊनि आज्ञा॥
महा मत्त माहोदरू सिद्ध केला। तुरंगीं नरा अंतकू स्वार जाला।
बहूसाल तेजाळ तो खड्ग हातीं। बळें चालिले वीर ते राज-पंथीं
रणीं शूर देवांतकू त्रीशिरा हा। अतीकाय तो वीर पारुश्व माहा।
बळें चौघहि चौरथी स्वार जाले। दळें लोटलीं विक्रमेशीं निघाले॥
निघाले बळें भार साही जणांचे। महावरि ते गर्जती विक्रमाचे॥
रणामंडळीं पारखे वीर कैसे। दळेंशीं बळें धांवती काळ जैसे॥ ४८
महा मार दोहीं दळीं एक जाला। कपी वीर राक्षेस कीती निमाले।
पुढें वानरीं घोरघातें निघातें। रणीं भग्न केलें तयां राक्षसांतें॥ ४९
तयां देखतां लोटला दिव्य घोडा। नरां-अंतक कोपला वीर गाढा।

बळें हाणितां शस्त्र वाजे घडाडां । तुटों लागले पादपाणी थडाडां ।
बहू वेग संहारिती सर्व सेना । कपी पाहती अश्व कोठें दिसेना ।
पुढें पाहतां पाहतां लागवेगीं । अकस्मात तो आदळे खड्ग अंगीं ।

बहूसाल तेणें रिसां वानरांच्या ।
ग्रिवा कापिल्या थोर माहाविरांच्या ।
कपी-वाहिनीचा रणीं आट जाला ।
भुमी लोटिले शोणितें पूर आला । ५२ ।

कपी वीर ते खोंचले भग्न जाले । महामार देखोनि वेगें पळाले ।
कितीएक ते सुग्रिवा आड गेले । पुढें अंगदें सर्वही स्वस्थ केले ५६
उणें देखिलें धांवला शीघ्र कोपें । बळें ताडीला अश्व तो वज्र-थापें
नरा-अंतकाला रणीं अंत आला । बहू मेद-मांसें भूमी गाळ जाला
नरा-अंतका मारिलें अंगदानें । पुढें वीर ऊठावले घोर त्राणें ।
रणांमडळामाजि ते शीघ्र आले । तया अंगदाही कपी साह्य जाले ।
करी नीळ तो युद्ध माहोदराशीं । महावीर देवांतकू मारुताशीं ।
भिडे त्रीशिरा पार्श्व तो ऋषभेंशीं ।बळें झुंजती चौघे तीघांजणांशीं
पुढें मांडिला थोर संहार तथें । रणीं माजलीं तें बहूसाल प्रेतें ।
महावीर ते धीर संग्राम-सैरें । बळें धांवती एकमेकां पुढारें । ५७ ।
विरश्रीबळें दूर टाकूनि शंका । रणीं हाणिती घाय ते एकमेकां ।
महा थोर संग्राम साही जणांचा । पुरीं पूरला अंत त्या राक्षसांचा
गजारूढ माहोदरू त्या निळानें । रणामाजि देवांतकू मारुतीनें ।
महा वीर पारश्व त्या ऋषभानें । रणीं झुंजतां पाडिले थोर मानें ।
बळें कोपला तो अती चंडकाया । रथू लोटिला शत्रु तेणें जिताया
कपी वीर ते आडवे शीघ्र आले । पुढें चालतां सर्वही भग्न केले ६०
रथीं बैसला पर्वतासारिखा तो । ह्मणे राम हा कोण युद्धासि येतो ।
वदे शीघ्र बीभीषणू रम्य वाचा । रघूनायका पुत्र हा रावणाचा ६१

---

१ माना. २ सेना. ३ बळ.

सखा होय सौमित्र तुह्मांसि जैसा। अतीकाय तो मेघनादासी तैसा
न लेखी कपी-वाहिनीचा उठावा तुह्मीं कीं सुमित्रा-सुतें हा वधावा

ह्मणे त्यासि पाहा बरें रावणारी।
उभा राहिला शीघ्र कोदंड-धारी।
विरश्रीबळें बाणली दिव्य शोभा।
रणामंडळीं ठाण मांडूनि ऊभा। ६३।

पुढें राघवें ओढिला बाण जैसा। वदे आदरें वीर सौमित्र तैसा।
पहावें घडी एक राजीवनेत्रें। वधीतों बळें दैत्य मूहूर्त-मात्रें ॥६४॥
पुढें पावला तो अतीचंड काया। बहू बोलती एकमेकां छळाया।
तयां एकमेकांस निर्वाण जालें। शरां सोडिलें व्योम संपूर्ण केलें ॥
शरां तोडिती एकमेकां विराचे। पुन्हा मागुती भार येतां शरांचे।
बळें भीडती बाणबाणांस कैसे। पडों लागती छेदिले सर्प जैसे६५

शरीं राक्षसें व्योम संपूर्ण केलें।
विरें लक्ष्मणें शीघ्र छेदूनि नेलें।
रिपू कोपला मागुते बाण सोडी।
बळें वीर सौमित्र तत्काळ तोडी। ६८।

पुढें वीर रामानुजें तेचि काळीं। नभीं मंडपू घातला बाणजाळीं।
किती चूकले भार येतां शरांचे। देहे खोंचले एकमेकां विरांचे ६८
विरश्री-बळें दुःख नाहीं तयांचें। नभीं पाहती देव कौतूक त्यांचें।
दळें थोकलीं युद्ध होतां खणाणां। तया मस्तकू डोलवी रामराणा
भला रावणी वीर हा चंडदेही। दुजा मानवी वीर सौमित्र तोही।
महावीर दोघे रणामाजि कैसे। बळें मातले भीडती काळ जैसे ७०
पुढें शीघ्र सौमित्र तो वज्रठाणें। बळें तोडिलें शीर चंद्रार्ध-बाणें।
रणीं पाडिला तो अतीचंडकाया। बळें लागले दैत्य मागें पळाया
बहूसाल ते मृत्युपंथेंचि गेले। परी अल्प घायाळ मागें पळाले।

---

१ स्थिरावली.

पुरीमाजि जाऊन लंकापतीला। भयें सांगती सर्व संहार झाला७२

बहू झुंजतां झुंजतां भग्न जाले।
रणीं सर्वही पुत्र-मंत्री निमाले।
नरां वानरांला जयो प्राप्त जाला।
क्षयो रांक्षसां शीघ्र टाकूनि आला ॥७३॥

पुढें रावणू तो भूमी अंग घाली। तया ऐकतां मूर्छना शीघ्र आली
शरीरीं नसे शुद्धि सर्वै उडाली। बहू दैन्यवाणी दशा प्राप्त जाली

करी रावणू शोक शंकारहीतू।
सभा-मंडपीं धांवला इंद्रजीतू।
पिता शीघ्र आलिंगिला मेघनादें।
ह्मणे काय जी शीणतां व्यर्थ खेदें।७५।

बहूतापरी तो पिता शीकवीला। ह्मणे शीघ्र मारूनि येतों रिपुला।
तेणें रावणू शोक सांडूनि ठेला। बहू साळ सन्मानिलें त्या सुताला
बहू दीस होतीं गळां रत्नमाळा। तये पहातां मोल थोडें भुगोळा।
करीं घेतली माळिका आवडीनें। सुताच्या गळां घातली रावणानें
रणा चालिला वीर संग्रामसैरा। दळेंशीं बळें लोटला भार सैरा।
रथां घोडियां कुंजरां मीति नाहीं। बहूसाल वाद्यें पुढें एक घाई ७८
महा वैभवेशीं रणामाजि आला। तया इंद्रजीतें रणीं होम केला।
यथायोग्य पूर्णाहुतीचेनि तोषें। रथू दीधला अग्निवर्णू हुताशें७९॥
रथू तोमरू खड्ग बाणीं विराजे। वरी रावणी तो महा वीर साजे।
उडाला रथेंशीं बळें अंतराळें। असंभाव्य सोडी तळीं बाण-जाळें८०
बळें सूटले बाण त्या राक्षसाचे। बहू खोंचले भार गोळांगुळांचे।
फुटों लागले कोथळे पादपाणी। भयें बोलती वानरें दैन्यवाणी ८२
कितीएक ते वीर भेणें पळाले। पुढें जातजातांचि चौरंग केले।
कितीएक धाकें विरां आड जाती। अकस्मात तेथेंचि ते भेदिजेती

१ अग्नीनें.

कपीवाहिनीमाजि आक्रांत जाला। रणीं तो विरें वीर सर्वे निमाला
सुमित्रा-सुतू बोलिला राघवाला। बहू आट जाला रिसां वानरांला
पुढें बोलतां बोलतां तेचि काळीं। अस्कमात ते भेदिले बाण-जाळीं
निचेष्टीत भूमी धनुष्यें गळालीं। विरें इंद्रजीतें रणीं ख्याति केली
बळी रावणी एकला वीर जेठी। कपी पाडिले लक्ष कोट्यानुकोटी।
महावीर ते धीर मेरू-बळाचे। प्रतापें सुरांहूनि ते विक्रमाचे॥
रिसां वानरां सर्व संहार केला। पुरीमाजि तो पेश घेऊनि गेला।
नमस्कार केला तया रावणाला। दळेंशीं बळें रामशत्रू निमाला॥
रणीं सर्वही पाडिले प्रेतराशी। बहूसाल आनंद त्या रावणासी।
महा सूख लंका-पुरीमाजि ऐसें। पुढें वर्तलें वानरांमाजि कैसें॥

कपी रीस ते पर्वतातुल्य कैसे।
निमाले रणीं पाडिले वृक्ष जैसे।
तयांमाजि कल्याण दोघां जणांला।
कपी मारुती आणि बीभीषणाला॥

रणू माजलें सर्वही प्रेतरूपी। तयामाजि ते दोघ उद्विग्नरूपी।
विचारूनियां वन्हि-खीखाउ जेढें। रणा शोधिलें सर्व तीही निवाडें
रणा शोधितां सर्व सेनेसि अंत। तयामाजि, तो बोलिला जांबवंत।
पुढें वीर ते शीघ्र धांवूनि आले। तयां पाहतां बाण अंगीं बुडाले॥
बहूसाल तो रीस घायाळ जाला। बळी बाण-जाळीं रणीं आकळीला
महावीर बीभीषणें ऊठवीला। बळें बाण वोढूनियां स्वस्थ केला।
पुढें ऋक्ष बीभीषणालागिं पूसे। महावीर ते मुख्य आहेत कैसे।
ह्मणे जांबवंतासि नैर्ऋत्य-नाथू[1]। विरा पूससी काय जाला अनर्थू।
महावीर दोघे निचेष्टीत जाले। कपी सुग्रिवादीक सर्वे निमाले॥
रणामाजि ते शोधिली सर्व सेना। समस्तांमध्यें एक तोही दिसेना
प्रसंगीं निरूपी यथातथ्य मातु मनामाजि तो जांबवंतू नितांतू॥

---

१ राक्षसाचा राजा.

ह्मणे वीर बीभीषणू जाबवंता । समस्तांसि कल्याण तें सांग आत
ह्मणे ऋक्ष तो मारुतीवीण कांहीं।विरां ऊठवाया दुजा प्रेत्न नाहीं
महा रम्य द्रोणाचळू भव्यरूपी । तया मस्तकीं ओषधी दिव्यरूपी
बळें आणितां ऊठती सर्व सेना । कपी मारुतीवीण दूजा दिसेना
ह्मणे जाबवंतासि नैर्ऋत्य-नाथू । असंभाव्य तूं सांगशी दूर पंथू ।
गमे प्रेत्न हा सर्वथाही घडेना । गिरी मारुतीचेनिही आणवेना ॥
ह्मणे गा विरा काय तूं बोलिलाशी।कपींसारखा मारुता भाविताशी
परी जाण हा ईश्वरू साक्षरूपी । कळेना जना रुद्र पूर्ण-प्रतापी ॥
बहु स्तूति केली तया मारुताची । तये तोषली वृत्ति बीभीषणाची
ह्मणे गा विरा संकटीं धांव घालीं । बळें ऊठवीं सर्व सेना निमाली
कपी मारुती उत्तरें सिद्ध जाला । मनीं चिंतिलें राम-पादांबुजाला
महावीर आणील द्रोणाचळातें । पुढें वीनवी दास तो श्रोतयांतें

---

### प्रसंग ५ वा.

उभा राहिला वीर मंदार जैसा । मनाहूनि पूढें बळें वेग तैसा ।
रुपें कर्कशू पाहतां पाहवेना । बहूसाल उंचाट त्या राहवेना ॥
अकस्मात तो व्योम-पंथें उडाला। मही झोंकली पन्नगा भार जाला
बहू झोंकिले कूर्म वाराह दंती । झडा चांचरे ते धरा सांवरीती ।
स्फुरद्रूप सर्वांग वाजे झडाडां । उडाले नभीं वृक्ष वातें फडाडां ।
असंभाव्य पिंजारिलें पुच्छ मागें । नभोमंडळीं जातसे लागवेगें ।
बहू लंघिली पोकळी वेग केला । द्विपें पांचही शीघ्र टाकूनि गेला॥
उडाला बळें पांच सिंधू अगाधु । पुढें देखिला साहवा क्षीर-सिंधू ।
तयाच्या तिरीं उंच आकाशपंथें । विरें देखिलें रम्य द्रोणाचळातें ।
तया मस्तकीं दिव्य वल्ली अपारा।प्रभा फांकली तेजकल्लोळ सैरा
पुढें देखतां मारुता सांवरेना । धरीतां बळें तेज हाता चढेना ॥

---

१ डळमळे

महाओषधी दिव्य शैल्य निशैल्या कपी देखतां सर्वही गुप्त जाल्या
तया पर्वताची बहु स्तुति केली। परी नायके सर्व ही व्यर्थ गेली ॥
बहूसाल त्या आंचळें गर्व केला। पुढें मारुता कोप तत्काळ आला।
महा थोर धिक्कार केला तयासी। बळें शीघ्र उत्पाटिलें पर्वतासी ॥
गिरी घेतला पुच्छ वेष्टीत माथां। कपी-राज तो चालिला व्योमपंथा
रणीं जाहला सर्व संहार जेथें। महावीर आला अकस्मात तेथें ॥
निशा दाटली अंधकारें दिसेना। गिरी ठेवितां देखिली सर्व सेना
पिता पावला तो बळें मारुतीचा। रणीं वास नेला तया ओषधींचा
सुगंधेंचि ते वीर आरोग्य जाले। कपी सर्वही मृत्यु मारूनि ठेले ॥
दळेंशीं बळें ऊठला रामराजा। स्फुराणें रणीं गर्जती वीर-फौजा
पुढें मारुतें घेतलें पर्वताला। क्षिराब्धी-तटीं शीघ्र ठेवूनि आला ॥

तुळेना मती शक्ति भाहा विराची।
कळेना करी कोण संख्या बळाची।
दिसे पाहतां वानरू वेषधारी।
परी जाणिजे सत्य हा त्रीपुरारी[२] ॥ १२ ॥
निशीच्या पदें चारि कोटी उडाला।
गिरी दों पदीं शीघ्र घेऊनि आला।
पुन्हा मागुती तीपदांमाजि नेला।
प्रभातेचि चौथे पदीं प्राप्त जाला ॥ १३ ॥

सहस्रैक गांवें गिरी स्थूळ मोठा। असंभाव्य या मारुतीचा चपेटा।
उडाला नभीं योजनें कोटि सोळा। नसे शोधितां दूसरा या भुगोळा
बहू पंथ चाले रवी भार नाना। बहू भार वाहे फणी तो उडेना।
गरूडासि तो आचळू[१] हालवेना। दुजी साम्यता ब्रह्म-गोळीं दिसेना
पुढें मारुती भव्य आनंद-रूपी। नभोमंडळीं भानु जैसा प्रतापी।
महा वीर तैसा दळामाजि आला। समस्तांसि देखोनि आनंद जाला

१ पर्वत. २ शंकर.

सखा तो जिवाचा असे दूर देशीं ।
सदां लागलें चित्त हें त्याजपाशीं ।
पुढें पाहतां तो अकस्मात आला ।
तयासारिखें जाहलें मारुताला ॥ १७ ॥

कपीनें कसें पाहिलें राघवासी । पुढें देखिलें लोभियानें धनासी ।
तया बाळकें देखिलें जननीला । तयासारिखें जाइलें मारुताला ॥
नमस्कारिलें त्या रघूनायकासी ।उभा राहिला हात जोडोनि पाशीं
ह्मणे धन्य गा धन्य वीरा उदारा।कपी काय द्यावें तुझ्या ऊपकारा
अगा मारुती तूझिया ऊपकारें । जिवा णऋ जालें बहूसाल भारें।
सदा सर्वदा आमुची थोर चिंता। समस्तांसि तूं एकला प्राणदाता
ह्मणे मारुती सर्व स्वामीप्रतापें। प्रभू काय कीजेल म्यां दीनरूपें।
समर्था तुझेनी कृपेवीण कांहीं। स्वता अल्पही कार्य होणार नाहीं।
बहूतांपरी मारुतें स्तुति केली। मनोवृत्ति ते राघवाची निवाली ।
पुढें राघवें रुद्र संतुष्ट केला। बहूतांपरी आदरें गौरवीला ॥ २२ ॥
प्रसंगें कपी-नाथ सुग्रीव बोले। ह्मणे मारुती प्राण त्वां रक्षियेले ।
कुळामाजि जालासि पूर्ण प्रतापी।कपीचीं कुळें सर्वही श्लाघ्यरूपी
कपी सर्वही बाण-जाळें निमाले। तुझीया प्रतापें पुन्हा जन्म जाले
प्रसंगें सखा राघवें निर्मिलासी। कपीकारणें तूं बहू कष्टलासी २४
तया बोलतां मारुता सूख जालें। पुन्हा मारुतें ही बहू तोषवीलें ।
असो हे बहूसाल पल्हाळ-गोवी। कथा राहिली ते पुढें चालवावी॥
कपी-नाथ बोले रघूनायकासी। नये रावणू चंडदुःखें रणासी।
तरी शीघ्र लंकापुरी जाळवावी। समर्थें कपीलागिं आज्ञा करावी।
पुढें बोलिजे सुग्रिवालागिं देवें।तुम्हीं कल्पिलें कार्यसिद्धीस न्यावें
कपी राम-आज्ञेस घेऊनि वेगीं। विरांलागिं आज्ञा करी ते प्रसंगीं।
तुम्हीं लागवेगें चुडया पाजळीजे।बळें शीघ्र लंकापुरी दग्ध कीजे

---

१ वायूला.

करीं घेतले उंच बांधूनि भारे। कपी धांवती एकमेकां पुढारे २८
चुडया पावकें सर्वही दीप्त केल्या।अकस्मातलंकापुरीमाजि नेल्या।
बळाचे कपी धांवती लक्ष कोटी। चुडया खेळती थोर आनंद पोटीं

शिखा लागतां शीघ्र जाले उमाळे
निळे पींवळे श्वेत आरक्त काळे।
बहू लागला चंड वारा भरारां।
पुरीमाजि तो वन्हि धांवे सरारां॥ ३०॥

गृहा गोपुरा जाहला एक वेळा। असंभाव्य हेलावती तीव्र ज्वाळा।
दिशा दाटल्या धूम्र आकाशपंथें। पिडा जाहली खेचरां भूचरांतें
मळें धूविलीं तीं तया रावणानें। सळें ऊसणें घेतलें पावकानें।
बळें लागतां थोर कोपें कडाडी। बळें माजला वन्हि पोटीं धडाडी

बळें क्रोध आला तया पावकाला।
वरी वात वेगीं बळें साह्य जाला।
शिखा चालिल्या अंतराळीं धडाडां।
जळों लागली दिव्य लंका भडाडां॥ ३३॥

अपारें घरें गोपुरें रम्य सारें। बहूसाल दामोदरें थोरथोरें।
पडों लागलीं दग्ध होतां धबाबां।महा राक्षसी तोंड घेती खबाबां।

ध्वनी राक्षसांची असंभाव्य जाली।
मुखें बोलती आगि रे आगि आली।
कितीएक राक्षेस धांवूनि आले।
अकस्मात ते वीर सर्वे मिळाले॥ ३९॥

बळें धांवली ते असंभाव्य सेना। पुढें जावया लाग कोठें दिसेना।
शिखा धांवती वन्हिच्या पाठिलागें। पळाले बळी प्राण घेऊनि वेगें
बळें सूटलीं वैभवें राक्षसांचीं। बहू दाटली वाट मेतें विरांचीं।
कितीएक ते धीट नेटें जळाले। कितीएक ते वीर मागें पळाले ३७

---

१ मन्दिरें.

त्रिकूटाचळीं थोर आक्रांत जाला। असंभाव्य राक्षेस कीती निमाला
स्त्रिया बाळकें जेथ जेथें पळालीं। शिखा लागतां तेथ तेथें जळालीं
पळायासि मागें पुढें रीघ नाहीं। जळाले पुरीमाजि ते सर्व कांहीं।
बहू कुंजरें शाकटें अश्व नाना। निमाले रथी सारथी सर्व सेना ३९
सहस्त्रं दहा भूवनें रावणाचीं। जळालीं बहू संपदा वैभवाची॥
सुवस्ता अळंकार दिव्यांबराचीं। सुगंधेल आज्यादि नाना रसांचीं
गुरें वांसरें जाळिलीं पावकानें। बहू हाट बाजार केणीं दुकानें॥
बहूतांजणांचें बहू वित्त गेलें। त्रिकूटाचळा पावकें शुद्ध केलें॥४१
बहू वेवसायी भले मोठमोठे। भुसारी जरी जोहरी आणि चाटे।
जळालें बहू वित्त हाणोनि घेती। धरेना कदा सांवरेना रुदंती ४२
सभा-मंडपीं राक्षसीं हाक नेली। ह्मणे पाहतां काय लंका जळाली
दहा योजनें तीसरा भाग जो कां। बळें जाळिली वानरीं सर्व लंका
तया रावणा वाटली सर्व चिंता। ह्मणे पाठवावें रणीं कोण आतां।
न दीसे मुखीं मंदली सर्व शोभा। पुढें बोलिला शीघ्र कुंभा निकुंभा॥
ह्मणे वानरीं जाळिली सर्व लंका। तयांशीं करा युद्ध टाकूनि शंका
तयां सांगता सर्व ऊदीत जाले। महा वीर ते सात युद्धा निघाले॥
बळी कुंभ नीकुंभ जंघ प्रजंघें। दळें सिद्ध केलीं बळें लागवेगें।
महा वीर झुंजार तो वीरुपाक्षु। दळीं चालिला क्रोधनू शोणिताक्षू
बळी सातही ते रथारूढ जाले। महा वीर राक्षेस सर्वे मिळाले।
दळें चालिलीं राक्षसांचीं अपोर। भुमी शेष सांडू ह्मणे थोर भारें॥

बहू दग्ध लंकापुरी होय जेथें।
बळें चालिले भार तेणेंचि पंथें।
निमिष्यांत कुंभें विरें ते चि काळीं।
महा मेघ तो पाडिला बाणजाळीं॥४८॥

बळें मातला वन्हि तो वीझवीला। त्रिकूटाचळीं लोक आनंदवीला

---

१ विकून पैसा होण्याचा जोगा जिन्नस. २ कापडवाले.

विझाली पुरी शीघ्र तेणेंचि मार्गें। निघाली पुढें वाहिनी लागवेगें॥
रणामंडळा पारखे वीर आले। कपि द्रुमपाणी बळें सिद्ध जाले।
समस्तांपुढें अंगदू वीर रागें। रणीं लोटला क्रोधनू लागवेगें ॥९०
बळें फोडिली हाक कल्पांत जैशी॥रणीं मांडलें युद्ध दोघांजणांशीं
विरें विंधिलें वानरालागिं बाणीं। कपी कोपला अंगदू शैलपाणी
गिरी टाकितां क्रोधनू गुप्त जाला। महा पर्वताचे तळीं तो निमाला
तया साव्हया शोणिताक्षू निघाला। तयें अंगदू भेदिला भग्न केला
रणीं वीर लक्षूनियां बाण घाली। बळें गेलिया अंग भेदूनि भाली।
उणें देखतां शीघ्र मैंदें द्विवीदें। तरू घेतला हाक देऊनि क्रोधें ९३

कपी वीर धांवोनि युद्धासि आला।
रणीं अंगदालागिं तो साह्य जाला।
तईं शीघ्र येरीकडे लागवेगें।
बळें धांवले ते विरश्रींत रागें ॥ ९४ ॥

प्रजंघें युपाक्षें तया शोणिताक्षा। दिल्हें पूट धांवोनि घेऊनि पक्षा
त्रिवर्गां त्रिवर्गीं रणीं युद्ध जालें। शरीं राक्षसीं व्योम संपूर्ण केलें॥
शिळा शीखरें वृक्ष पाषाण घातें। कपी वीर ते हाणिती राक्षसांतें।
समारंगणीं दूर टाकोनि शंका। बळी नीकुरें भेदिती एकमेकां ९६
तई अंगदें थोर अद्भूत केलें। बळें वाड झुंबाड तें उन्मुळीलें।
प्रजंघासि हाकूनि क्रोधें बहूतें। रणीं झोडिला पाडिला वृक्ष-घातें ॥
पुढें देखिलें त्या युपाक्षासि मैंदें। बळें गर्जला तो कपी घोर नादें।
रणीं झुंजतां थोर आवेश मैंदा। शिळा टाकितां जाहला चूर्ण चेंदा
द्विवीदें विरें पाडिला शोणिताक्षू। उणा देखिला सर्व नैर्ऋत्यपक्षू[१]।
तिघां राक्षसां थोर संहार जाला रणामाजि युद्धासि तो कुंभ आला
पिता कुंभकर्णू महावीर जैसा। तया सारिखा लोटला कुंभ तैसा।
उभा रे उभा तूं रणामाजिं मैंदा। अरे अंगदा जासि कोठें द्विवीदा

---

१ राक्षसपक्षीं.

बहू विक्रमें पाडिलें राक्षसांशी। रणीं ऊसनें शीघ्र घेतों तुह्मांशीं।
क्षणीं तेचि कोदंड घेऊनि हातीं। कपी मैंद तो भेदिला बाण घातीं
नवां बाण घातीं कपी भग्न केला। रणामाजि तो प्रेत होऊनि ठेला
द्विवीदाशि दाही शरीं तेचि काळीं। विरें राक्षसें पाडिलें बाणजाळीं
पुढें पाहतां देखिलें अंगदाला। कपी वीर तो वृक्ष घेऊनि आला।
बळें हाणितां खीळिले हस्त बाणीं। चळेना कपी वीर तो वज्रठाणीं

उभा राहिला बाण झेलीत कैसा।
कुठारा तळीं छेदिजे वृक्ष जैसा।
तया अंगदा शीघ्र प्राणांत आलें।
रघूनायका वानरीं जाणवीलें[1]॥ ६४॥

मुखें बोलती अंगदू वीर गेला। कपीनाथ सुग्रीव तैसा उडाला।
रथारूढ होऊनि कोदंड हातें। बळें मोडिलें तोडिलें वृक्षघातें ६५
रणीं कुंभ तो मल्लयुद्धासि आला। बळें ताडिता जाहला सुग्रिवाला
तया सुग्रिवें दीधली वज्र-मुष्टी। रणीं पाडिला कुंभ तो प्रेत सृष्टी ॥
महा-वीर तो धाडिला मृत्यु पंथें। निकुंभें रणीं हांकिलें सुग्रिवातें।
कपीनाथ सुग्रीव घालूनि मागें। पुढें धांवला मारुती लागवेगें ६७
तया राक्षसें भेदिलें मारुताला। कपीवीर किंचीत मूर्छीत जाला।
पुढें ऊठला तो कपी काळ जैसा। मनामाजि आवेश अद्भूत तैसा ॥

महा पर्वतू घेतला मारुतानें।
निकुंभावरी टाकिला थोर त्राणें।
गिरी टाकितां शांति जाली तयाची।
फळी फूटली सर्वही राक्षसांची ॥ ६९॥

त्रिकूटाचळामाजि घायाळ गेले। रिपू प्राण घेऊनि तैसे पळाले।
भयातूर ते सांगती रावणाला। बळी तो विरेंवीर सर्वै निमाला ७०
बहू दुःख जालें तया रावणाशी।पुढें धाडिलें शीघ्र तींघां सुतांशीं।

---

१ बोलाविलें.

विशालाक्ष मक्राक्ष आणी खरातें । रणा पाठविलें तियां कूमरांतें ॥
तिघेही दळेंशीं बळें सिद्ध जाले । असंभाव्य ते भार मागें मिळाले ॥
महाविक्रमें झेलिती वीर खगें । समारंगणीं पातले लागवेगें ॥
बहुंगे लाहोमूसळू शूळपाणी । कटाऱ्या सुऱ्या तोमरें चापपाणी ॥
बहू खेटकें मुद्गलें आणि भाले । महावीर राक्षस युद्धा निघाले ७३
कपी-वाहिनीचा असंभाव्य थावा । प्रतापें बळें शीघ्र केला उठावा ॥
शिळा शीखरें हाणिती राक्षसांतें । रिपू मारिती वानरां बाणघातें ।
महा युद्ध आरंभिलें एकमेकां । तयां भीडतां तो धरी काळ शंका
रणीं राक्षसां पाडिलें घोर मारें । कपी वीर ते गर्जती भूभुकारें ॥
रणा माजि मक्राक्ष तो शीघ्र कोपे । पुढें चालिला चापपाणी प्रतापें
स्वयें आपुलें सैन्य घालूनि मागें । कपी भेदिता जाहला लागवेगें ॥
बळें सोडिलीं राक्षसें बाण-जाळें । तुटों लागतीं वानरांचीं शिसाळें ।
थटारां रणीं तूटती पादपाणी । शरीरें बहूसाल विक्राळवाणी ॥ ।
देह खोंचले थोर माहा विरांचे । झरे लागले वाहती शोंणताचे ।
रिपू झुंजतां राक्षसें भग्न केले । कितीएक ते भार मागें पळाले ॥
बळें धांवती बाण ते लागवेगें । पळाले बळाचे कपी सर्व मागें ॥
कपींचीं दळें भंगिलीं राक्षसानें । तया मस्तकूं तूकिलाँ राघवानें
रणीं मांडिला थोर कल्पांत सृष्टीं॥बहूतां विरीं दीधली त्याशि पृष्टी
रणामाजि कोणासही राहवेना । करी घोर संधान तें साहवेना ॥
ह्मणे राम हा कोण सामर्थ्य याचें । रणीं भंगिलें सैन्य गोळांगुळांचें
वरी अंतराळीं बहू बाण-जाळें । क्षणामाजि ते तोडिले शीघ्रकाळें
उभा राहिला राम वज्रांगठाणें । गुणीं लाविलें चापचंद्रार्धबाणें ।
टणत्कारिलें सात वोटीं थरारी । महाचंड ब्रह्मांड घोषें गरारी ॥
बळें राक्षसें व्योम संपूर्ण केलें । रणीं राघवें शीघ्र छेदूनि नेलें ॥
पुढें घेतला दूसरा बाण रामें । गुणीं लाविला थोर शत्रू विरामें ॥

१ ढाला. २ समूह. ३ डोलविला. ४ दृढ उभें राहणें.

विरें मागुतें थोर संधान केलें। रिपूचें रणीं शीर छेदूनि नेलें ॥
महा वीर मकाक्ष तो बाणघातें। निमाला रणीं चालिला मृत्यु-पंथें
पुढें राम पाचारिला त्या खरानें। विशालाक्ष ऊठावला थोर त्राणें
ह्मणे राजपुत्रा बरें युद्ध केलें। रणीं विक्रमें शीर छेदूनि नेलें॥८५॥
असे सर्वदा तो जयो प्राप्त कैंचा। करी ग्रास राहू रवी-मंडळाचा।
प्रती उत्तरें बोलिला राम वाणी॥ बळें बूजिलें भूमि-आकाश बाणीं
तिहीं राक्षसीं घोर संधान केलें। विरां वाटलें थोर कल्पांत जालें।
पुढें तोडिले सर्वही बाण रामें। प्रतापें रणामाजि त्या पूर्ण-कामें ॥
प्रतापें रणीं राघवें बाण-घातें। रिपू दोघेहि धाडिले मृत्युपंथें ॥
रणीं राक्षसां थोर संहार जाला। समाचार गेला तया रावणाला॥
पुढें रावणानें बहू दुःख केलें। नसे अंतरीं सौख्य टाकून गेलें।
दशग्रीव बोले विरा इंद्रजीता। प्रतापें रणामाजि तूं जाय आतां॥
रिसां वानरांची असंभाव्य सेना। तुज वेगळी सर्व संहारवेना॥
उभा राहिला शीघ्र ऊदीत जाला। ह्मणे शीघ्र संहारितों वैरियांला
दळें चालिलीं राक्षसांचीं अचाटें। पुढें वानितीं भाटवेताळथाटें।
बळी रावणी[1] तो रथारूढ जाला। बहूसाल वाद्यें दळेंशीं निघाला
रणामाजि येवोनियां होम केला। महा भीम कृत्या रथ प्राप्त जाला
रथारूढ होऊनि वेगीं उडाला। नभोमंडळामाजि तो गुप्त जाला॥
असंभाव्य तीं मोकळीं बाण-जाळें। बळें धांवती प्रेरिले दूत काळें।
कपींचीं तुटों लागलीं कंठ-नाळें। रणीं लोटती वीर-प्रेतें सुकाळें ॥
असंभाव्य सामर्थ्य त्या रावणीचें। कळेना कळा कोण कापट्य याचें
कदा नेणती बापुडे देव कांहीं। रणीं पाडिती वीर सन्मूख नाहीं।
बहू खोंचली ते असंभाव्य सेना॥ दिशा दाटल्या बाण-जाळीं दिसेना
कपी-वाहिनीमाजि आकांत जाला॥ पुढें मारुतीचा पिता शीघ्र आला
निरूपी अती आदरें राघवाशी। ह्मणे अंगिराअस्त्र योजीं त्वरेंशीं।

---

[1] रावणपुत्र.

पुढें राम तत्काळ तें अस्त्र घाली। तयें तूटलें शीर कृत्या निमाली
पुढें रावणी भूतळामाजि आला। रणामंडळीं मृत्यु जैसा उदेला ॥
भयासूर तो वीर घोरप्रतापी। शरां सोडिता जाहला काळ-रूपी
समस्तीं अकस्मात तो देखियेला। तया एकवेळा बहू मार केला।
कपी वीर ऊठावले शीघ्र काळीं शिळा शीखरें टाकिती बाण-जाळें
रणीं रावणी एकला वीर जेठीं। कपी लोटले लक्ष कोटयानुकोटीं
रिसीं वानरीं थोर कल्लोळ केला। बळें ताडिते जाहले राक्षसांला।
बळें फेंकिला शूळ त्या मारुतानें। गदा घेतली शीघ्र बीभीषणानें।
परीघाशि घेऊनियां शीघ्र धांवे। कुमूद करी बेग नेटें उठावें ॥
कपी-ऋषभा थोर आवेश आला। शतघ्नीस घेऊनि सन्मूख जाला।
द्विवीदें बळें सोडिलें चक्र कैसें। महा पर्वतीं चालिलें वज्र जैसें ॥
सुगंधें विरें ताडिला शस्त्र-घातें। गिरी-शृंग तो टाकिला जांबवंतें।
शिळा टाकिली चंड त्या अंगदानें। महा खड्ग तें मोकलीलें नळानें
बहू गा निळें झोंकिला तो विशाळू। कपी सुग्रिवें टाकिला चंड शैलू
सुमित्रा-सुतें राघवें तेचि काळीं। रिपू रावणी विंधिला बाण-जाळीं
बहूतांमधीं एकला इंद्रजीतू। रणीं वेढला काळ जैसा कृतांतू।
बळें वानरांचा बहू मार जाला। रिपू राक्षसें अंतरीं तुच्छ केला।
बहूतां जणांचा बहू एक मेळा। निमिष्यांत तोडूनि नेला खलीळा।
पुढें राक्षसें घोर संधान केलें। विरें विक्रमें सर्व सामर्थ्य नेलें १०५
रिपूंचीं दळें पाडिलीं इंद्रजीतें। रणामाजि जालीं असंभाव्य प्रेतें।
रिसें वानरें राम सौमित्र बाणीं बळें भेदुनी चालिला चापपाणी
पुढें सज्जनीं चित्त द्यावें कथेला। समाचार सांगेल हा रावणाला।
महा वैर हें एकतां वैर नासे। ह्मणे दास निर्वैर सूखें विलासे १०७

प्रसंग पांचवा समाप्त.

---

१ तोफ.

प्रसंग सहावा.

सभे बैसला राव त्रीकूटवासी । पुढें भेटला इंद्रजीतू तयासी ।
नमस्कार केला तया रावणाला । ह्मणे शत्रुचा सर्व संहार केला १
बहू लंकवासी रणीं भग्न केले । किती एक ते मृत्युपंथेंचि गेले ।
बळें ऊसणें घेतलें हो तयांचें । प्रभू शोधिले मुख्य त्या वैरियांचें २
तया रावणा थोर संतोष जाला । बळें अमृताचे नदी पूर आला ।
अकस्मात संताप सर्वै उडाला । पुढें बोलता जाहला कूमराला॥३॥
ह्मणे इंद्रजीता।विरा बैस आतां । सुपुत्रा तुवां तोडिली सर्व चिंता
बळा चक्रचूडामणी वीरराजा।असाध्या तुझ्या वज्रकल्याण भूजा
अगा इंद्रजीता सखे गोत्र बंधू । प्रतापें बळें आगळे वीर सिंधू ।
निमाले रणीं वैरियांचेनि हातें । बहूसाल वाटे मनीं दुःख मातें॥५॥
त्रिकुटाचळीं वानरीं लाग केला । मुळारंभ राक्षेस कीती निमाला ।
पुढें थोर संग्राम दारूण जाला । विरू राक्षसू सर्वही तो बुडाला ६
तया ऊपरी वीर धूम्राक्ष जेठी । तयें जिंकिले देव तेतीस कोटी ।
समारंगणीं त्या विरा अंत आला । रणामंडळीं देह त्यागून गेला ७
रणीं वज्रदंष्ट्री दिसे काळरूपी । गिरीसारिखा अंकपन्नू प्रतापी ।
महा वीर ते दोघ युद्धासि गेले । समारंगणीं युद्ध होतां निमाले ८
बळी दक्ष वित्पन्न चातुर्य जाणे । तया देखतां अंतरा सुख बाणे ।
प्रसंगेंचि तो वीर युद्धासि गेला । प्रहस्तू रणीं युद्ध होतां निमाला
तयाचा बहू क्रोध आह्मांसि आला । रिपू राम जिंकावया वेग केला
तयाचें महा युद्ध तें काय बोलों । समारंगणीं भ्रष्टलों भग्न जालों
तया ऊपरी धीर आह्मां धरेना । पुढें ऊठवीलें बळें कुंभकर्णा ।
तयासारिखा कोण आहे बळाचा समारंगणीं धीर काळासि कैंचा
महा वीर तो घोर युद्धासि गेला । रिसां वानरां थोर संहार केला ।
रिपूनें तया शेवटीं बाण-घातें । समारंगणीं धाडिला मृत्युपंथें १२

१ कंपनरहित.

प्रतापी सखा बंधु माझा निमाला। बळें आगळा थोर आधार गेला
मला पूसिल्यावीण गंतव्य केलें। नये बोलतां दुःख ब्रह्मांड जालें
तया ऊपरी चौघे ही सूत माझे। अगा इंद्रजीता सखे बंधु तूझे।
तयांच्या प्रतापानळें सूख लोटे। समारंगणीं भीडतां काळ वीटे
नरा अंतकाला नरा अंतकानें। बळें पीटिलें देवदेवांतकानें।
तळीं घातले सर्व त्या त्रीशिरानें। रणीं वानरीं घेतले सर्व प्राणें
अतीकाय तो वीर मेरू बळाचा। प्रतापें बळें आगळा विक्रमाचा।
रथारूढ होऊनि युद्धासि[1]गेला। तयाचा सुमित्रासुतें घात केला
निमाले सखे दुःख ऊदंड जालें। पुढें पाहतां वीर सामर्थ्य गेलें।
महा वीर ते मृत्युपंथेंचि जाती। नरें वानरें बापुडीं येश घेती १७
निमाले सखे सूत बंधू बळाचे। प्रतापें सुरांहूनि ते विक्रमाचे।
रणामंडळीं सर्व सेना निमाली। बहूसाल संहारिली कूळवल्ली
अगा इंद्रजीता तुवां सूख द्यावें। प्रतापें रणीं सर्व शत्रू वधावे।
मला सांगसी लाविले मृत्यु-पंथीं। परी मागुती ते रिपू गर्जताती
रिपू ऊठती मागुती हें न व्हावें। बळें सर्व निर्मूळ त्यांचें करावें।
प्रतापें रणीं सर्व पाडून येसी। परी मागुता जीव येतो तयांशी
बहू वेळ तां युद्ध सामर्थ्य केलें। परी पाहतां सर्वही व्यर्थ गेलें।
प्रतापें रणीं पाडिले बाण-घातीं। समारंगणीं मागुते सिद्ध होती

महीमंडळीं नाम त्यांचें नसावें।
विरा विक्रमें त्वां मला सौख्य द्यावें।
पिता बोलतां धीर पोटीं धरेना।
असंभाव्य कोपानळू सांवरेना॥ २३॥
उभा राहिला वाक्य बोले पित्याशी।
ह्मणे शीघ्र संहारितों वैरियांशी।
समारंगणामाजि ऐसें न होतां।

---

१ त्वां.

तरी जाणिजे भेटि ते हेचि आतां ॥ २३ ॥
बहू कोपला चालिला वीर जेठी । प्रतापें ह्मणे सर्व जाळीन सृष्टी ।
पुढें बापुडीं वानरें दैन्यवाणीं । खिळी तो बळें सर्व ब्रह्मांड वाणि
पित्याकारणें वीरभद्र निघाला ।
तया दैत्यजा धरूं सिद्ध झाला ।
तयाचेपरी कोपला काळरूपी ।
बळें चालिला शक्रशत्रू प्रतापी ॥ २५ ॥
तुरें वाजती नाद गेला भुगोळा । दळेंशीं बळें पावला होमशाळा ॥
तया राक्षसें मागुती होम केला । महावीर मेघासनीं गुप्त झाला ॥
बळें बूजिलें सर्व आकाश बाणीं ।
पडों लागलीं वानरें दैन्यवाणीं ।
कपी-वाहिनीमाजि आक्रांत जाला ।
पुन्हा मागुता थोर कल्पांत आला ।
वरी पाहतां युद्धकर्ता दिसेना । धडाडा पडों लागली सर्व सेना ॥
महावीर ते घोर मागें पळाले । पळाले कपी राघवा आड गेले ॥
ह्मणे राम तो सुग्रिवा मारुता हो । नभोमंडळीं युद्धकर्ता पहा हो ॥
प्रतापें बळें वीर सप्त उडाले । असंभाव्य ते पोकळीमाजि गेले ॥
महा थोर तें युद्धसामर्थ्य गेलें । तया इंद्रजीतें पुढें काय केलें ॥
अकस्मात तो भूतळामाजि आला । रणामंडळीं सैन्यसिंधू मिळाला
खटाटोपिले ते बहू शस्त्रपाणी । रुपें कर्कशें काळ कर्कोटवाणीं ॥
बळें चालिला भार वेष्टीत सेना । रजें मातला व्योम पूढें दिसेना ॥
कपी वीर राक्षेस सन्मूख जाले । समारंगणामाजि युद्धा निघाले ॥
पुढें राक्षसें रूप केलें सितेचें । महा रम्य लावण्य तें जानकीचें ॥
रणीं लोटल्या वीर राक्षेस फौजा ।
कपीभार ऊठावले स्वामिकाजा ।

१ इन्द्रजित.

दळीं राक्षसांचे बळी इंद्रजीतू ।
बळी चालिला काळ जैसा कृतांतू ॥ ३३ ॥
तया देखतां धांवला रुद्र तैसा । करीं घेतला शैल ब्रह्मांड जैसा ॥
बळें इंद्रजीता उजू धांव घाली । तयीं इंद्रजीतें सिता दाखवीली ॥
ह्मणे रे कपी हे सिता राघवाची ।
गुणी स्वामिणी हे तुह्मां मर्कटांची ।
महापापिणी सर्पिणी दुःखदाती ।
त्रिकूटाचळीं राक्षसीकूळहंती ॥ ३५ ॥
अशोकावनामाजि हे शोकवल्ली।अकस्मात कोठून निर्माण झाली ।
तया दीवसापासुनी दुःख झालें । त्रिकूटाचळा थोर दारिद्य आलें
बळाचे बहू वीर हे पापिणीनें । सखे आमुचे ग्रासिले सर्पिणीनें ॥
कळी मांडला त्यास हे मूळ सीता । करीतों इचा शीघ्र संहार आतां
तया राक्षसें मारिलें जानकीला ।
ह्मणे रे कपी सांग त्या राघवाला ।
समारंगणीं शीर छेदूनि नेलें ।
तया राक्षसें शीघ्र गंतव्य केलें ॥ ३८ ॥
सिता देखतां मारुती अंग घाली ।
प्रसंगीं तये मूर्छना शीघ्र आली ।
महा शोक आरंभिला त्या कपीनें
ह्मणे काय केलें जगज्जननीनें ॥३९॥
बहू दुःख मागील तें आठवीलें । उदासीन हें चित्त दुश्चीत जालें ॥
ह्मणे काय सांगों तया राघवाला । कपी मारुती शोकसिंधू बुडाला
ह्मणे रे कपाळा असें काय केलें । बहू थोर हें पाप माझें उदेलें ॥
न सांगों तरी गोष्टि राहों नये कीं । पुढें सांगतां राघवा दुःख हें कीं
प्रवाहो बळें चालिला अश्रुपातीं । विलापें करूं लागला तो रुदंती

१ पर्वत.

बळें ऊठला चालतां चालवेना । रघूनायका भेटला दैन्यवाणा ४
अधोमूख पाहोनि कांहीं वदेना । दुखें दाटला कंठ त्या बोलवेन
ह्मणे जानकीसारिखी शस्त्रघातें । रणीं मारिली राक्षसें इंद्रजीतें ।
तयें सांगतां मांडिला शोक रामें । मिळालीं दळें दैन्यवाणीं विरा
कपीवाहिनीमाजि आकांत जाला।सुमित्रासुतें राम तो शांत केल

भविष्योत्तरें वाल्मिकी सत्य व्हावीं ।
देहें सांगसंपादणी कां करावी ।
ह्मणूनी रघूनायकें शोक केला ।
तदा वीर बीभीषणू शीघ्र आला ॥ ४५ ॥
ह्मणे जी प्रभू शोक वांया करीतां ।
असे सत्य नेमस्त कल्याण सीता ।
अशोकावना दूत म्यां पाठवीले ।
प्रसंगीं समाचार घेऊनि आले ॥ ४६ ॥

तया इंद्रजीतें रणीं माव केली । नव्हे सत्य हें मिथ्य होऊनि गेली॥
पुरीं होम आरंभिला मेघनादें । पुरा जालिया कोण घेईल द्वंदें ४७
तया इंद्रजीतासि आधीं वधावें। वृथा शोक सांडूनियां सिद्ध व्हावें
पुरा होम हा जालिया आवरेना । समारंगणीं मारितांही मरेना ॥
प्रभू जाहली अभ्रिंणी व्योपंथें । वधावा सुमित्रासुताचेनि हातें ॥
तयें सांगतां सर्व आनंद जाला । बहूतांपरी राघवें गौरवीला ४९

पुढें राघवाची बहू स्तूति केली ।
विरांची असंभाव्य मांदी मिळाली ।
सभामंडळीं ते कपी रीस राजे ।
तयां मध्यभागीं महावीर साजे ॥ ५० ॥

समस्तांशि सोडीलसें इंद्र भावी । समर्था तया ऊपमा काय द्यावी ॥
असा राय हा देव ब्रह्मादिकांचा । सुमित्रासुतासी वदे रम्य वाचा

---

१ आकाशवाणी.

ह्मणे होम आरंभिला इंद्रजीतें। मुखें बोलिलें सत्य नैऋत्यनाथें ॥
पुरा होम होतां कदा आवरेना। समारंगणीं मारितांही मरेना ॥
प्रतापें समारंगणीं त्या वधावें। बळें आजि ब्रह्मादिकां सौख्य द्यावें
पुढें ऊठिला शीघ्र सौमित्र कैसा। नभोमंडळीं तीव्र आदित्य जैसा
जया देखतां काळ कांपे थरारां। सवें दीधलें राघवें पंचवीरां॥
हनूमंत बीभीषणू जांबवंतू। सुगंधू कपी ऋषभू वीर्यवंतू॥
महावीर ते पांचही सिद्ध जाले। कपी रीस आणीक कीती निघाले
सुमित्रासुतालागिं राजाधिराजें। मुखें बोलिलीं शक्तिसामर्थ्यबीजें
वरू दीधला स्वामि देवाधिदेवें। ह्मणे शत्रु जिंकोनियां शीघ्र यावें
करू मस्तकीं ठेविला रामचंद्रें। नमस्कार तैसाचि केला फणींद्रें ॥
समस्तीं विरींही नमस्कार केले। पुढें सव्य घालूनि तैसे निघाले।
अती आदरें स्कंधभागीं विरानें। सुमित्रासुता घेतलें मारुतीनें५७
निघाले महावीर ते लागवेगें।।पिता हिंपुटी मारुती मागमागें।
पुढें चालतां पंथ नीकुंबळेचा। विरां थोर आवेश काळासि कैंचा।
महा घोर तो लंघिला मार्ग तींहीं पुढें पाहतां पाहतां वाट नाहीं।
तरूचीं वनें लागलीं तीं वितंडें। प्रचंडें उदंडें बहू झाडखंडें ॥५९॥
भुमीं दाटले वृक्ष वृक्षां मिळाले। तयां अंतरीं वंश मिश्रीत झाले।
वरी पाहतां वाड आकाशपंथें। पुढें रीघ नाहीं तया वारियातें ६०
समें वीषमें झाडखंडें अचाटें। मिळालीं बळें वाजती कर्कराटें।
कडे तूटले थोर त्या पर्वताचे। झरे वाहती झाडखंडीं विषाचे ॥६१
तया अंतरीं सिंह शार्दूल कैसे। मदें मातले गर्जती काळ जैसे ॥
गजांचीं बहू दाट थाटें विशेषें। पळों लागती थोर किंकाटघोषें६२
बहू संकटें धांवती रानह्मैसे। रिसें कर्कशें देखतां जीव त्रासे ॥
बहू सांबरें चीतळें रानगाई। शुनी शूकरां मर्कटां मीति नाहीं॥६३
बहू श्वापदें घोर नानापरींचीं। बहू गर्जताती बहूतां स्वरांचीं।

१ राक्षसांच्या नायकानें.

भुतें खेचरें शक्ति वेताळ पीसे। बहू धांवती वन्हिचे ज्वाळ जैसे ६
बहू व्याळ वेटाळले झाडखंडीं। वनें व्यापिलीं सर्व कूळीं उदंडीं॥
बहूतांपरीचीं बहू तीं विखारें। विषें घोळती लाळ तीं थोरथोरें ६८
वहाती विषाचे महा वोघ तेथें। धुधूकारतां ज्वाळ आकाशपंथें।
गिरीशीं बळें आदळे तोयराशी। बहूसाल त्या तोडिलें पर्वताशी
गिरीशृंग पाठार दारीं कपाटें। शिळा शीखरें वृक्ष पाषाणथाटें।
दरे दर्कुटे थोर भ्यासूरवाणे। बहूतांपरीचे तरू ते पुराणे॥६७॥
कडे कापले तोय नेटें भडाडी। गिरीकंदरीं घोष तेणें धडाडी॥
धडाडां नद्या लोटल्या व्योमपंथें।भुमी तुटल्या घोर घातें विघातें
महारण्य तें घोर नीकुंबळेचें। पुढें जावयालागिं सामर्थ्य कैचें॥
समुद्रातिरीं दाटले वीस गांवें। पुढें जावया वाट नाहीं स्वभावें॥६९
भुमीपंथ नाहीं पुढें जावयातें। उडाले महावीर आकाशपंथें।
समुद्रासि सांडूनि वेगें निघाले। बळें शीघ्र नीकुंबळेमाजि गेले॥७०
पुढें काळ विक्राळ ते वीर गाढे। बळें राक्षसीं घातले सप्त वेढे॥
तयांमध्यभागीं विरें इंद्रजीतें। त्वरें आणिलीं होमद्रव्यें बहूतें॥७१
घटीं मद्य आज्यादिकें मांस नेलें। विरें राक्षसें शोणितें स्नान केलें
पु॰ वेदिकेमाजि हूताशनू तो। महा वीर प्रेतासनीं बैसला तो॥७२
सहस्रैक आहूतिचा नेम केला। ह्मणे म्यां वधावें नरां वानरांला।
शतें भक्तिसंख्याहुती लागवेगें। विरें घातल्या अग्निमूर्खी प्रसंगें॥
रथू नीघतां हिंसती दिव्य घोडे। उदेले मुखीं आगळे घोष गाढे॥
तया धूर्त बीभीषणा श्रूत जालें। सुमित्रासुतालागिं तें जाणवीलें॥
ह्मणे होम पूर्णाहुतीलागिं आला। प्रतापें बळें पाहिजे यत्न केला।
ह्मणे शेष गा धन्य बीभीषणा तूं। सवें धाडिलें राघवें याचि हेतू॥
वधूं शीघ्र राक्षेस हे बाणघातें। तयीं वारिलें त्यासि नैर्ऋत्यनाथें॥
ह्मणे वो प्रभू झुंजतां पूरवेना। पुरा होम होतां रिपू आवरेना॥७६॥

१ अग्नि.

तयीं बोलिला ऋक्ष तो जांबवंतू। ह्मणे वीर हो आइका एक मातू ॥
तुम्हीं होम विध्वंसिजे लागवेगें। रणामाजि मी पाडितों दैत्यदुर्गें।
मुखें बोलिला वीर मेरूबळाचा। सुमित्रासुतू गौरवी रम्य त्याचा।
कपी ऋषभू आणि त्या वायुसूतें। बळें घातली धांव आकाशपंथें ॥
नभीं मुख्य हे वीर दोघे उडाले। कपी रीस ऊदंड धांवूनि गेले।
धबाबां शिळा टाकिती व्योमपंथें। बळें होम विध्वंसिला घोर घातें
रथू मोडिला फोडिलीं सर्व पात्रें। विरें मोडिलें कुंड संकेतमात्रें।
पुढें वन्हि वीदारिला वेग केला। कितीएक राक्षेस तेथें निमाला॥
रिपू रावणी ध्यान भंगून पाहे। तयीं भंगिला होम तो दीसताहे।
त्वरें इंद्रजीतू नभीं दृष्टि घाली। तदा ऋषभानें दिशा शीघ्र केली॥
बळें होम विध्वंसिला मारुतानें। देहेधर्म संपादिला ऋषभानें।
पुढें पाहतां होम भंगून गेला। महा वीर राक्षेस युद्धा निघाला ८९
बळें कोपला काळ कृतांत जैसा। महावीर ऊठावला शीघ्र तैसा।
कपी वीर दोघे त्वरेशीं निघाले। बळें आपुल्या ते दळामाजि आले
सुमित्रासुतें वाहिला चंड मेढा। पुढें चालिला तो बळें वीर गाढा।
कपी लोळ कल्लोळ कोट्यानु कोटी। दळेंशीं बळें चालिला वीर जेठी।
महावीर ते थोर राक्षेस होते। कपीवीर ते धांवले शीघ्र तेथें।
समारंगणीं भार भारी मिळाले। कितीएक ते भीडतां भग्न जाले ॥
दळें लोटलीं राक्षसांचीं अचाटें। समारंगणीं चाललीं दाट थाटें।
बळें हाणिती शस्त्रघातें खणाणां। महीमंडळीं घोष ऊठे दणाणा ॥
असंभाव्य राक्षेस मारीत आले। कपी वीर ते भंगले भग्न केले।
तयां देखतां मारुता कोप कैसा। बळें चालिला काळ कृतांत जैसा
गदा घेतली शीघ्र नैर्ऋत्यानाथें। उडाला कपी ऋषभू व्योमपंथें।
सुगंधू कपी लोटला वीर्यवंतू। बळें आगळा चालिला जांबवंतू ॥
कपी काळ कल्पांतिचे मेघ जैसे। रणीं लोटले गर्जती वीर तैसे।

१ इंद्रजितानें.

बळें घालिती पालथें या भुगोळा तिहीं मांडिला आट राक्षस-कूळ
रणीं हाणिती एकमेकां फडाडां । तुटों लागले पादपाणी तडाडां
नद्या लोटल्या शोणिताच्या भडाडां समारंगणीं घोष ऊठे धडाड
रणीं पाडिले दैत्य कोटयानुकोटी।बहूतीं विरीं दीधली त्यांसिपृष्टं
पुढें देखतां कोपला काळ जैसा । रणीं लोटला रावणी वीर तैसा ॥
तया राक्षसें घोर संधान केलें । कपींवाहिनीमाजि कल्पांत आलें ।
मयूरासि पिंजारिलें पुच्छ जैसें । रणीं पाडिले ते कपी वीर तैसे ॥
कपी मारुतीसारिखे भग्न केले । कितीएक ते वीर धाकें पळाले ।
पुढें पाहतां वीर सौमित्र कैसा । गजा देखतां ऊठला सिंह जैसा ॥
टणत्कारिलें चाप काळाग्निरोषें । थरारी धरा सप्त पाताळ घोषें ।
भुमी वर्षती मेघ ऊदंड गारा।चळों लागल्या त्या असंभाव्य तारा
भिडाया रणीं ऊठले वीर कोपें । बळें सृष्टि जाळील नेणों प्रतापें ।
तयीं शीघ्र बीभीपणें वेग केला । गदा घेउनी वीर सम्मूख जाला॥
सुमित्रासुतालागिं सांडूनि मागें । पुढें धांवला वीर तो लागवेगें ।
रणीं देखिला वीर बीभीषणू तो । तया बोलता जाहला रावणी तो
ह्मणे रे बहूतां दिसां देखिलासी । वृथापुष्ट तूं राक्षसांमाजि होशी ।
नरें वानरें दास जालासि त्यांचा । मनू भंगिला रे तुवां पूर्वजांचा ॥
तुला ठाउका कोप माझा कृतांतू । मला इंद्रजीता पुढें मश्यकू तूं ।
करूं पाहशी थोर सामर्थ्य येथें । समारंगणीं धाडितों मृत्युपंथें ॥
ह्मणे इंद्रजीतास नैर्ऋत्यानाथू । बळेंवीण तूं बोलशी व्यर्थ मातू ।
मजलागिं तो काळ मारूं शकेना । वरू दीधला तोषला रामराणा॥
बहू शीकवीलें तुह्मां दुर्जनांसी । परी नायका रे तुह्मी पापराशी ।
मला सांगतां हीत अव्हेर केला । समस्तांसि येणें गुणें मृत्यु आला
मला ताडिलें वैभवाचेनि तोषें । बुडालेत रे सर्व तेणेंचि दोषें ।
समस्तांसि मारील हा रामराजा । समारंगणीं मीच पाहीन वोजा ।

१ वानरसैन्यामध्यें.

सभामंडपीं फार तां गर्व केला।
कळेना तुला मत्यु संनीध आला
तुला आजि मारील सौमित्र बाणीं।
मुढा राक्षसा जाण हे सत्य वाणी ॥ १०२ ॥

बहूसाल धिक्कार केला तयातें। प्रतापें सिमा सांडिली इंद्रजीतें।
पदें ताडितां तो महासर्प जैसा। रणीं कोपला वीर राक्षेस तैसा ॥
ह्मणे रे उभा फीर सम्मूख राहें। समारंगणीं धीर संधान साहें।
बळें सोडिले बाण दारूण आले। सुमित्रासुतें सर्व छेदून नेले॥
रणीं घातला रावणानूंज पाठी। प्रतापें पुढें चालिला वीर जेठी।
समारंगणीं अंतकातुल्य भासे। महावीर तो देखतां जीव त्रासे॥
महा युद्ध होईल दोघांजणांशीं। पुढें सज्जनीं चित्त द्यावें कथेसी
ह्मणे दासऊदास श्रोतीं न्हावें ऋषी बोलिला तेंचि हें सार घ्यावें

---

प्रसंग सातवा.

फणी रावणी वीर सम्मूख जाले। बळाचे महाकाळ जैसे उदेले।
करायास निर्वाण बे एकमेका। विरश्रीबळें सोडिली सर्व शंका ॥
पुढें बोलता जाहला इंद्रजीतू। कृतांतापुढें निर्बळी मानवा तूं।
मरायासि कां व्यर्थ आलासि येथें निमेषांत मारीन रे बाणघातें
रणामाजि सम्मूख होतां बळेंशीं।समस्तां तुह्मां पाडिलें नागपाशीं
पुन्हा मागुती सर्वही बाणजाळीं। निमालेत माझ्या करें युद्धकाळीं
अरे काय झाली तुझी शक्ति तेथें पुनः शीघ्र आलासि युद्धास येथें
तुवां आणिलें काय सामर्थ्यजाया बळें दावितां।निर्बळें व्यर्थवायां
वृथापुष्ट रे हा बहू राजभ्राता। नृपें ताडिला रे सभेमाजि लाथा।
समस्तांमध्यें रावणें भ्रष्टविला। तुह्मां मर्कटांमाजि तो श्रेष्ठ केला
बळें आपल्या रे तुझे पादपाणी।

---

६ १ त्वां. २ बिभीषण.

नभामाजि खंडून घाडीन बाणीं
समस्तां तुह्मां ठाउकी शक्ति माजी ।
राहाया पुढें काय रे शांति तूझी ॥ ६ ॥

बहू बोलिला वाजटूं घोर शत्रू । प्रती उत्तरें बोलिला तो सुमित्रू ।
मि हा कोण तूं नेणशी काय मूढा। वृथा विक्रमू बोलशी वाड पूढां
महीरुंद विस्तीर्ण छप्पन्न कोटी गिरी दिग्गजांची असंभाव्य दाटी
तढाकें नद्या मातले भव्य सिंधू । वरी दाटली जीवसृष्टी अगाधू ॥
असंभाव्य हा भार कोणा धरेना । न घेतां पुढें जीव सृष्टी उरेना।
सहस्रां फणींचा असंभाव्य व्याळू तयांमाजि एकें फणीं हा भुगोळू
स्वभावें शिरीं ठेविजे पुष्प जैसें । तयाचे परी घेतलें विश्व तैसें ।
तयाहून तो कोण आहे विशेषू । मुढा नेणशी कां स्वयें मीच शेषू।
भविष्योत्तरें सर्वही सत्य व्हावीं । बळें वैभवें राक्षसांचीं दिसावीं ।

ह्मणूनी तुवां घेतलें येश युद्धीं ।
नभामाजि जाऊनि कपटच्यबुद्धी।
जनीं हीन त्याला बरी वेळ आली ।
अकस्मात ते कीर्ति होऊनि गेली

बळें आगळा राम आत्मा जगाचा । तयाहूनि रे विक्रमू कोण कैंचा
तुह्मां पापरूपांमधें भक्त एकू । महावीर बीभीषणू पुण्यश्लोकू ।
तयाशी सभामंडपीं गर्व केला । दिसेंदीस राक्षेस सर्व बुडाला १२
रिपू बोलतो जाण रे सत्य वाणी । प्रतापें तुझें शीर छेदीन बाणीं
तया बोलितां ताविली भीम दृष्टी उभा काळ जाळावया जीवसृष्टी
बळें छेदिता जाहला वोष्ठ दंतीं । सिमा फांकली वैभवाची दिगंतीं
करारां रणीं खादल्या वज्रदाढा।शतें सोडिली बाण वोढूनि मेढा
बळें धांविलीं बाणजाळें उफाळें । लखाखीत सौदामनीचेनि मेळे ।
तडाडीत घोषें कडाडीत आले । सुमित्रासुतें सर्व छेदून नेले १६

१ वाचाळ. २ जास्ती. ३ विजेचें.

पुन्हा कोपला तो रिपू कोटिगूणें ।
शतांचीं शतें सोडिले बाण तेणें ।
नभामाजि ते बाण बाणीं सणाणा ।
कितीएक स्फुल्लिंगे[1] भालीं फणाणा ॥ १७ ॥

असंभाव्य ते जाहली बाणवृष्टी । जळों लागली पावकें सर्व सृष्टी ।
अतां चंड ते दंड अद्भूत कैसे । महाकाळ कल्पांतिचे मेघ जैसे ॥ १८
कडाडां खडाडां गडाडां घडाडां तडाडां थडाडां दडाडां धडाडां
बहूतांपरीचे बहू घोष झाले । ग्रहां चंद्रसूर्यादिकां कंप आले ॥ १९

कितीएक सिंधूदकें तप्त जालीं ।
कितीएक सिंधूदकें तीं उडालीं ।
असंभाव्य त्या दाटल्या बाणकोटी ।
बळें सोडिती पाडिती वीर जेठी ॥ २० ॥

नभामाजि कल्पांत ते बाणजाळीं । महा युद्ध तें होतसे अंतराळीं ।
रिपू पेटले दोघही घोर मारा । भुमी वृष्टि गारापरी सर्व तारा ॥ २१
वरी पाहतां बाणबाणीं खणाणां । रिपू एकमेकांसि तो भेदवेना ।
रथारूढ तो रावणी धांवताहे । पदीं चालतां शेषक्रक्षां[2] न साहे ॥ २२
[illegible] ग्रालिला वीर तो जांबवंतू । शिळा घेतली धांवला काळकेतू ।
बळें हाक देऊनियां चक्रचालीं । उफाळें शिळा तो रथामाजि घाली
रथा मोडिलें पाडिलें भग्न केलें । सुमित्रासुता रावणी साम्य जालें ।
सुगंधें विरें वैभवें लागवेगें । महा अश्व ते चूर्ण केले प्रसंगें ॥ २४ ॥
कपीनाथ बीभीषणें मारुतीनें । विरांलागिं सन्मानिलें थोर मानें ।
भलें हो भलें थोर आश्चर्य केलें । रिपूच्या रथा विक्रमें भंगवीलें ॥ २५
नभीं सर्व आनंदली देवसृष्टी । बहूसाल संपादिली पुष्पवृष्टी ।
समस्तां मनीं थोर आनंद जाला । रिसीं वानरीं घोष अद्भूत केला ॥
ह्मणे रावणी हा रिपू आवरेना । बहूसाल सामर्थ्य याचें सरेना ।

---

१ ठिणग्या. २ आस्वलांना.

शरां मारितां सर्व तोडीत आहे । पुढें अग्निअस्त्रासि तो सोडिताहे।
तयें सोडितां अस्त्र तैसें निघालें । धडाडीत तें तेज पुंजाळ आलें
नभीं धूम्र दाटे असंभाव्य ज्वाळा। कडे पाहती भस्म नक्षत्रमाळा।
असंभाव्य ते चालिली वन्हिधाडी।मही सर्व आकाश तेणें कडाडी।
बहूवर्ण ज्वाला शिखी धांवताती । कडाडीत नेटें कपीमाजि येती ।
कपी ऋक्ष तेणें भयातूर जाले । कितीएक ते वीर पोटीं गळाले ।
बहू सोडिला धीर नैऋत्यनाथें । ह्मणे गा विरां सर्व गेलों अनर्थें ॥
सुमित्रासुतें देखिलें अग्निअस्त्रा । पुढें सोडिता जाहला मेघअस्त्रा ।
तया सोडितां मेघ तैसे उदेले। गिरीचेपरी अंबरीं भार आले ॥३१
नभीं दीसती ते हुडे कोट झाडें। महा मेघ गर्जोनि गंभीर वाडें।
नभा व्यापिलें घोर अंधार जाला।दिसेना रणामाजि दोहीं दळांला
नभीं चालिले ते बहू कीट काळे । झकाकीत सौदामिनीचेनि मेळें ।
बळें मेघधारा असंसाव्य गारा। सुटे कंप सूसाट घोषें थरारां ॥ ३३
प्रसंगीं तये पाणजंजाळ जालें। रणामंडळीं तोय अद्भुत आलें ।
कितीएक झाडें भुमी चूर्ण होती। पुरें पट्टणें सर्व वाहूनि जाती ॥
सुमित्रासुतें थोर अद्भुत केलें जनाला गमे आजि कल्पांत आलें ।
बुडों लागले भार त्या राक्षसांचे । बहूसाल त्या धीर गेले विरांचे
रणीं सोडिलें अस्त्र नेटें विझालें। बहू राक्षसां थोर कल्पांत आलें ।
त्वरें रावणी वायुअस्त्रास सोडी। असंभाव्य तो वात नेटें झडाडी ॥
कडाडीत पाडें असंभाव्य झाडें। बळें पाडिलीं वाड जुंबाड झाडें ।
फुटों लागलीं शैलशृंगें खडाडां । कडे चालिले पर्वतांचे भडाडां ॥
भ्रमों लागलीं खेचरें प्रेत जालीं। गृहें गोपुरें एक वेळे उडालीं।
बहूसाल तो वातआवर्त जाला ।तया देखतां मेघ नेटें उडाला ॥३८॥
सुमित्रासुतें देखिला चंड वारा । गिरीअस्त्र सोडूनि केला निवारा।
असंभाव्य तीं चाललीं शैलशृंगें । बहूवात निर्वात केला प्रसंगें ॥३९

१ वाहुटळ.

महावीर तो वज्रअस्त्रासि सोडी। रणा रावणी शैल तत्काळ तोडी।
रिपू राक्षसें शैल ते पिष्ट केले। बळें आपुल्या दिग्गजां आड नेले ४०
पुढें जाहली ते बहू वज्रदाटी । तया देखता जाहला वीर जेठी ।
पुढें वीर सौमित्र ब्रह्मास्त्र सोडी। तयापासुनी वन्हि नेटें भडाडी ४१
गमे कोटि विद्युल्लता एक वेळा। महा लोळ कल्लोळ भासे भुगोळा।
गिरी चालिले ते असंभाव्य कैसे । नभीं धांवती मातले मेघ जैसे॥

रणामंडळीं पावकें त्या अचाटें ।
जळों लागलीं सर्वही वज्रथाटें ।
पुढें चालिल्या त्या असंभाव्य ज्वाळा।
रणामंडळीं जाहली एक वेळा॥ ४३ ॥

तया देखतां रावणी तेंचि सोडी । रणामंडलीं एकमेकांसि तोडी।
रणामाजि तत्काळ सन्मूख आले महा ज्वाळ ते एक होऊनि गेले
पुढें घोर रुद्रास्त्र त्या रावणीनें। बळें सोडिलें शीघ्र माहाविरानें।
रणामाजि तें चालिलें एकवेळे। भुमी पाय अकाशपंथीं झिसाळें ॥
बळें धाविले ते रणामाजि कैसे। गिळाया भुगोळा महा विघ्न जैसे।
तया देखतां कंप माहाविरांसी। भयें मूर्छना पातली वानरांसी॥
तया देखतां तो फणी सिद्ध जाला॥पुढें सोडिलें शीघ्र माहेश्वराला
उठे मातला काळ कल्पांतकाळीं दिशादाटल्या सर्व आकाशज्वाळीं
रवी कोटि विद्युल्लता एक वेळां। रणीं धांवती कंप जाला भुगोळा।
महातेज हेलावलें तेचि काळीं। असंभाव्य तें चालिलें ब्रह्मगोळीं ॥
तया देखतां अस्त्र मागें पळालें। बहू कूळ तें खेचरांचें जळालें।
पुढें देखतां रावणी भ्रांत जाला। भयें भूलला बारवेना तयाला ॥
मनीं भावितो कोण राखेल गेलों। कळेना मला व्यर्थ येथें जळालों
तयीं शीघ्र रामानुजें काय केलें। प्रतिज्ञापणाला मनीं आठवीलें ॥
ह्मणे हो मनों शीर छेदूनि न्यावें ह्मणोनी बळें अस्त्र मागें वळावें ।

---

१ रुद्रास्त्राला.

रणामंडळामाजि वीरें सुमित्रें । बळें वारिलें अस्त्र तें बीजमंत्रें ॥ ८१
ह्मणे मेघनादू मला विघ्न आलें । परी थोर आश्चर्य कां वांचवीलें ॥
भला वीर सौमित्र हा वीर्यवंतू । मनासारिखें युद्ध मोठें करीतू ॥ ८।
असेना पुढें वीर होणार नाहीं । बहू देखिले पाहिले झुंजतांही ।
महावीर हे सूर्यवंशी बळाचे । रिपूलागिं रक्षावया कोण कैंचे ॥ ८३
महावीर दोघे रणीं तेचि काळें । पुन्हा सोडिते जाहले बाणजाळें ।
रणामाजि ते भेदिती एकमेकां । नभीं सोडिल्या बाणभाळी अनेका
रिपूंची रिपू तोडिती बाणजाळें । पुन्हा मागुती सोडिती ते उफाळें
विरें वीर तो भेदितांही ढळेना । विरश्रीबलें काय होतें कळेना ॥
पुढें काय केलें तया मेघनादें । रणीं हाक देऊनि धांवोनि क्रोधें ।
महातेज पुंजाळ त्या शीघ्रकाळीं बळें भेदिल्या तीनभाळी कपाळीं
महावीर तो रावणी काळरूपी । पुराणा बहू काळ कापव्यरूपी ।
सुमित्रासुतू तो दिसे बाळलीला । बळें भेदिला रक्त वाहे कपाळा ॥
तया देखतां कोप नैर्ऋत्यनाथा । पुढें चालिला पाववायासि वेथा ।
रणीं हाक देऊनि बीभिषणानें । गदा घेतली चालिला थोर त्राणें।
तया देखतां त्या दशग्रीवसूतें । रणीं विंधिला पाडिला बाणघातें ।
पुढें देखिला कोपला वीर गाढा । सुमित्रासुतें वाहिला चंड मेढा ॥

रणीं रावणी लक्षिला तेचि काळीं ।
बळें भेदिल्या बाणभाळी[1] कपाळीं ।
नवां बाणघातें रिपू स्वस्थ केला ।
तया मेघनादा बहू खेद जाला ॥ ९० ॥

कपाळीं बळें भेदिले बाण वीरें । प्रवाहो बळें चालिला तो रुधीरें ।
महामस्तकामाजि सर्वै बुडाले । कपाळावरी पिच्छबाशिंग जालें॥
ह्मणे वीर बीभीषणू वीरछात्रा । बरें ऊसणें घेतलें गा सुमित्रा ।
रिपू रावणी तापला वीर कैसा । शुळें टोंचितां ऊठला सर्प जैसा ॥

---

१ बाणसमूह.

महावीर निर्वाणिंचे बाण सोडी। लघू लाघवें शेष तत्काळ तोडी
असंभाव्य कोपानळें तीव्र ज्वाळा।मुखें सांडितां काळ कांपे चळाळां
सिमा सांडली थोर कल्पांत काळीं महावीर ते खीळिले बाणजाळीं
बहू खोंचले देह दोघांजणांचे। झरे लागले वाहती शोणिताचे ॥
विरश्रीबळें दुःख नाहीं प्रतापें। रणीं भेदिती एकमेकांस कोपें।
बहू माजलें युद्ध तें ओसरेना। बळें भांडती एकमेकां सरेना॥६५॥

पुढें काय केलें सुमित्रासुतानें
गुणीं सज्जिलें त्या रवीचक्रबाणें।
सुखीं धांवती त्या शिखा पावकाच्या।
बहू चंचला कोटि विद्युल्लतेच्या॥

कडाडीत कोपानळें बाणभाळी बळें सांडितां शीघ्र तैशी निघाली
भयातूर दोहीं दळीं कंप जाले। ऋषी देव गंधर्व घाकें पळाले॥ ६७
ग्रहादीक आकाशपंथा जळाले। बहू खेचरें भार भूमी गळाले।
ध्वनी ऊठला घोर घोषें तडाखा। बळी कांपती ईतरां कोण लेखा।
सुमित्रासुतें शीघ्र संधान केलें। रणीं रावणीशीर छेदून नेलें।
समस्तां सुरालागिं आनंदवीलें। सुरेशामनींचें महा शल्य गेलें॥
रणामाजि तो इंद्रजीतू निमाला। समस्तां सुरांलागिं आनंद जाला
महाकंटकू[1] घोर संहार केला। त्रिलोकीं बहू कीर्तिचा घोष गेला।
पुढें शेष सूगंध बीभीषणानें। दळें सर्वही सिद्ध केलीं विरानें।
कपीशीं सुवेळाचळा राम जेथें। महावीर ते चालिले सर्व तेथें ॥
प्रभू राम तो बंधुची वाट पाहे। उतावीळ पोटीं वियोगा न साहे
बहूसाल चिंता करी बांधवाची। ह्मणे कोण वेळा सुमित्रासुताची
तया बोलतां भार तैसे उदेले। दळेंशीं बळें येश घेऊनि आले ।
समर्था प्रभूला नमस्कार केले रघूनायका भेटले स्वस्थ जाले॥
सुमित्रासुताचा देहे स्वस्थ जाला। पुढें राघवें वैद्य पाचारवीला।

---

[1] महाशत्रु.

मुखें बोलिला राम तो वीरबाहो। करावा अती आदरें दिव्य देहो।
रणीं इंद्रजीतासि प्राणांत जालें।
कपीऋषभानें सवें शीर नेलें।
निचेष्टीत काया रणीं स्तब्ध ठेली।
प्रियेलागिं सांगवया भूज गेली ॥ ७९ ॥
त्रिकूटाचळीं भूवनें रावणाचीं। तयासारिखीं रम्य नीकुंबळेचीं।
तया भूवनामाजि सूलोचना तीं। सुखें वैभवाची वरी वेळ जाती ॥
अकस्मात तेथें ध्वनी घोष जाला।परीचारिका सांगती भूजआला
भुमी रम्य राजांगणें पाचबंदी। पडे भूज तेथें स्रवे रक्तबिंदी ॥
मनामाजि ते शंकली दिव्य बाळा।रणामाजि भर्तार त्या कोण वेळा
भ्रमें चित्त दुश्चित्त बाहेर आली। फणीचेपरी भूज ते ओळखीली।
खुणे दाविलें लीहिलें पत्र हातें। ह्मणे चालिलों मी पुढें मुक्तिपंथें।
तुझ्याकारणें धाडिली मूळ बाहे। प्रिये चाल वेगीं तुझी वाट पाहें।
तया वाचितां थोर आकांत जाला।
दुखामाजि तो सौख्यसिंधू बुडाला।
मनीं वैभवाची तिनें सांडि केली।
त्रिकूटाचळीं जावया सिद्ध जाली ॥ ८० ॥
बहू पूतळ्या पिंजरे पक्षियाती।
तये भोंवतीं भोंवतीं रूदताती।
अहो माय आह्मांसि सांडून जाशी।
तुझ्या वेगळीं सर्व आह्मी विदेशी ॥ ८१ ॥
तयांलागिं संबोखिलें रम्य वाणी।तुह्मां रक्षिता देव तो शूळपाणी
मिळाले बहू लोक ते दाटि जाली। शिबीकेमधें भूज वेगें निघाली ॥
विसारे बहूसाल नानापरीचे। अलंकार भांगारें ते सुंदरीचे।
धनें संपदा पाहतां मीति नाहीं। तिनें वांटिलें लूटिलें सर्व कांहीं ॥

---

१ भुज. २ विस्मयकारक. ३ सोनें.

पुढें अश्विनीलागिं आरूढ जाली। बहू वेग लंकापुरीमाजि गेली।
नमस्कार केला तया रावणाला। पुढें टाकिलें पत्र आकांत जाला
रणीं झुंजता इंद्रजीतू निमाला। बहू नायकांचा ध्वनीघोष झाला
दुखें व्याप्त लंकापती आंग घाली। नसे मानसीं शुद्धि सर्वे उडाली
प्रधानीं बहूतांपरी सांवरीला। पुढें रावणा कोप तत्काळ आला ॥
ह्मणे आजि संहारितों वैरियाला। दळेंशीं रणीं जावया सिद्ध जाला
ह्मणे सासुऱ्यालागिं सूलोचना ते। घडीनें घडी आमुची वेळ जाते
समर्था मला शीर आणून द्यावें। पुढें काय मानेल तैसें करावें॥

शिरें आणितों आजि आठां जणांचीं।
मुखें तीव्र क्रोधानळें रावणाचीं।
रिपू दोघ बीभीषणा अंगदाचें।
रिसा सुग्रिवा मारुता ऋषभाचें॥

बहूसाल तो कोप रायासि आला। पुढें मंदिरामाजि नेलें सुनेला॥
तियेलागिं मंदोदरी नीति सांगे। रघूनायका भेट वो लागवेगें॥
अहो देखिलें स्वप्न म्यां घोरवाणें। निमाले रणीं सर्व राक्षेस प्राणें।
नव्हे स्वप्न हें वाटतें सत्य आहे। दिलें राज्य बीभीषणालागिं पाहें
ग्रह सूटले तूटले पाशबेडी। पुढें सोडिले देव तेतीस कोडी॥
त्रिलोकीं उभी राहिली रामगूढी। पुढें साच होईल ऐशींच प्रौढी
ह्मणोनि तुवां शीघ्र आतां उठावें दिनाचे परी रामचंद्रा वदावें॥
करूणास्वरें राघवा आळवावें। बहूतांपरी शीर मागूनि घ्यावें॥
त्वरें ऐकतां ऊठली शब्द नेटें। पुढें वाजिती भाटवेताळथाटें॥
कपीवाहिनीनें महाद्भुत केलें। त्वरें बोलती जानकी पाठवीलें॥
ह्मणे राम हें सर्वथाही घडेना। रिपू मारिल्यावीण दृष्टी पडेना॥
असंभाव्य सेनासभा दाटली ते। पुढें शीघ्र सूलोचना भेटली ते॥
पुढें देखतां राम सूखें निवाली। कृपा भाकितां ते नमस्कार घाली

१ समूह.

कृपासागराची बहू स्तुति केली । सुशब्दें रघूनायकें तोषवीली ।
प्रसंगीं तये थोर आश्चर्य जालें । निचेष्टीत शीरें बरें हास्य केलें॥
कृपें पाहिलें रामचंद्रें दयाळें । पती उठवितों तुझा शीघ्रकाळें॥
खुणा दाविती वो वळावें दयाळा । सभे घालिती एकमेकांसि डोळ॥
कपी वीर ते सांगती कानगोष्टी । पुढें ऊठतां सर्व आटील सृष्टी ॥
वदे ऋक्षस्वामी बरेंसें विचारा । रिपू नुठवावा कदा ऊपकारा ।
वदे मारुती राघवालागिं रागें । रघूनानायकें सांडिली गोष्टि मा
उदासीन देखोनि सूलोचना ते । नमस्कार केला त्वरें चालिली ते
प्रभू सव्य घालूनियां शीघ्र गेली । मनोभावना सर्वही सिद्ध केली
समुद्रातिरीं भीमकुंडा प्रचंडा । बळें चेतल्या वन्हिशाखा उदंडा ॥
दशग्रीव मंदोदरी राजभारें । सवें चालिलीं गांव लोकें अपारें ॥
ऋषीदेवगंधर्वमांदी मिळाली । समस्तीं तियेची बहु स्तुति केली ॥
करी ती ऋषीनायिका अक्षवाणें । उडी घातली अग्निमूर्वी स्फुरा
मनामाजि होता मनांतील हेतु । पुढें देखिला इंद्रजीतू समर्थू ।
सती आदरें मुक्तिपंथास गेली । कथा राहिली पाहिजे चालवीली ।
फणीगर्भरत्नासि हो दग्ध केलें । ह्मणे दास हें राक्षसी कृत्य जालें
पुढें सज्जनीं चित्त द्यावें कथेला । महाशक्ति भेदील रामानुजाला ॥

---

प्रसंग ८ वा.

सुमित्रासुतें पाडिला इंद्रजीतू । रणीं ग्रासिला काळ जैसा कृतांत
दळें फूटलीं वीर मागें पळाले । कितीएक घायाळ लंकेंत गेले १
सभामंडपीं वीर घालोनि मेटें । भुमी पीटिती थोर दुःखें ललाटें ।
मुखें बोलती इंद्रजीतू निमाला । पुरीमाजि तो थोर आकांत जाला
त्रिकूटाचळीं मृत्यु आला बहूतां । समस्तांसि संहार हे मूळ सीता ।
सुपारश्व संबोखितां ते प्रसंगीं । पिशाचापरीं ऊठला लागवेगीं

---

१ जाम्बवान. २ शेषकन्या सुलोचना.

तया रावणा मूर्छना सांवरेना। भूमी आंग घाली कदा आवरेना।
स्त्रियापुत्रकन्यादिकें तोंड घेती। प्रसंगीं तये थोर जाली रुदंती ४

अशोका वनामाजि तो शीघ्र गेला।
सितेलागीं मारावया सिद्ध जाला
पुढें देखतां ते भयातूर जाली।
सुपारश्व धांवोनियां आड घाली॥ ५॥

बहू तांपरी राव तो बोधवीला। पुढें रावणू क्रोध सांडून ठेला।
महावीर दोघे पुरीमाजि आले। रणीं जावयालागिं ते सिद्ध जाले
पुढें उठवीलीं दळें सिद्ध होती। रथी सारथी हस्ति घोडे पदाती।
महाविक्रमें चालिले राजभारें। दणाणीतसे मेदिनी घोरमारें ७

असंभाव्य तीं सोडिलीं बाणजाळें।
कपी टाकिती चंड शीळा उफाळें।
महावीर संघट्टले एकमेकां।
बळें भेदिती दूरि टाकूनि शंका॥ ८॥

महामार आरंभिला वानरांतें। पुढें बाण कार्मुक[1] तें सिद्ध होतें।
उभा राहिला विक्रमें वीर कैसा। बळें सर्व संहारितो काळ जैसा
बहूसाल तीं सोडिलीं बाणजाळें। तुटों लागलीं राक्षसांचीं शिसाळें
असंभाव्य तीं पोकळीमाजि जाती पुरे धांव तेथूनियां खालिं येती
बहूसाल संहार केला दळाचा। करी कोण लेखा तयां घायिळांचा।
रणीं राघवें लाविले घायवारे। पळाले पुरीमाजि ते थोर मारें ११
भयें बोलती सांगती रावणाला। रणामाजि तो सर्व संहार जाला।
असंभाव्य तो कोपला पापराशी। पुढें धाडिलें शीघ्र तीघांजणांसी
विरूपाक्ष विद्युन्मतू आणि मन्तू। रथारूढ होऊनियां लंकनाथू।
महाशस्त्र-सामुग्रिया तो समर्थू। बळें चालिला रुंधिला राजपंथू
असंभाव्य सेना पुढें आणि मागें। रणामंडळा चालिला लागवेगें।

---

[1] धनुष्य.

बहूसाल वाद्यें पुढें एक वेळां। समारंगणीं नाद गेला भुगोळा १४
रथां घोडियां कुंजरां दाटि जाली। उफाळें बळें चंड सेना निघाली।
बहू शस्त्रपाणी बहू छत्रछाया। बळें बोळले मेघ जैसे पहाया १५
उभा राहिला रावणू राजभारें। तिथे वीर ते भीडती घोर मारें।
पुढें देखितां रावणू सांवरेना। उभा राहतां धीर पोटीं धरेना १६
बळें वाइलीं रावणें चंड चापें। बहूसाल ते बाण सोडी प्रतापें।
असंभाव्य तीं सोडिलीं बाणजाळें तुटों लागलीं पादपाणी शिसाळें
कपी सर्वही छेदिले मुख्य शत्रू। रणामंडळीं गर्जला तो अमित्रू।
कपी खोंचले नेट पोटीं धरेना। पराधिक्य तें सुग्रिवा साहवेना
बळें हाक देऊन तैसा निघाला। तया पाठिशीं तो विरें वीर आला
कितीएक ते बाड जुंबाड हातीं। कितीएक ते धांवती शृंग घेती
किती एक घेऊनियां चंड शीळा किती एक फीरावितीं भिंडमाळा
कितीएक ते झाडिती शस्त्रधारा। कितीएक घेऊनि आले कुठारा
कितीएक ते खड्ग घेऊनि आले। कितीएक ते शूळपाणी मिळाले
कितीएक लोहार्गळा ते प्रसंगीं। कितीकीं गदा घेतल्या लागवेगीं।
कितीएक घेऊनि आले दशघ्नी। कितीएक घेऊनि आले शतघ्नी
किती तोमरें पाट्टिशेंशीं निघाले। कितीएक ते शूळ घेऊनि आले

किती फर्शपाणी किती चक्रपाणी।
कितीएक ते वीर खट्वांगपाणी।
कितीएक आसीलता झाडितातीं।
कट्यारा सुऱ्या वीर घेऊनि येती॥ २३॥

बहुतांपरीचीं बहूसाल शस्त्रें बहू हाक देती विशाळें वगैत्रें।
कपीनायका भोंवती दाट थाटें। रणीं धांवती वीर ते कडूकडाटें
पुढे रावणें देखिला थोर थावा। असंभाव्य तो सुग्रिवाचा उठावा
कपीचक्र तें घोर अद्भूत आलें। मनामाजि तें थोर आश्चर्य केलें २५

---

१ गोफीण. २ मुखें. ३ थवा.

कपींचा रणा लोळ कल्लोळ आला । गजारूड महामतू सिद्ध जाला
तया रावणा देखतां युद्ध होतें । बहू मांडला आंट त्या राक्षसांतें
गजारूढ माहामतू शैल जैसा । शिळा टाकितो वीर सुग्रीव तैसा ।
गजामस्तकीं ते शिळा चंड आली गराडून तो कुंजरू आंग घाली
गजा पाडितां छादिला उष्ट्रदंती । बळें चालिला शूळ घेऊनि हस्तीं
ह्मणे साह रे साह तूं सुग्रिवाला । सुळा टाकितां वीर वर्ता उडाला
पुढें शूळ मोडूनियां लागवेगें । गदाघात हाणे तया पृष्ठभागें ।
महा वीर तो घोर मारें पळाला । रणीं राक्षसां थोर संहार जाला
विरेंवीर राक्षेस ते भग्न केले कपी धीट ते नीट मारीत आले ।
तयां देखतां वीरुपाक्षू निघाला । बहूसाल धिकारिलें सुग्रिवाला[1]
पुढें सुग्रिवें बाड जुंबाड हातें । रिपूचे रथीं टाकिलें घोर घातें ।
वरी पाहतां झाड सम्मूख आलें । विरें बाण टाकूनि छेदून नेलें ॥
शिळा टाकिली चंड सा सुग्रिवानें। बळें फोडिली बाणघातें विरानें
पुन्हा राक्षसें घोर संधान केलें । कपी सुग्रिवें तुच्छ मानूनि नेलें ॥
पुढें सुग्रिवें शृंग त्या आचळाचें । करीं घेतलें अग्र मंद्राचळाचें ।
बळें टाकिली ते शिळा घोर घातें । विरूपाक्ष तो चालिला मृत्युपंथें
रणीं राक्षसां पातली मृत्युवेळा । पुढें देखिलें रावणें त्यांसि डोळां ।
अहारे कसें काय जालें कपाळा । भयें भूलला पातली कंपवेळा
पुढें रावणें देखिलें सव्यभागीं । महावीर विद्युन्मतू ते प्रसंगीं ।
तया बोलला पाहसी काय वीरा । महावीर तो पेटला घोर मारा
रथारूढ होऊनियां सुग्रिवाला । पुढें शीघ्र पाचारिलें त्या कपीला ।
शरांचीं शतें टाकिलीं राक्षसानें । विरश्रीबळें साहिलें सुग्रिवानें ॥
पुढें सुग्रिवें घेतली चंड शीळा । बळें टाकिली त्यासि लक्षूनि डोळां।
शिळा फोडिली राक्षसें बाणघातें।बळें कोप आला तया सुग्रिवातें
शिळा घेतली दूसरी सुग्रिवानें । पुन्हा टाकिली चंड माहाविरानें ।

---

१ नाश.

तयें राक्षसें फोडिलें त्या शिळेला। महावीर तो धीर देतो दळाला
कपीनाथ सुग्रीव देखोनि ऊणे। बहू कोपला वीर तो कोटिगूणें।
बळें लांगुळें घाव हाणे महीला। गदे झेलिलें तोडिलें त्या रथाला।
निमाले गदा लागतां दिव्य घोडे। रथू वीघडे चूर्ण होऊनि मोडे।
पडे सारथी दैन्यवाणा उताणा। विरां राक्षसां मूर्छना सांवरेना।
रणीं ऊठला वीर तो सिद्ध जाला। गदा घेतली हांकिलें सुग्रिवाला॥
बळें हाणितां झेलिली त्या कपीनें। पुन्हा हाणिती एकमेकां गदेनें।
बळाचे महावीर दोघे प्रतापी। गदा हाणिती भीडती काळरूपी।
गदाघात संघट्टणें वन्हिवृष्टी। जळों लागली पावकें सर्व सृष्टी॥
बळें हाणितां भंगलें सर्व कांहीं। गदा टाकिल्या घेतले शूळ तेहीं।
रणीं भीडतां शूळ ते चूर्ण झाले। महावीर ते मल्लयुद्धासि आले॥
दणाणा रणामाजि ते मुष्टिघातें। बळें हाणिती एकमेकां निघातें।
कपी सुग्रिवें दीधली वज्रमुष्टी। महा वीर तो पाडिला प्रेत सृष्टीं॥
तया देखतां मंतु धांवोनि आला। रणामंडळीं हांकिलें अंगदाला।
बहू त्रासिता जाइला घोर वाणीं। तयें अंगदा भेदिलें पंच बाणीं॥
तया मूर्छना देखतां जांबवंतें। महावीर तो ताडिला वृक्षघातें।
विरें राक्षसें वृक्ष छेदूनि नेला। रणीं भेदिला ऋक्ष तो भग्न केला॥
रणीं भेदिलें देखिलें त्या रिसाळा। गवाक्षा विरा थोर आवेश आल
पुढें लक्षिता जाहला राक्षसातें। बळें ताडिलें थोर पाषाणघातें ४८
विरें शीघ्र पाषाण तो भग्न केला। शरें नीकुरें भेदिलें त्या कपीला।
गवाक्षू कपी तो भुमी आंग घाली। तयीं अंगदें मूर्छना सांवरीली॥
करीं सार आसीलतेशीं निघाला। बळें हाक देऊनि सम्मूख आला॥
कठोरें करें ताडिलें राक्षसातें। महामंतु तो चालिला मृत्युपंथें ४९
रणामंडळीं शांति जाली रिपूंची। दळें गर्जतीं जाहलीं वानरांचीं।
उणें देखितां रावणा कोप आला। प्रतापें रणामाजि युद्धा निघाला

---

१ जाम्बवान्.

रथू लोटिला रावणें शीघ्र काळें। बहू साल तीं सोडिलीं बाणजाळें
पुढें देखतां राम तत्काळ छेदी। पुन्हा रावणू घोर संधान साधी५१

नभीं सोडिले बाण कोट्यानुकोटी।
असंभाव्य जाली बहू थोर दाटी।
महामेघ तो मोकली मेघधारा।
रघू नायकें छेदिले ते सरारां ॥५२॥

पुढें रावणू थोर कोपें कडाडी। करी गर्जना मेघ जैसा गडाडी।
बहूकोपला तो असूरास्त्र सोडी॥तयीं चालिल्या त्यानभीं चक्रकोडी
असंभाव्य तीं चाललीं घोर चक्रें। महा तेज पुंजाळ त्यांचीं वगत्रें।
कपीवाहिनीमाजि ते एकवेळे । तुटों लागलीं वानरांचीं शिसाळें॥
पुढें देवगंधर्वअस्त्रांस सोडी। तिहीं तोडिल्या सर्वही चक्रकोडी।
रणीं रावणू रुद्रअस्त्रासि घाली। सूळांमूसळांची नभीं दाटि जाली
घुघाटें कपीच्या दळामाजि यावें। तयीं योजिलें तें महाअस्त्र देवें।
महाथोर माहेश्वरी मूळमंत्रें। तयें सोडिलें सूटलीं वज्रशस्त्रें॥ ५६ ॥
लोहोमूसळें ते गदा शूळ हो ते। बळें तोडिले पाडिले वज्रघातें।
दशग्रीव तो क्षोभला काळ जैसा। तगें भेदिलें पंचबाणीं सुरेशा॥
रिपूबाण सर्वांग भेदून गेले। दळीं रावणाच्या महाघोष जाले।
वपू भेदिली रावणें पंच बाणीं। चळेना रणीं राम तो वज्रठाणी५८
रणीं ऊसणें घेतलें राघवानें। दशग्रीव तो भेदिला सप्त बाणें।
महा दुःख जालें तया रावणाला। सुमित्रासुता थोर आवेश आला
तया अग्रजालागिं घालूनि मागें। महावीर तो चालिला लागवेगें।
सुमित्रासुतें बाणघातें निघातें। रिपूसारथी धाडिला मृत्युपंथें॥६०
पुढें मागुतें थोर संधान केलें। रिपूच्या धनूलागिं छेदून नेलें ।
तया वीर बीभीषणा कोप गाढा। रणीं चालिला चंड वाहून मेढा॥
तयें पाडिलें अष्ट तूरंगघातें। ध्वजस्तंभ तो छेदिला बाणघातें।

१ प्रहारानें.

रथू सारथी सर्वही भग्न केला। दशग्रीव दूजे रथीं स्वार जाला ॥
महाशक्ति ब्राह्मी तया रावणानें। अनूजावरी टाकिली तैं पुराणें।
कडाडीत धांवे महावीज जैशी। करी शेष मार्गे रिपूबांधवासी ।
सुमित्रातसुतें घोर संधान केलें। महाशक्तिनें शीघ्र छेदून नेलें।
शरें बाडिर्ता पावका वृष्टि झाली। कितीएक राक्षससेना निमाली ॥
रणीं रावणू तो कडाडीत कोपें। सिमा सांडली घोर रूपें प्रतापें।
घुघूकार सांडीत घडींत दाढा। अनर्थासि ऊठावला वीर गाढा।
महाशक्ति काढूनि मायासुराची। बहू काळ सन्नीध तैशी विरांची।
तयेलागिं त्या रावणें सिद्ध केलें। जयेमाजि ब्रह्मांड विंबोन गेलें।
कडाडीत घोषें घडाडीत ज्वाळा। तडाडी नभामाजि नक्षत्रमाळा।
महावीर ते थोर धाकें गळाले। विमानाहुनी देव नेटें पळाले ॥१७॥
सुमित्रासुता लक्षिलें रावणानें । त्वरें टाकिली शक्ति महाविरानें।
बळें आदळे ते अकस्मात अंगीं। रणीं वीर सौमित्र तो प्राण त्यागी
दळीं वानरांचे हहाकार जाला। महावीर सौमित्र युद्धीं निमाला।
कपी वीर नैर्ऋत्य धांवोनि आले। तया भोवतीं वीर सर्वे मिळाले।
पुढें शोक आरंभिला राघवानें। तया वारिलें शीघ्र बीभीषणानें।
ह्मणे कायजी स्वामिया कोण वेळा उभा रावणू तो पिटावा नृपाळा
सुमित्रासुता मारिलें तो उभासे। कपीवाहिनी थोर आकांत भासे।
प्रभो शोक सांडोनि वेगें उठावें। धनुर्बाण घेऊनियां सिद्ध व्हावें ॥
रणीं रावणें भेदिला ब्रह्मचारी। मिळाले कपी देखिल्या दैत्यहारी॥
बळें हाक देऊनि क्रोधें नरेंद्रें। सिमा सांडिली रामकाळाग्निरुद्रें ७२
करीं बाण कोदंड चंड प्रतापी। रणीं रावणा भासला काळरूपी।
पुढें देखतां पातली कंपवेळा। उभा राम ग्रासील नेणों भुगोळा ७३
चळें सूटला रावणा कंप देहीं। भयें भूलला न स्मरे युद्ध कांहीं।
पडे चांचरे धांवतां थोर धाकें। पुढें पाहतां राम सर्वत्र देखे ॥७४॥

---

१ मयासुराची. २ उभा असे.

रणीं पाडिलीं दैत्यकूळें अपारें। तया रावणा लागले घायवारे।
बळें झोडितां थोर नेटें पळाला। चळीं कांपतो गर्वताठा गळाला।
रणीं भ्रष्टला तो भयातूर जाला। पुढें रावणू मंदिरामाजि गेला।
समाचार मंदोदरीलागिं बोले ह्मणे आजि युद्धीं बहू कष्ट जाले।
समाचार तो सर्व ही सांगताहे। ह्मणे काय होणार तें होत आहे।
बहूतांपरी तूं मला शीकवीलें। परी मूर्ख मी सर्वही तुच्छ केलें।
करूं काय आतां प्रिये सांग वेगीं। बहू बोलता जाहला ते प्रसंगीं।
त्वरें काळनेमी पुढें पाठवीला। स्वयें शीघ्र ऊठोनि होमास गेला॥
पुढें चालिला वीर तो काळनेमी। बहूसाल तो थोर कापट्य कर्मी।
हनूमंत जाईल द्रोणागिरीला। पथामाजि तो बैसला योग केला॥
वनें कर्दळी पोफळी नारिकेळी। वनें आंवळी जांबळी रम्य वोळी।
बहू वृक्षजाती बहू पुष्पजाती। बहू कूप बावी तळीं ओघ जाती८०
वनें पावनें जीवनें भूवनें तीं। सुखें गोमुखें रम्य वृंदावनें तीं।
तिरें सुंदरें बांधले सार वाटे। अकस्मात ते देखतां सौख्य वाटे८१
रणीं पाडिला वीर सौमित्र जेथें। मिळाले कपी ऋक्ष ते सर्व तेथें।
समस्तां मनीं लागली थोर चिंता। कपी बोलती नासलें कार्य आतां
पुढें राघवा शोक तो आंवरेना। धरीतां बळें धीर पोटीं धरेना।
मिळालीं दळें भोंवतीं दैन्यवाणीं। विलापें वदे राम कारुण्यवाणी॥

पुढें बोलता जाहला वैद्य तेथें।
प्रभू शोक केल्या पुढें काय होतें।
ह्मणे ओषधी शीघ्र आतां अणाव्या।
न जातां निशी सर्व देहीं पिळाव्या॥८४॥

बहूसाल तो पंथ दूरस्थ आहे। करा वेग हा काळ जातो न राहे।
समस्तांकडे पाहिलें राघवानें। कपी बोलते जाहले सर्व मानें॥८३

बळा सारिखी बोलिली सर्वसेना।



१ सुषेण.

निशीमाजि तो आचळू आणवेना।
रघूनायकें पाहिलें मारुतीला।
कपीराज तो शीघ्र ऊदीत जाला॥ ८६ ॥
ह्मणे राम गा मारुते ये प्रसंगीं। विरांसारखी शक्ति तूं बोल वेगीं।
वदे मारुती स्वामि देवाधिदेवा।गिरी आणितों शीघ्र सांगाल तंव्ह
तयें बोलतां राघवा सूख जालें। कपितें प्रतीउत्तरीं गौरविलें।
ह्मणे मारुती जाय गा हे प्रसंगीं। गिरी आणिला पाहिजे रात्रभार्गे
ह्मणोनी तुवां शीघ्र आतांचि जावें।
विरा लक्ष्मणालागिं त्वां ऊठवावें।
कपी मारुती वीर तैसा उडाला।
अकस्मात तो आश्रमामाजि गेला॥ ८९ ॥
स्थळें निर्मिलीं रम्य नाना परीचीं। बहूसाल तीं भूवनें कूसरीचीं।
मुनी बोलती हे दयाळा बसावें। फळें तोय सेवूनि सूखें रहावें ९०
ह्मणे मारुती राहतां पूरवेना। तृषा लागली धीर पोटीं धरेना।
मुनीनें तडागा जळा दाखविलें। जळा सेवितां थोर आश्चर्य जालें॥
जळांतूनि धांविन्नली जी विशाळा[1]। विरें मारुतें देखिलें तीस डोळां
मिठी घातली मारुतें चूर्ण केली। तिच्या मेदमांसें भुमी तृप्त जाली
निघाली तियेंतूनि ते दिव्य कांता निरूपी मुखें सर्व साकल्य वार्ता
ह्मणे राक्षसू बैसला कूडभावें। समर्था प्रभो त्यासि आधीं वधावें
नव्हे मिथ्य साचार हें सांगतें मी। प्रभो धाडिला रावणें काळनेमी।
तयें बोलतां मारुती वाड जाला।ऋषी ऊठला शीघ्र युद्धासि आला
महावीर राक्षेस कैसा कुकर्मी। बहूसाल ते जाहले काळनेमी।
प्रसंगीं तये थोर संग्राम जाला। कपीच्या करें काळनेमी निमाला।
विरें सुंदरीलागिं उद्धार केला। उडाला बळें तो नभामाजि गेला।
गिरीचंद्र टाकूनियां लागवेगीं। कपी वीर द्रोणाचळीं ते प्रसंगीं॥

---

१ विशाळ.

वटा वेढिता जाहला शेष जैसा । गिरी बांधुनी छेदिला शीघ्र तैसा
उडाला नभामाजि तो लागवेगें । बळें जातसे मारुती व्योममार्गें ।
कपी लागवेगें बळें जात आहे । महीमंडळीं तेज हलावताहे ॥
अयोध्यापुरीमाजि रामानुजानें । कपी भेदिला पाडिला एक बाणें
मुखीं रामनामावळी बोलताहे । महावीर तो त्यास येऊन पाहे ॥
ह्मणे कोण तूं सांग आह्मां कपी रे । बहूसाल तूं दीससी साक्षपी रे
मुखीं रामनामें सखा वाटतोसी । विरा कोण तूं कोठपर्यंत जाशी
ह्मणे मारुती वोखटें थोर जालें । सुमित्रासुतालागिं देहांत आलें ॥
समाचार सांगीतला मारुतानें । मुखें बोलिलें शीघ्र रामानुजानें ।
कपी कष्टलासी बहू दूर जातां । सुखें बाणमूखावरी बैस आतां ॥
त्वरें पाठवीतों विरा शीघ्र जावें । पुढें राहिलें कार्य वेगीं करावें ॥
ह्मणे मारुती हें कदाही घडेना । उडाला नभीं लंघितो देश नाना ॥
त्रिकूटाचळीं राम तो वाट पाहे । विरेंवीर तो सर्वही बैसलाहे ॥
अवस्था बहू लागली आवरेना । बहू रात्र जाली कपी कां दिसेना ।
बहू राम तेथें उतावेळ जाला । अकस्मात तों मारुती शीघ्र आला ।
कपी सर्व आनंदले गर्जताती । प्रभूलागिं सांगावया शीघ्र जाती ॥
मनीं चिंतिलें शीघ्र हातासि आलें । तयासारिखें तें समस्तांसि जालें
सुषेणें रस काढिला ओषधींचा । क्षतामाजि तो वोतिला अमृताचा
सुमित्रासुता लागिं आरोग्य जालें समस्तीं विरीं मारुता गौरवीलें
त्वरें ऊठिला वीर सौमित्रबाहो । रघूनायकें देखिला दिव्यदेहो ॥
कपी राम सौमित्र मेळा मिळाला । गिरी मारुती शीघ्र ठेवून आला
पुन्हा मारुती भेटती एकमेकां । तयां देखतां सूख जालें अनेकां ।
कथा ऐकतां नासतें कार्य होतें । महा विघ्न तें भग्न होऊनि जातें ॥
सुखानंद आनंद नाना विलासी । अखंडीत हे माचिती रामदासी

---

१ लक्ष्मणानें. २ चिन्ता.

## प्रसंग नववा.

ह्मणे वीर सौमित्र स्वामी समर्था । बळें तोडिजे थोर चत्वारि ि
सुरेशासि ह्या मुक्त आधीं करावें।अरिभ्रातया राज्य हें शीघ्र द
कपीराजहा राज्यत्यागोनि आला।कपींशींपुन्हां पाहिजे शीघ्रगे
प्रभो नीजबंधूस त्या भेट द्यावी । अयोध्यापुरी सर्व सूखी कर
पुढें शीघ्र त्या रावणाच्या वधातीं।समाधान तें पाविजेतें समस्त
ह्मणोनी त्वरें हेंचि आतां करावें । बळें सर्व लोकत्रया सूख द्यावें
वदे रावणानूज वाक्य प्रमाणें । प्रभो कल्पवृक्षातळीं काय ऊणें
परी होम आरंभिला रावणानें।पुरा जालिया भीडिजे त्यासि को
कपी वीर ते पाठवावे भुपाळें । महाहोम विध्वंसिजे शीघ्र काळें
अरी रावणू तो रणामाजि येतां । पुढें पाठवावें तया मोक्षपंथा ॥
प्रभूहेर ते गुप्त लंकेसि गेले । समाचार साकल्य घेऊनि आले ॥
कपींद्राकडे पाहिलें राघवानें । विरां जाणवीलें तया सुग्रिवानें ॥
पुढें ग्रंथसंख्या[1] कपी सिद्ध जाले । सहस्रें दहा वीर मागें मिळाले
हनूमंत तारासुतू जांबवंतू । गवाप् सुषेणू बळी वीर्यवंतू ॥
सुगंधू कपी नीळ तो शर्म नामें । महा मैंद तो द्वीविदू वीरधर्में ॥
सहस्त्रें दहांशीं बळें सिद्ध झाले । महावीर ते व्योमपंथें निघाले
कितीएक राक्षेस ते रक्षणेशीं । कपींनीं बळें युद्ध केलें तयाशीं ।
मुखें हांकिती हांकिती थोर नेटें । तयां पूसती रे दशग्रीव कोठें ॥
गुहेचे मुखीं लाविली चंड शीळा । तये भोंवते जाहले वीर गोळा
शिळेनें शिळा फोडिली थोर घातें । कपी चालिले ते गुहेचेनि पंथें
पुढें मारुती चालिला लागवेगें । कपी चालिले सर्वही मागमागें ॥
महायोगियाचेपरी बैसला तो । नभीं पावकू तो मडाडीत जातो
तया हाणिते जाहले द्रूमपांगीं[2]।मुखीं हाकिती टाकिती घोर बाणे
शिळा शीखरें हाणिती तो उठेना।कपी लोटती ध्यानत्याचें सुटे

---

१ आर्षरामायणग्रंथसंख्या चोव्वीस हजार. २ झाड.

कितीएक ते गर्जती कर्णबीळीं । मुखमाजि ते टाकिती एक धूळी ॥
विरीं वानरीं मांडिलीसे धुमाळी । बहूतापरी ताडिला होमकाळीं ।
बहूतांपरी मांडिले मेत्न नाना । परी रावणू कांहिं केल्या उठेना ॥
विरें अंगदें थोर वीचार केला । बळें शीघ्र अंतःपुरामाजि गेला ॥
बहूसाल अंतःपुरीं त्या सुनारी । तयांमाजि मंदोदरी मुख्य नारी ॥
तियेलागिं घेऊनि वेगें उडाला । महावीर तेथें अकस्मात आला ॥
अलंकार चीरें करें चूर्ण जालीं । बहू कंकणें भूषणें भग्न केलीं ॥
कपी कंचुकी केश वोढूनि घेती । विटंबूनि लोटूनियां शीघ्र देती ।
अरे रावणा घे तुझी नीज कांता।जगज्जननी आणिली व्यर्थ सीता
तिचें ऊसणें काढिती द्रूमपाणी । वदे मुख्य मंदोदरी दैन्यवाणी ।
अहो प्राणनाथा असें काय केलें । तुह्मां देखतां कीं मला कष्टवीलें
महारम्य नेत्रीं महावोघ जाती । विलापें करूं लागली ते रुदंती ।
करूणास्वरें रावणालागिं बाहे । प्रभू धांव रे वानरू नेत आहे ॥
प्रसंगीं तये थोर आकांत जाला । भुमीकंप होतांचि पाहों निघाला
पुढें अंगदा लात हाणोनि पाडी । तया जांबवंतासि वेगें लथाडी ।
कितीएक ते ताडिले मुष्टिघातें । किती वोढिले पाडिले व्योमपंथें ।
नभीं ऊर्ध्व पाहोनि वेगीं उडाला । बळें झोडिलें पाडिलें मारुतीला
धरी हृदयीं शीघ्र मंदोदरीला विवेकेंचि संबोखिलें त्या वधूला २१
अहल्या सती ते शिळारूप होती । विचारूनि पाहें नळाची दमंती।
बहू कष्टली मुख्य वृंदा पुलोमा । सिता सुंदरी सांगणें काय तुह्मां ॥
बहूतांपरी ते सती तोषवीली । पती धाडितां भूवनामाजि गेली ।
दळें सिद्ध केलीं रथारूढ जाला । रणीं शूर संग्राम सैरा निघाला ॥
प्रतापें बळें वाहिनी घोर चाले । कपी वीर ते सर्व पूर्वीच गेले ॥
पुढें सोडिता जाहला बाणजाळें । बळें धांवती प्रेरिले दूत काळें ॥
कपीभार ऊठावले लागवेगें । करीं घेतलीं वृक्ष पाषाण शृंगें ॥

---

१ आश्वासिलें. २ स्वच्छंद.

बळें टाकिते जाहले द्रुमपाणी । रणीं रावणें भेदिले सर्व बाणीं २५
गळाले महा वीर धाकें पळाले । चळीं कांपती राघवा आड गेले ।
उभा राहिला राम तो वीर गाढा । करीं घेतला चंड वोढूनि मेढा ।
बहू बाण सोडी महा वीर कैसा । रणीं क्षोभला काळ कृतांत जैसा।
महा वीर ते दोघ सन्मूख आले। बळें सोडिती बाण बाणीं मिळाले।

रणामाजि ते तोडिती बाण बाणीं ।
बहू मातली ते विरश्री खुराणी ।
पुन्हा रावणें सोडिल्या बाणकोडी ।
लिलाविग्रही राम तत्काळ तोडी ॥ २८ ॥

बहू क्षोभले व्योम संपूर्ण केलें । शरीं दाटलेंसे नभीं थाट जालें ।
बळें तोडिती एकमेकां विरांचे । पुन्हा मागुती भार येती शरांचे ।
रणीं झुंजती ते महावीर बाहो । मोहो पावले ते भयें केतु राहो ।
बुधा मंगळा थोर आकांत आला ।शनी सोम तो आपधाकें पळाला:
ग्रहानें ग्रहो भूतळालागीं आले । विमानाहुनी देव धाकें पळाले ॥
दिशा दिग्गजां व्यापिलें अंतकाळें।चळी द्वीचळी कांपती ते चळाळे
महावीर ते मातले घोर मारें । दिशा दाटल्या व्यापिले अंधकारें ।
पुढें पाहतां एकमेकां दिसेना । ध्वनी मातली ऊठले घोष नाना ३२
महावीर दोघे रणीं स्तब्ध जाले । पुढें पाहतां बाण बाणीं गळाले ।
पुन्हा मागुती हाणिती एकमेकां । भरें नीकुरें टाकुनी थोर शंका ॥
पुढें रावणू पन्नगास्त्रास सोडी । तयें चालिल्या त्या नभीं सर्पकोडी ।
उभ्या वानरांमाजि आकांत जाले । मुखें बोलती सर्प रे सर्प आले ।
गरूडास्त्र तें राम सोडी भडाडां । नभीं चालिलीं पक्षिकूळें झडाडां ।
तिहीं तोडिलीं सर्पकूळें तडाडां । कपी गर्जती नामघोषें घडाडां ।
पुढें रावणें सोडिलीं तीं अचाटें । नभीं चाललीं थोर गंधर्वथाटें ।
भुमी पाय आकाशपंथीं शिसाळें । बहू भार ते धांवले एकवेळे ॥ ३६

१ धनुष्य. २ मोठी.

निवारावया राम तो तेंचि सोडी नभामाजि तें अस्त्र अस्त्रासि तोडी
रणीं रावणू थोर क्रोधाग्नि ज्वाळा। रुपें जाहला थोर कर्कोट काळा
शरा अस्त्र तें सांडिलें लंकनाथें। बहूसाल वर्षाव केला अनर्थें॥
महासिंह नानापरी सर्प जैसे। महामत्त व्याघ्रापरी बाण तैसे॥३८॥
अशान्यस्त्र सोडूनि राजीवनेत्रें। असंभाव्य तीं चालिलीं वज्रअस्त्रें॥
तिहीं सर्वही बाण छेदून नेले। कपी वीर ते थोर आनंदवीले॥४०॥
तया रावणा कोप पोटीं भडाडी। कडाडीत कोपें रणीं बाण सोडी
अकस्मात तो त्यावरी स्पर्श जाला। गडाडीत मेघापरी शब्द केला
रथारूढ जाला रणीं लंकनाथू। पदीं चालतो रामराजा समर्थू॥
नभीं देव ते देखवेना तयांला। रथू मातली शीघ्र तो पाठवीला४१
बहू अस्त्रमंडीत रत्नीं विराजे। परी अंतकातुल्य तो राम साजे।
नभीं दुंदुभीघोष आकाश गाजे। तया रावणा अंतरीं क्रोध माजे।
पुढें बोलती जाहली घोर वाणी। तुला साह्य जाला रणीं वज्रपाणी
उभा रे रिपू खीळितों आजि बाणीं। तुशीं झुंजतां थोर वाटे शिराणी

तुझा बंधु म्यां पाडिला एकवेळां।
रणामाजि त्या देखिलें त्वांचि डोळां।
तयासारिखें तूज मारीन आतां।
पतंगापरी जाळितों जातजातां॥ ४४ ॥

पुढें ऐकतां राम बोले तयासी। ह्मणे ऐक रे रावणा गर्वराशी।
असंभाव्य रे वैभवें मातलासी। मराया रणीं आजि तूं पातलाशी।
ह्मणे राम रे रावणा वीरधर्में। रणामाजि मी तूज मारीन नेमें।
पळालासि कोठें तरी हें सुटेना। तुझी मृत्युवेळा कदा पालटेना॥

रिपू जाण रे तूजला मृत्यु आला।
दिल्हें अक्षयी राज्य बीभीषणाला।
सितेकारणें थोर कापट्य केलें।

---

वज्रास्त्र. २ सोडिलें. ३ प्रीति.

अभाग्या तुझें सर्वही राज्य गेलें ॥ ४७ ॥
तयें बोलतां कोपला वीर गाढा रणामाजि त्या घर्डिल्या वज्रदाढा
पुढें शूळपाणी करी सज्ज मेढा। बळें बोढितां चूकला राम वोढा ॥
कडाकडीत घोषें रणीं तेचि काळीं रघूनायका बैसला बाण भाळीं
असंभाव्य तो कोपला चापपाणी। दशग्रीव तो छेदिला शीघ्र बाणीं

बळें मारिती वारिती बाणजाळें।
पुन्हा क्षोभले धांवती ते उफाळें।
रिपू कोपला थेर काळाग्नि जाला।
तया रावणा थोर आवेश आला॥१९ ॥

प्रतापें रणीं राघवें एकवेळे। बळें फोडिलीं बाणघातें कपाळें।
रथी सारथी पाडिले अश्व जे कां। विरें नीकुरें भेदिलें एकमेकां ५१॥
बळें छेदिता जाहला वोष्ट्रदंती । बहू बाण ते सोडिले व्योमपंथीं ।
कितीएक ते राघवें चूर्ण केले। कितीएक ते बाण अंगीं बुडाले ५२॥
तया देखतां रावणू हाक फोडी। असंभाव्य ते मागुते बाण सोडी।
बळें अश्व ते मातली भग्न केला। ध्वजस्तंभ तो शीघ्र छेदून नेला ॥
भयातूर ते भार गोळांगुळांचे। ऋषी देव गंधर्व इत्यादिकांचे।
रणीं आगळें दाखवी लंकनाथू। भयू बोलती मांडिला कीं अनर्थू ५४

पडे मातली अश्व तेही पळाले।
ऋषी देव गंधर्व साशंक जाले।
कपी बोलती मांडलें विघ्न हें कीं।
रणामाजि त्या रावणें जिंकिलें कीं ॥ ५५ ॥

अगस्ती ऋषी तो रणामाजि आला। रणीं मंत्र सांगे तया राघवाला।
जपे आदरें राम तो मूळमंत्रें। रवी शीघ्र येऊनि दे सारशस्त्रें ॥ ५६॥

ह्मणे राघवा जिंकिशी रावणाला।
अतीकाळ हा वेळ नाहीं तयाला।

---

१ आवेशानें.

पुढें राघवें विंधिले पंच बाणीं।
तुरंगू रणीं पाडिले दैन्यवाणी ॥ ८७ ॥
रणीं राघवें चूर्ण केलें रथाचें। बळें ऊसणें घेतलें मातलीचें।
विरें सारथी धाडिला मृत्युपंथें। ध्वजस्तंभ तो पाडिला बाणघातें।
पुन्हा राघवें मागुती तेचि काळीं। रिपू भेदिला बाणजाळीं कपाळीं
सुरां देखतां थोर आनंद जाला। महाद्भुत तो वानरीं घोष केला ॥
असंभाव्य त्या राक्षसा कोप आला।
बळें टाकिलें शीघ्र तेणें शुळाला।
रणीं फोडिली हाक नैर्ऋत्यनाथें।
ह्मणे शूळ आला प्रभो व्योमपंथें ॥ ९० ॥
बहू बाणसंभार जातां जळाला। पुढें शूळ पाशूपतें भग्न केला।
पुन्हा राघवें थोर संधान केलें। असंभाव्य ते पोकळीमाजि नेले ९१
सुरेशें गिरी फोडिला वज्रघातें। तयाचे परी भेदिलें रावणातें।
देहें खिळीला बाण पैलाड गेला। महीमंडळामाजि जातां निवाला
पुन्हा सोडिलीं राघवें बाणजाळें। बहूसाल सूसाटती अंतराळें।
रथीं खीळिला प्राण व्याकूळ जाला। बहू मूर्छना सांवरेना तयाला
रिपू भेदिला थोर लक्षून वर्में। उभा राहिला राम तो वीरधर्में।
रथू सारथी शीघ्र घेऊन गेला। पुढें शुद्धि जाली तया रावणाला॥
बहू कोप आला तया रावणासी। ह्मणे सारथ्या तूं भयातूर होसी।
रथू काढिला कां तुवां लागवेगीं। न येतां उणें दीसतें या प्रसंगीं ॥
ह्मणे सारथी स्वामिया हो उदारा। रिपू पेटला तो रणीं घोर मारा।
रथारूढ राया तुह्मी वीकळांगें। ह्मणोनी रथू काढिला लागवेगें ॥
तयें बोलतां राव संतुष्ट जाला। समर्पीतसे हातिच्या कंकणाला।
बहू वेग केला तया लंकनाथें। रथू फीरवीला रणाचेनि पंथें ॥९७
रणीं माजल्या त्या बहु प्रेतराशी। पुढें जावया वाट नाहीं रथासी।

१ रावणानें.

भुमी दाटली मेदमांसें अचाटें। रथांगें बळें वाजती चर्चराटें ॥६८॥
समारंगणीं रावणू शीघ्र आला। वदे घोरवाणी तया राघवाला।
उलंघी सिमा शीघ्र मृत्यू जयाला। रणीं कोण लेखा तुला मानवाला।
असंभाव्य तो रावणू बाण सोडी। नभीं वावडीचे परी ते झडाडी।
उफाळें बळें धांवती दिव्य घोडे। रथा माजि सघट्टणीं घोष गाढे
धुरा ऊलथों पाहती शीघ्र मार्गे। विरीं वोढिले बाण ते लागवेगें।
रथामाजि तो पैस ऊदंड जाला। विरां मागुता थोर आवेश आला।
रणीं राघवा रावणा युद्ध काळू। रिपूभार संहार भूतां सुकाळू।
करीं चंड कोदंड मंडीत बाणीं। उभे राहिले वीर ते वज्रठाणीं॥७२
रणीं एकमेकांसि ते घोर शब्दें। बहू भाषणें त्रासती वीर द्वंदें।
बळें धांवती क्षोभले वीर क्रोधें। पुढें मारिती शस्त्र क्रोधें विरोधें ॥
रणीं लोटला राम हा सूर्यवंशी। महायुद्ध आरंभिलें रावणाशीं।
उभे राहिले काळकृत्तांत जैसे। महावीर त्या घोर आकांत भासे ॥
बळें सोडितां शक्ति नेटें सरारी। महावात प्रळयात पिच्छीं भरारी
मही सप्तपाताळ घोषें गरारी। पळालीं भुतें काळ पोटीं थरारी।
फणी कूर्मवाराह चकीत जाले। विमानाहुनि देव ऋषी पळाले।
ग्रहो सोमसूर्यादि पोटीं गळाले। कपी खेचरां दिग्गजां कंप जाले
प्रसंगीं तये थोर उत्पात जाला। नभीं शोणिताचा बळें पूर आला
धुमारा बहू दाटलासे दिगंतीं। असंभाव्यते ऊलकापात होती ७७
बळें कांपले रुद्र कालाग्नि जैसे। अरीराय ते मातले भीम तैसे।
वयां झुंजतां कोण कोणा निवारी। रणीं भीडती काळ कोदंडधारी
रिपू सांडिती घोर शस्त्रें झणाणा। बळें वाजती बाणभाळी[1] खणाणा
बहूसाल स्फुलिंग[2] जाती फणाणा। महीमंडळीं घोष ऊठे दणाणा॥
महाशक्ति ते काळरूपें कडाडी। असंभाव्य ते ज्वाळ ऱ्हीं भडाडी।
मही मेरु मंदार घोषें गडाडी। बळें शोषतां सिंधु पोटीं तडाडी॥

---

१ चक्रें. २ ठिणग्या.

पुढें राघवें लक्षिलें रावणातें । बळें मस्तकें तोडिलीं बाणघातें ।
गिरीशीखरांचेपरी तीं विशाळें । पुन्हा नीघती कंठनाळें दिसाळें ॥
शिरें देखतां राम चकीत जाला । ह्मणे मृत्यु नाहीं गमे रावणाला ।
वदे मातली स्वामि देवाधिदेवा । सुधावक्ष भेदून शत्रू वधावा ॥
कुपी फोडिली बाणघातें निवातें तयें रावणू चालिला मृत्युपंथें ।
ऋषी देव गंधर्व ते सर्व तोषें । विमानीं सुखें गर्जती नामघोषें ॥
नभीं दुंदुभी वाजती एकनादें । बहूतांपरीचीं बहूसाल वाद्यें ।
ध्वनी दाटले पूर्ण ब्रह्मांड घोषें । कपी गर्जती नामघोषें विशेषें ॥
सुखानंद आनंदली सर्व सृष्टी । विमानाहुनी जाहली पुष्पवृष्टी ।
ऋषी देव गंधर्व सर्वै मिळाले । विणे लावुनी नारदादीक आले ॥
मिळाल्या सुखें नायिका अष्ट भावें । करीं ताळ मृदंग वीणे स्वभावें ।
कळा कौतुकें दाविती ते प्रसंगीं । गुणी नाचणी नाचती रागरंगीं
बहू गायनें थोर गंधर्व गाती । कळा ऐकतां देव थकीत होती ।
जयांच्याअलापें देहभाव जाती मृगें श्वापदें लाभल्यात्या द्विजाती
रुपें सुंदरी किन्नरी दिव्य यंत्रें । बहूसाल विद्याधरी गूणपात्रें।
उठे रागकल्लोळ सप्त स्वरांचा । गमे बोळला मेघ हा अमृताचा ॥
तुरें वाजती अंबरीं शंख भेरी । जयो पावला राम लीलावतारी ।
सुरां मानसीं थोर आनंद जाला । महाघातकी रावणू तो निमाला॥
समस्तां सुरां मानसीं सौख्यजालें परी दुःख बीभीषणा प्राप्त जालें
रणीं रावणू श्रेष्ठ बंधू निमाला । झळंबे मनीं शोक उत्पन्न जाला
रुदंती प्रसंगीं ध्वनाघोष जाला झळंबे मनीं दुःख बीभीषणाला
अहा हो अहा हो मुखीं बोलताहे।विलापेंचि तो श्वास टाकीत आहे
बहू लोटले वोघ नेत्रोदकाचे । दिनासारिखे शब्द करुण्यवाचे ।
घडीनें घडी तो भुमी अंग घाली । अरे भ्रातया शुद्धि सर्वै उडाली
देहभाव सांडून तो रूंदताहे । मोहोजाळ होतांचि आक्रंदताहे ।

१ अमृतयुक्त हृदय, २ नाचणाऱ्या.

बहूता परीचें बहू सौख्य दीलें । मनामाजि तें सर्वही आठवीलें ॥
सुखें श्वास सोडूनि पाणी चुरीतो । भुमी मस्तकू आपटीतो पिटीतो
ह्मणे वीर तो वोखटा काळ आला । त्रिकूटाचळाचा अळंकार गेला
नव्हे रावणासारिखा संपतीचा । नव्हे रावणासारिखा वित्पतीचा
बहू सांगतां वैभवालागिं कांहीं । प्रतापी तयासारिखा वीर नाहीं ॥
मनाचा उदारू धनाचा कुबेरू । बहूसा विचारू जगीं दानशूरू ।
गळाला बहू धीर त्या राक्षसांचा महीमंडळीं धाक गेला सुरांचा ॥
बहूतां जनांचें बहू भाग्य गेलें । गमे सर्व ब्रह्मांड हें वोस जालें ।
जयाकारणें देव लीलावतारी तयाच्या गुणा तूळणा कोण सांरी
उदासीन वाटे जनीं पाहवेना । मनीं स्वस्थ नाहीं तया राहवेना ।
गताचे गुणें वीर तो मग्न जाला । तयालागिं वारावया राम आला॥
उमा चापपाणी वदे रम्य वाणी । सदा सर्वदा गाइजे जो पुराणीं ।
ह्मणे गा विरा थोर आश्चर्य जालें । मोहोसागरीं ज्ञानतारू बुडालें॥
तयासारिखें आजि हें दीसताहे । प्रभू बोलतां वीर तत्काळ राहे ।
करीं घेतलें शीघ्र बीभीषणाला । कृपाळू दिनाचा दळामाजि आला
ह्मणे राम बीभीषणा बुद्धिमंता । रणीं रावणालागिं देहांतवेथा ।
तुह्मीं शीघ्र आतां पुरामाजि जावें । समस्तांसि पाहावया आणवावें
समर्था-मनीं लागली सर्व चिंता । परी अंतरा जाणतो सौख्यदाता
तयाची कथा ऐकतां दुःख नासे । चरित्रें बरीं अंतरीं दास तोषे ॥

---

## प्रसंग दाहावा.

तया रावणालागिं देहांत आलें । प्रधानासि बीभीषणें पाठवीलें ।
तुह्मीं शीघ्र अंतःपुरामाजि जावें । समस्तांसि तत्काळ घेऊन यावें
प्रभू बोलतां वीर तैसे निघाले । पुढें शीघ्र अंतःपुरामाजि गेले ।
समस्ता वधू मार्ग लक्षीत होत्या । उदासीन उद्विग्न चिंतातुरा त्या

---

१ उत्तम.

तदा देखिले ते अकस्मात डोळां। भयातूर त्या कंप सूटे चळाळां॥
तयांमाजि मंदोदरी मुख्य नारी। तये सांगती हो निमाळा सुरारी
प्रसंगींतये थोरकल्लोळ जाला।दुखामाजी तो सौख्यासिंधू बुडाला
भुमी लोळती रूदंती एक वेळा। देहे व्यस्त हाणोनि घेती कपाळा
समस्तां जणींचे महाशब्द जाले। दुखाचे तया योग सर्वै मिळाले।
मुखें बोलती थोर कल्लोळ जाला।समस्तां मुखांचा अळंकार गेला
धुळी टाकिती ऊर हाणून घेती। धरेना असंभाव्य जाली रुदंती।
चिरें फाडिती ते अळंकार गेले। भुमी लोळती मोकळे केश जाले।
पुढें सर्व राजांगना त्या निघाल्या दशग्रीव जेथें रणामाजि आल्या
रणीं कांत देखून आक्रांत केला।बहू पाप हो वोखटा काळ आला॥
अकस्मात तें सर्व सौभाग्य गेलें। समर्था प्रभू कां उदासीन केलें।
समस्तांसि शोकार्णवीं बूडवीलें। असंभाव्य हें दुःख टाकूनि आलें
ह्मणे राम बीभीषणा जाय आतां। बहूतापरी तोषवावें समस्तां।
निमाल्यावरी वैर कां हो करावें। विवेकेंचि मंदोदरी नीववावें॥९॥
कृपासागरें वीर तो पाठवीला। अकस्मात राजांगनांमाजि आला
प्रबोधेंचि नानापरी तोष केला। समस्ती जणी भूवना पाठविल्या
पुन्हा मागुती वीर तत्काळ आला। ह्मणे हो प्रभू पाठवीलें तयाला
वदे मागुता राम बीभीषणाला। रणीं रावणू अग्नि द्या जा तयाला
पुढें ऊठला तो रणामाजि आला। हुताशीं तया रावणा वीधि केला
समुद्रीं शुचिष्मंत होऊनि आला। नमस्कार केला तया राघवाला
वदे राम तैसाचि त्या बांधवातें। कपीनाथ सुग्रीव राजा तयातें।
तुह्मीं शीघ्र नैर्ऋत्यनाथासि न्यावें। विधीयुक्त भद्रासनीं बैसवावें॥
महावीर तीहीं नमस्कार केले। पुढें सव्य घालूनि तैसे निघाले।
सवें चालली ते असंभाव्य सेना। ऋषी देव ते रूढ जाले विमाना॥
बहूसाल वाद्यध्वनीं घोष जाला। बळी गर्जती नाद गेला भुगोळा

---

१ बिभीषणाला. २ सिंहासनीं.

कपीनाथ सौमित्र ते राजभारें। दळें चालिलीं वानरांचीं अपारें॥
महादूत वेगीं पुढें पाठवीले। बळें सिद्ध लंकापुरीमाजि गेले।
त्वरें लाविलें काम पूर्वीच तीहीं। बहू वेग त्या राक्षसां वानरां ही॥
बहूसाल कामार[1] ते लक्ष कोटी। स्थळें सिद्ध होतां असंभाव्य दाटी
प्रसंगीं तया तांतडी फार जाली। पहाया सुखें लोकमांदी मिळाली
शिड्या पायिंच्या उंच आकाशपंथें।असंभाव्य तें लागलें काम तें
बहू जाणते वेग मोठ्या बळाचा। पुरीमाजि तो एक मेळा तयांच
कपींच्या करें अल्पशी भग्न जाली। पुरी मागुती सर्वही सिद्ध केली
त्रिकूटाचळीं भव्य चत्वार[2] द्वारें। विशाळें नभासारिखीं थोरथोरें॥
दिसे रम्य लंकापुरी कांचनाची। बरी पाहतां हांव पूरे मनाची।
हुडे[3] कोट गेले नभामाजि उंची। जगीं धन्य निर्माण केली विरंचीं[4]
पहाया गवाक्षें लघू दीर्घ द्वारें। बहूसाल जाळंधरें थोरथोरें।
असंभाव्य चर्या गिरी तो विलासे। वरी सर्व रेखाटिलें व्योम भासे॥
हुडे कोट दामोदरें थोरथोरें। सजे बाहुड्या चौक नाना प्रकारें।
महा मंदिरें सुंदरें थोरथोरें। भुयेरें बरीं वीवरें तीं अपारें॥ २२ ॥
बहू चित्रशाळा बहू होमशाळा। बहू सुंदरा धर्मशाळा विशाळा।
तके थोर वृंदावनें पार ओटे। सभामंडपीं देखतां सौख्य वाटे ॥२३

विदी हाट बाजार माड्या दुकानें।
मठ्या पर्णशाला महा यागस्थानें।
वनें वाटिका जीवनें ओघ जाती।
झरे कालवे वाहती पाट जाती ॥ २४ ॥

ध्वजा गोपुरें शीखरें तीं अपारें। बहु देव देवालयें थोरथोरें।
तळीं कूप बावी जळें पूर्ण जालीं। बहूता परींचीं स्थळें सिद्ध केलीं
बळी झाडिती लोटिती सर्व शाळा सडे शिंपिती घालिती रंगमाळा
सुगंधी बहू गुंफिल्या पुष्पमाळा। जळें निर्मळें बैसका त्या सुढाळा

---

१ मजूर. २ चार. ३ बुरूज. ४ ब्रह्मा.

सुवर्णाचिया रत्नमंडीत भिंती। हिरे पाच गोमेद ते ढाळ देती।
सडे शिंपिले कस्तुरी केशरानें। बहूसाल तीं रम्य यानें विमानें २७
ध्वजा त्या गुढ्या तोरणें ऊभवीलीं। पुरी सर्व शृंगारमंडीत केली।
पताका निशाणें वरी दिव्य छत्रें। बहू चामरें दिव्य मार्तंडपत्रें २८
तथा राजद्वारीं बहू दाटि जाली। सभामंडपीं मंडळी ते मिळाली[1]।
पुढें रावणानूज शृंगारवीला। विधीयुक्त भद्रासनीं बैसवीला २९॥
धमामा नभीं दुंदुभीनाद जाला। सुरीं अंबरीं पुष्पवर्षाव केला।
रघूनायकें सेवका राज्य दीलें। सुरां सोडिलें थोर आनंदविलें॥३०

असंभाव्य तो वाद्य कल्लोळ जाला।
निशाणावरी तो विरीं घाव केला।
महावीर संतोषले राज्यतोषें।
बहूसाल ते गर्जती नामघोषें॥ ३१ ॥

समस्तांजणांचें बहू पाप गेलें। सुरांचें महा शल्य निर्मूळ केलें।
यथासांग लंकापुरी ते प्रसंगीं। विरीं वानरीं पाहिली लागवेगीं।
पुढें सर्वही वीर तैसे निघाले। रघूनायका भेटले स्वस्थ जाले॥
समाचार ते सर्वही सांगताती। जगन्नायका थोर आनंद चित्तीं।
ह्मणे राम गा मारुती ये प्रसंगीं। अशोका वना जाय तूं लागवेगीं॥
समाचार सांगें तये सुंदरीला। कपी वीर तो शीघ्र तैसा निघाला॥
अशोकीं वसे जानकी शोक भारी। अकस्मात तेथेंचि आला वनारी
नमस्कार घालूनि तो बोलताहे। सुवेळे समस्तांस कल्याण आहे।
दशग्रीव संहारिला लंकवासी। प्रतापें दिलें राज्य बीभीषणासी॥
प्रभूनें समाचार हा सांगवीला। तयीं जानकी थोर आनंद जाला॥
स्तुतीउत्तरें बोलती एकमेकां। सिता तोषली दूरि टाकून शंका॥
ह्मणे मारुती हा समाचार नेतों। पुढें जावया शीघ्र जाऊनि येतों॥
नमस्कार केला तये जानकीसी। ह्मणे रे कपी तूं चिरंजीव होसी॥

---

१ चमक. २ मारुति.

त्वरें चालिला भेटला राघवाला। पुन्हा मागुती पाठवीलें तयाला॥
ह्मणे गा विरा सांग बीभीषणातें।वना जाउनी आणिजे जानकीतें
दिजे मंगळस्थान नाना प्रकारें। सुगंधें फुलेलें अळंकार चीरें॥
महा वीर ते शीघ्र तैसे निघाले। पहाया सिता सर्वही सिद्ध जाले॥
बहूसाल वाद्यें दळेंशीं निघाले। कपी लागवेगीं त्रिकूटासि गेले॥
सुवेळाचळामाजि तो रामराजा। पहाया तया चालिल्या देवफौजा।
मदोन्मत्तऐरावतारूढ जाला। सुरांशीं सुरेंद्र[1] पुढें शीघ्र आला॥
पुढें शीघ्र मेषारुढें[2] पावकानें। करीं शुभ्र शक्ती तया ताम्रवर्णें॥
बहू भूषणें देव तो अग्नि आला। सुखें चालिला राम पाहावयाला॥
पहा दंडपाणी महामेघ जैसा। तयालागि बैसावया थोर ह्मैसा॥
पती दक्षिणेचा तदारूढ जाला। सुखें चालिला राम पाहावयाला
नरारूढ होऊनि नैर्ऋत्यनाथें। त्वरें जाइजे धूम्रवर्णें समर्थें॥
करीं खड्ग घेऊनियां सिद्ध जाला।सुखें चालिला राम पाहवयाला
जळाधीश[3] नक्रीं समारूढ जाला।करीं पाश तो शीघ्र घेऊनि आला
सर्वे सागरांचा समूदाव आला। सुखें चालिला राम पाहावयाला।
निळा वर्ण तो वायु अंकूशपाणी। मृगारूढ होउनियां नीळवर्णी।
सुताच्या गुणें आवडीनें निघाला। सुखें चालिला राम पाहावयाला
गदा घेउनी तो प्रभू उत्तरेचा। हयारूढ तो शुभ्र वर्णू तयाचा॥
महा सुंदरू तो सुधारूप आला। सुखें चालिला राम पाहावयाला।
रुपें कर्दळीसूत तो शूळपाणी। जपे अंतरीं रामरामेतिवाणी॥
महादेव नंदीवरी रूढ जाला। सुखें चालिला राम पाहवायाला।
गणेशीं गणाधीश अंकुशपाणी। चतुर्भुज तो भव्य सिंदूरवर्णी॥
महास्थूळ तो मूषकारूढ जाला। सुखें चालिला राम पाहावयाला।
सुरांचा गुरू अंगिरा[4] दूसरा तो। प्रतापें कुबेरू धनाचा बळी तो॥
रथारूढ होऊनि मार्तंड आला। सुखें चालिला राम पाहावयाला॥

---

१ इंन्द्र. २ मेंढ्यावर बसलेला. ३ वरुण. ४ गुरु.

विधी मुख्य हंसासनीं सृष्टिकर्ता। तयाचेनि उत्पत्ति हा विश्वभर्ता।
ऋषीदेव गंधर्वमेळा मिळाला। सुखें चालिले राम पाहावयाला॥
गुणी नाचणी गायका स्वर्गवासी।
अलापें कळा कूशळा त्या विलासी।
दळें भूतळीं चालिले देव कोटी।
बहूता परी चालिले रामभेटी
सदाशीव तो शीघ्र भेटीस आला।पदीं चालि तो राम सन्मूख आला
प्रितीनें सखे भेटती एकमेकां। तयां भेटतां सौख्य जालें अनेकां॥
विरंचीस आलिंगिलें राघवानें। बहू सूख तें मानिलें ब्रह्मयानें।
पुढें भेटला शक्र सूखें निघाला। तया मानसीं थोर आनंद जाला॥
ऋषी देव गंधर्व सर्वै मिळाले। पुढें राम आलिंगनीं सिद्ध जाले।
समस्तांसि तो भेटला रामचंद्र। मही लोटला सर्वसूखें समुद्र॥
सभा बैसली सर्वही स्वस्थ जाली।कथा राहिली पाहिजे चालवीली
रघुनायकें मारुती पाठवीला। त्वरें शीघ्र लंकापुरीमाजि गेला॥
पुढें भेटला शीघ्र बीभीषणातें। बहूसाल सन्मानिलें मारुतीतें॥
तयालागिं उच्चासनीं बैसवीलें। ह्मणे आजि हें भाग्य माझें उदेलें॥
सखा वाटसी राघवें धाडिलासी। बहूसाल तें सौख्य जालें मनासी
प्रभूची मला काय आज्ञा करावी।शिरीं वंदितों मी, करन्यास दावी
पुढें मारुतें मात ते जाणवीली। ह्मणे जानकी वैभवें आणवीली॥
महावीर ते शीघ्र तैसे निघाले। दळेंशीं अशोकावनामाजि गेले॥
बहूसाल यानें गजा घोडियांचीं।सर्व चालिलीं दिव्य सूखासनांचीं
महावीर ते सर्व येऊनि मागें। त्वरें वीर ते चालिले लागवेगें॥
पुढें भेटते जाहले जानकीला। नमस्कार साष्टांग केला तियेला॥
अनूवादिजे शीघ्र नैऋत्यनाथें। तुह्मां न्यावया पाठवीलें समर्थें॥
तरी जननी शीघ्र आतां उठावें। महा मंगलस्नान आधीं करावें।

---

 १ हात जोडणें.

अळंकार चीरें पुढें सिद्ध केलीं । सुगंधेल तेलें बहू आणवीलीं ॥
बहूसाल आनंद तो जानकीला । स्तुती उत्तरीं गौरवीलें तयाला ।
ह्मणे मारुती जन्ननी मान दीजे । उदासीन बीभीषणाला न कीजे
कपी बोलतां मान्य ते गोष्टि केली।सर्वे राक्षसी शीघ्र तैशी निघाले
बहूसाल उष्णोदकें सिद्ध होतीं । बहू कूशळा राक्षसी माखिता
स्तूती उत्तरीं माखिलें जानकीला ।
ह्मणे आजिचा दीन हा धन्य जाला ।
चिरें सुंदरें कंचुकी रत्नमाळा ।
सुगंधी बहू घातल्या पुष्पमाळा ।
अळंकार भांगारें[1] जांबूनदाचे[2] । महीमंडळींच्या नृपाळांस कैंचे ।
तया मारुतें बैसका सिद्ध केली । जगज्जननी बैसली सिद्ध जाली
पुढें ठेविलें पात्र सूधाफळांचें । शकूनार्थ द्यावें ह्मणे रम्य वाचे ॥
दिलीं पंचकें दोनि दोघां जणाला ।
कपी मारुती आणि बीभीषणाला ।
जिवाच्या सख्या राक्षसी जानकीच्या ।
बहू दीस होत्या वनीं संगतीच्या ।
दिलीं पंचकें दोन दोघीं जणींला । महाशर्म नामें तये त्रीजटेला ॥
ह्मणे जानकी लोभ आतां असावा । उदासीन वाटे बहूसाल जीव
समस्तां जणांतें फळें पाठवीलीं । सुखें जानकीनें बहू स्तूति केली।
फळें सेविलीं आच्मनें शुद्धि केली।पुढें शीबिका ते विरें आणवील
पताका चिरें सुंदरें दिव्य छत्रें । पुढें विंजणे चामरें तें विचित्रें७०।
दळें चाललीं दाटणी थोर जाली ।
सिता शीबिकेमाजि तैशी निघाली ।
तुरें सुंदरें गंभिरें वाजताती ।
असंभाव्य वाद्यें ध्वनी गर्जताती ॥ ७१ ॥

---

१ भूषणें. २ सुवर्णाचे.

महा सुंदरें रम्य दिव्यांबरें ते। वरी सर्व आच्छादिलें शीबिकेतें।
पुलस्ती कपी वीर सन्नीध जाती। पुढें वारेती वेत्र घेऊनि हातीं॥
अशोकावनींहूनि ते लागवेगें। बहूवीध सन्नीध येती प्रसंगें।
सवें चालिले लोक त्रीकूटवासी। पहाया अती आदरें जानकीसी॥
सभे वैसला देव कैलासवासी। गणाधीश तो ईश सर्वां गुणांसीं।
विधी शक्र ते सर्व गंधर्व आले। ऋषी देव तेतीस कोटी मिळाले७४

मिळाले कपी रीस कोट्यानुकोटी।
सिता आणितां जाहली थोर दाटी।
शतांचीं शतें धांवती वेत्रपाणी।
दळें वारिती गर्जती घोर वाणी॥ ७५॥

पहाया सिता वीरमांदी मिळाली। प्रसंगीं तये दाटणी थोर जाली।
बळें टाकिती एकमेकांसि मागें। कपी रीस ते धांवती लागवेगें।
झडा घालिती एकमेकां पुढारें। दिसेना पदीं सर्व सेना उभारे।
पुढें पाहया घालिती मस्तकांतें। महावीर ते हाणिती वेत्रघातें ७७
कितीएक आकाशपंथीं उडाले। कितीएक ते वृक्षअग्रीं दडाले।
कितीएक ते फीरती अंतराळीं। कितीएक ते घोष उल्लासकाळीं।
कपींचीं दळें चंचळें फार जालीं। महाभार देखोनि मागें पळालीं।
बळी गर्जती थोर घोपें फुराणें। वरी साधिती अंतराळीं किराणें॥
महाभार देखोनि महाविरांचे। भ्रमों लागले भार गोळांगुळांचे।
दिसेना सिता आर्त पोटीं सरेना। उतावीळ त्यां धीर पोटीं धरेना
कपी धांवती शीघ्र पाहावयाला। परी रीघ नाहीं पुढें जावयाला।
प्रसंगीं महा भार देखोनि दृष्टी। रघूराज तो बोलिला एक गोष्टी॥
सितेकारणें वानरीं कष्ट केले। किती वेळ हे बाणघातें निमाले।
उतावीळ पोटीं पहाया सितेला। दिसे स्पष्ट ऐसें करावें तियेला ८२
महोत्साव यात्रा तयः पर्वकाळीं। विवाहीं युधांतीं तथा अंतकाळीं।

---

१ आवेशानें. २ उड्या. ३ इच्छा. ४ मेले.

गृहीं सासऱ्याचे तया जन्नकाचे। नव्हे नित्य ते संगती नोवऱ्याचे॥
पुढें धाडिलें शीघ्र त्या अंगदाला। ह्मणे रे तया सांग बीभीषणाला
ह्मणावें बळें आपुले लोक वारा। पुढें शीघ्र येऊनियां दूरि सारा ॥
त्वरें धांवला राव त्रीकूटवासी। बहू वारिलें मारिलें राक्षसांसी।
पुढें काढिले पट्टकूळा सकूळा। दिसों लागली जानकी दिव्य बाळा
समस्तीं सिता देखिली आदरेंशीं। असंभाव्यसौंदर्यलावण्यराशी
तये देखतां सर्व सूखें निवाले। कपी बोलती आजि निष्पाप जाले॥
सिता देखती जाहली रामचंद्रा। नमस्कार केला तसाची महेंद्रा।
तया राघवें पाहिलें जानकीला। पुढें भ्रूलता वक्र अव्हेर केला ८७
उदासीन ते जानकीलागिं केलें। सभामंडळीं सर्व बेरंग जाले।
सभेमाजि ते बोलती एकमेकां। सितेलागिं अव्हेरिलें राघवें कां॥
अवस्था बहू लागली ते प्रसंगीं। बुडाले कपी धीर सर्वै विरंगीं।
मुखें बोलती सर्वही कोण वेळा। शिणे मारुती कंप जाला भुगोळा

सभा बैसली त्या द्विजांब्राह्मणांची।
असंभाव्य सौंदर्यता त्या सितेची।
कितेकीं मनामाजि संकेत केला।
तिहीं अंतरीं कल्पिले दोष तीला॥ ९० ॥

रघूनाथ हा हेत जाणे मनींचा। सदा सर्वदा साक्ष सर्वा जनांचा।
जिवांतील जाणे तया चोरवेना। महा पातकी पाप त्याचें सरेना

ह्मणोनी प्रसंगें उदासीन केलें।
जनीं कल्पिलें सर्वही व्यर्थ गेलें।
ह्मणे राम तो जानकीलागिं जावें।
स्वइच्छासुखें त्वां दिगंतीं फिरावें॥

प्रसंगीं तये शब्दकाठिन्य रामें। मुखें बोलिजे अर्थभेदें विरामें।
अधोमूख सीता विलोकी भुमीतें। मही भींजती जाहली अश्रुपातें॥

---

१ चिन्ता.

म्हणे न्याय अन्याय सर्वै बुडाला ।
दिसे आज कल्पत्तरू वांझ जाला
नसे अल्प अन्याय ब्रह्मांड केला ।
वृथा दंड हा कोण धर्मैं मिळाला ॥ ९४ ॥

मनीं अल्प हे कल्पना कां करावी म्हणे कल्पिली बुद्धि पोटीं धरावी
बहूसाल बोलोनियां काय आतां । महासौख्य तें पावकें भस्म होतां
म्हणे जानकी त्या रिसां वानरांसी । बहूसाल ते कष्ट जाले तुह्मांसी ।
परी मागुती एक जीवीं धरावें । बहूसाल त्या पावका चेतवावें ।
पुढें शीघ्र खाणोनियां कुंड केलें । असंभाव्य त्या पावका चेतवीलें ।
शिखा धांवती ऊर्ध्व आकाशपंथें । पिडा जाहली खेचरां भूचरांतें
विरंचीहरादीक देवां समस्तां । मनामाजि ते थोर जाली अवस्था
मुखें बोलती सर्वही कार्य जालें । परी मागुती काय हें विघ्न आलें ॥
स्वभावेंचि हा वन्हि जाळीत आहे।तयामाजि हे जानकी केंवि राहे
धडाडीत ज्वाळा पुढें पाहवेना । तया अंतरीं ही उभें राहवेना९९॥
मनामाजि पूजा यथसांग केली । पुढें जानकी पावकामाजि गेली ।
तये स्पर्शतां पावकू सिद्ध जाला । निवाला प्रसंगीं तये शांत झाला
तयामाजि ते जानकी शोभताहे । समस्तीं सभा लोक त्रैलोक्य पाहे
पुटीं घालिजे पूतळी कांचनाची । तयेहूनि ते दिव्य काया सितेची॥
अळंकार चीरें बहू पुष्पमाळा । सुगंधें तनू चर्चिली दिव्य बाळा ।
जगज्जन्ननी शीघ्र बाहेर आली । सभे देखतां दिव्य सीता निघाली
महावीर ते गर्जले नामघोषें । कपीवीर ते तोपले सर्व तोषें ।
सुरीं अंबरीं पुष्पवर्षाव केला । नभीं दुंदुभीनादकल्लोळ जाला ॥
सिता मुख्य ते पावकामाजि होती । वृथा रावणें चोरिली हे वदंती ।
रमा सागरांतूनि नेली हरीनें । तयाचेपरी जानकी राघवानें ॥
पुढें जानकी रामअंकीं विराजे । रमा आदिनारायणा जेवि साजे

१ अग्नीनें. २ ज्वाला. ३ ब्रह्मा शिव इ० चिन्ता. ५ वार्ता.

असंभाव्य तो वाद्यकल्लोळ गाजे । कपींवाहिनीमाजि आनंद माजे
जनांच्या मनाकारणें धीर केला । कृपेचा कृपासागरा पूर आला ।
कृपादृष्टिनें पाहिलें जानकीला । पुढें शीघ्र आलिंगिलें त्या सितेला।
ह्मणे दास हे श्लोक रामायणाचे । जरी अल्प सोपेचि नाना गुणांचे
कितीएक पाल्हाल टाकोनि मागें । कथा चालिली ते पुढें लागवेगें ।

---

## अकरावा प्रसंग.

प्रतापें दिनेशू तपाचा हुताशू । विरांमाजि ईशू सूरांचा सुरेशू ।
मुनींचा महेशू महादेवधीशू । सदांचा उदासू वनारण्यवासू ॥ १ ॥
पिनाकी शुळी बोलिजे रुद्रवाणी ।जटाभार पंचाननू शूळपाणी ।
हरू शैलजावल्लभू भक्तपाळू । धराधार मृत्युंजयो तो कृपाळू ॥ २ ॥
महादेव शंभू गिरीजाविलासी । सुवर्णाचळामाजि कैलासवासी ।
विराजे रुपें गौर कपूर जैसा । दिसे धाम ढौळा सदाशीव तैसा ॥
विषें कंठ काळा दिसे चंद्रमौळी । फणीधारकू वन्हि साजे कपाळीं ।
असंभाव्य भोळा गळां रुंडमाळा पहा मस्तकीं वोघ जाती खळाळा
वसे भस्म अंगीं प्रभू वीतरागी । उदासीन तो सर्व सामर्थ्य त्यागी
विधी शक्र हे सर्व ध्याती जयाला । महाहेव तो वंगितो राघवाला
ह्मणे धन्य रामा विरा पूर्णकामा । असंभाव्य सीमा कळेना महीमा।
महा थोर अद्भूत सामर्थ्य केलें । प्रतापेंचि ब्रह्मादिकां सोडवीलें ॥
प्रसन्नू तया रावणालागिं आह्मीं । विरंचीवरें मातला पापकर्मी ।
ऋषी देव माझे बहू कष्टवीले । समर्था तुवां सर्वही सोडवीले ॥ ७ ॥
अखंडीत घेतों तुझें नाम वाणी । पुजा अंतरामाजि कोदंडपाणी ।
बहू काळ होतें बहू आर्त पोटीं । प्रसंगेंचि ये जाहली थोर भेटी ॥
अकस्मात हा भेटिचा लाभ जाला।मनामाजि अद्भूत आनंद जाला
सुरांकारणें संकटीं पावलासी । मनोभावना राहिली तूजपाशीं ॥

---

१ वानरसैन्य. २ सूर्य. ३ अग्नि. ४ बुद्धिनायक.

भविष्योत्तरें बोलिलीं वाल्मिकानें।
पहातों चरित्रें तुझीं आवडीनें।
विषें पोळला प्राण माझा निवाला।
निदिध्यास तो लागला पार्वतीला ॥ १० ॥
समस्तां मनीं लागला ध्यास रामा।तुझें रूप ध्यातों सदा योगधामा।
बहूसाल हें बोलणें काय देवा। अखंडीत हा लोभ आतां असावा ॥
प्रती उत्तरें राम बोले महेशा।
उदाराधिशा सुंदरा देव धींशा।
समर्था प्रभू लोकपाळा नृपाळा।
लिळे जाळिशी पाळिशी या भुगोळा।
तुझा योग होतांचि आनंद जाला पुढें देखतां प्राण माझा निवाला
दयासागरा सर्व सांभाळ केला। सुखानंद हेलावला तृप्त जाला।
पुढें बोलता जाहला तो विरंची।ह्मणे आजि हे धन्य वेळा सुखाची।
तुझा योग होतां घडी अमृताची। बहू स्तुति केली रघूनायकाची।
किती बंधनें पावलों पूर्वपापें। बहू दीस ओसंडिलें मायबापें।
बहू कष्ट केलेसि देवाधिदेवा। कृपाळूपणें शीघ्र केला कुडावा ॥
तुह्मां वेगळे सर्वही दीन झाले। त्रिकूटाचळीं बंदिशाळे मिळाले।
दिनासारिखें जाहले दैन्यवाणे। प्रभू आमुचें दुःख तें कोण जाणे।
बहू कष्टवीलें तया रावणानें।
घडीनें घडी त्रासिलें दुर्जनानें।
गमे हानि येतां मनामाजि चिंता।
समस्तांस कोणी नसे सोडवीता।
बहु वोखटी वेळ येऊन गेली। कृपासागरा धावणी शीघ्र केली।
सुतालागिं झेंपावला व्याघ्र तैसा। जगज्जनका तूं समस्तांस तैसा
स्तुती उत्तरें बाळकू काय जाणे। बरें वोखटें सर्व काहींच नेणे।

---

१ बुद्धीचा नियामक. २ सोडिलें. ३ सांभाळ. ४ वाईट.

मुलें खेळतां मायबापांस चिंता। तयाचेपरी बोलताहे विधाता ॥
बहू स्तूति केली तया ब्रह्मयानें। कृपाळूपणें वारिलें राघवानें।
प्रसंगें विधीचें समाधान केलें। मनीं दुःख मागील तें सर्व गेलें॥
पुढें बोलता जाहला वज्रपाणी। सदा सर्वदा गाइजे जो पुराणीं।
तया सूकृताचा बरा काळ आला। प्रभू रामचंद्रा तुझा योग झाला
बहूतापरी राघवा ऐकलासी। पुरी पूरली लोचनांची असोसी।
पुढें पाहतां देखतां रूप तूझें। जगन्नायका धन्य हें भाग्य माझें॥
उणे कोटि कंदर्प हें रूप साजे। सदा सर्वदा योगिध्यानीं विराजे।
मुनी शोधिती भक्त कोट्यानुकोटी बहू साधनेंही नव्हे शीघ्र भेटी
कितीएक योगी उदासीन जाले। गिरीकंदरीं तूज शोधीत गेले।
तयां अंतरीं भेटसी अल्प कांहीं। जनीं आमुच्या सूकृता पार नाहीं
ह्मणे इंद्र तो स्वामि देवाधिदेवा। जनीं सेवका आपुलासा ह्मणावा।
घडेना मला भक्तिभावार्थ नाहीं। प्रभू सांगिजे जी मुखें कार्य कांहीं
ह्मणे राम गा वज्रपाणी प्रसंगें। रथू मातली धाडिला लागवेगें।
तुवां कार्य तें सर्व पूर्वींच केलें। रथारूढ होऊनियां यश आलें२६॥
पुन्हा मागुतें एक आतां करावें। निमाले कपी ऋक्ष त्यां उठवावें।
सुधामेघ पाडूनियां लागवेगीं। महावीर ते ऊठवीं ये प्रसंगीं ॥२७
मुखें बोलता जाहला चक्रपाणी। तयें थोर संतोषला वज्रपाणी।
प्रसंगीं तये थोर आनंद जाला। नमस्कार केला रघूनायकाला ५८
जळेशास[3] आज्ञापिलें तेंचि काळीं। महा मेघ ते चालिले अंतराळीं।
असंभाव्य ते जाहली मेघवृष्टी। तिणें भीजली सर्व ते प्रेतसृष्टी॥२९
कपी रीस ते सर्व आले निमाले। नमस्कारिला राम सैन्यीं मिळाले।
कळेना कळा कोण या राघवाची। मनीं कल्पितां हांव पूरे मनाची॥
निमाले कपी पावले दिव्य देहा। मिळाला रिसां वानरांचा समूहो॥
सुवेळाचळामाजि ते भार आले।क्षमारूप तैसेचि सर्वे मिळाले॥३१॥

१ इन्द्र. २ इच्छा. ३ वरुणाज्ञा.

मिळाले बहू देव कोट्यानुकोटी। असंभाव्य दोहीं दळांमाजि दाटी।
मुखें बोलती देव त्या राघवाला। स्तुती उत्तरीं तोषवीती दयाळा॥
प्रसंगेंचि आज्ञा समस्तांस द्यावी। पुन्हा मागुती सर्व चिंता असावी।
तुह्मीं हो अयोध्यापुरीमाजि जावें। विलासें बहू राज्य सूखें करावें।
प्रतीउत्तरीं राम बोले समस्तां। ह्मणे हो बरें जाइजे शीघ्र आतां।
समस्तीं तुह्मीं भूवनामाजि जावें। विलासें बहू राज्य सूखें करावें।
मुखें बोलतां राम ते देव तोषें। करीं पीटिती टाळिका नामघोषें॥
नमस्कार केला रघूनायकाला। समस्तां मनीं थोर आनंद जाला॥
रवीपावकें कालनैर्ऋत्यनाथें। जळाढ्यें धनाढ्यें रघूनायकातें॥
गुरू अंगिरा देव गंधर्व तेही। बहू बोलते जाहले सर्व कांहीं॥३९॥
ऋषी देव गंधर्व सर्वे मिळाले। स्तुतीउत्तरें बोलते शीघ्र जाले॥
समस्तांसि सन्मानिलें राघवानें। गुणां किन्नरादीक गाती पुराणें॥

निरोपेंचि त्या चालिल्या देवकोडी।
पुढें शीघ्र बीभीषणू हात जोडी।
समर्था मला थोर आतां करावें।
घडी एक लंकापुरीमाजि जावें॥ ३८॥

धरावें मनामाजि देवाधिदेवें। जनीं सेवकालागिं कांहीं घडावें॥
करावें समर्थें जिणें श्लाघ्य माझें। घडावें महद्भाग्य हें दास्य तूझें॥
प्रतीउत्तरीं राम बोले तयासी। ह्मणे धन्य बीभीषणा गूणराशी॥
प्रसंगें सखा बंधु तूं जोडलासी। पुरेना तुझे संगतीची असोसी४०

प्रितीच्या सुखालागिं कैसें वदावें।
गुणाच्या गुणाला किती आठवावें।
बहूसाल तूं राखिला स्नेहवादू।
जनामाजि तूं धन्य साधू अगाधू॥ ४१॥
स्नेहाळा तुवा आजि ऐसें करावें।

१ यमवरुणांनीं. २ इच्छा.

पुरीमाजि त्वां सुग्रिवालागिं न्यावें।
विलासें बहूतांपरी सूख द्यावें।
कपी ऋक्ष घेऊनि वेगें उठावें ॥ ४२ ॥
सखा सुग्रिवासारिखा कोण आहे। मनामाजि बीभीषणा तूंच पा
जिवेंशीं सखा आमुचा साह्य जाला।असंभाव्य हा वीरमेळा मिळा
जनीं मैत्रिकी राखिली सुग्रिवानें। बहूसाल हा कष्टला जीवप्राणें
स्वयें देखिलें सांगणें काय तुह्मां। कपी पूजितां पावलें सर्व आह्म
पुढें शीघ्र बीभीषणें तेचि काळीं। अती आदरें ठेविलें वाक्य भाळीं
करीं घेतलें प्रीतिनें सुग्रिवाला।ह्मणे आजिचा काळ हा धन्य जाल
समर्था गुणें तूं सखा जोडलासी। तुझा योग हा पार नाहीं सुखासि
कपी ऋक्ष घेऊनि तैसा निघाला। पुढें शीघ्र लंकापुरीमाजि गेला।
जळें निर्मळें सर्व अभ्यंग केले। अळंकार चीरें कपी तोषवीले।
बहूतांपरीचीं सुगंधें फुलेलें। समस्तांसि नाना रसें तृप्त केलें ॥४७॥
रिसां वानरांला पुजा सांग जाली। बहूसाल बीभीषणें स्तूति केली
महावीर विश्रांति पावून तेथें। निघाले पुढें सर्वही राम जेथें॥४८॥
सुगंधी बहू घातल्या पुष्पमाळा। अनीळें सुखें वास नेला भुगोळा।
प्रभूला नमस्कार साष्टांग केले। मिळाले कपी ऋक्ष सूखें निवाले।
सभेमाजि आली बहूसाल शोभा। पुढें राहिला हात जोडोनि ऊभा।
प्रसंगीं तये राम बीभीषणाला। सुधाउत्तरीं बोलता शीघ्र जाला।
ह्मणे गा विरा त्वां पुरीमाजि जावें।ध्रुवाचे परी राज्य तेथें करावें॥
शशी सूर्य तारागणें अंतराळीं। असावें सुखें भोगिजे सर्व काळीं ॥
पुढें बोलिजे शीघ्र नैर्ऋत्यनाथें। ह्मणे वासना पूरवावी समर्थें।
प्रभू बोलतां चित्त माझें न राहे। पहावी अयोध्यापुरी वासना हे।
पुरीमाजि भद्रासनीं तूं नृपाळा। महोत्साह उत्साह पाहेन डोळां।
उदारा प्रभू सौख्य पाहेन संगें निरोपेंचि मीं शीघ्र येईन मागें ॥५३

१ आस्वल. २ बिभीषणानें.

सर्वें घेतलें वीर बीभीषणाला। रघूराज तो वानरेंशीं निघाला।
असंभाव्य तो वाद्यकल्लोळ जाला। पुढें सिद्ध केलें महापुष्पकाला।
नसे तूळणा रत्नमंडीत याना। महीतुल्य त्या आणवीलें विमाना।
तयारूढ तो जाहला राम वेगीं। कपी वीर ते आपुलाल्या विभागीं
विमानावरी रामराजा विराजे। वरी बैसले ते कपी रीस राजे॥
सुमित्रासुतू बैसला सव्यभागीं। जगन्मात सीता तया वामभागीं॥
विमानावरी वाजती घंटमाळा। खडे घोप हेलावती मुक्तमाळा॥
समुद्रोदकीं पूर्ण ताळूच जैसें। नभामाजि तें चालिलें भव्य तैसें॥
पुढें चालतां चालतां लागवेगीं। सितेलागिं ते राम सांगे प्रसंगीं॥
रणामंडळीं आटे राक्षेसकूळा। त्रिकूटाचळू दाखवीली सुवेळा॥
असंभाव्य पाळीं णिला सेतु जेथें। स्वयें वास दर्भासनीं योग तेथें॥
स्त्रिया रत्नमंडीत नानाविलासीं। समुद्रातिरीं भेटला तोयराशी॥
बळें आगळा वीर वाळी निमाला॥ दिलें राज्य तेथें कपी सुग्रिवाला
अकस्मात जाली हनूमंतभेटी। तटाकें नद्या दाखवी वीरजेठी॥
जटायू पुढें पावला स्वर्गलोकीं। जनस्थान हें रम्य गोदातटाकीं॥
पुढें चालतां राम राजाधिराजें। तया राहवीलें ऋपी भारद्वाजें॥
कपींचीं दळें भूतळीं दाटि जाली। भारद्वाजयानें बहु स्तूति केली॥
पुढें धाडिलें मारुतीलागिं देवें। ह्मणे गा विरा भ्रातया भेटवावें॥
प्रभू बोलतां वीर तैसा निघाला। तया गूहकानें नमस्कार केला॥
स्तती बोलतां तो समाचार सांगे। नंदीग्राम तो पावला लागवेगें॥
कपी देखिला भव्य रामानुजानें। नमस्कार केला तया बांधवानें॥
कपी भेटला बैसला स्वस्थ जाला। समाचार साकल्य सांगे तयाला
ह्मणे मारुती बांधवाच्या वियोगें। पळें भासती तीं किती काळयूगें॥
महद्भाग्य आलासि येणें प्रसंगीं। रघूनाथ तो भेटवीं लागवेगीं॥
उदासीन तो बंधु त्या राघवाचा। वदे मारुतीलागिं कारुण्यवाचा

१ पुष्पकविमानाला. २ नाश. ३ रचिला. ४ भरताला.

बहू कष्टलों काळ गेला दुखाचा। कधीं राम भेटेल सिंधू सुखाचा॥
वृथा संपदा राज्य हें काय कीजे। उदासीन या राघवाला नमीजे॥
पदें भोगिजे तें मदें बाधिजेतें। दिसेंदीस आयुष्य हें व्यर्थ जातें॥
कितीएक ते भाग्य भोगून गेले। पुन्हा मागुती मृत्युपंथें निमाले॥
कितीएक साधू उदासीन जाले। महीमंडळीं लोक सूखें निवाले॥
भले जाणती संपदा दुःखदाती। स्वहीतापरा त्रास होतो नियंती॥
हरादीक ते तापसी याच लागीं। सदासर्वदा फीरती वीतरागी॥
ह्मणोनी मला राघवेंवीण कांहीं। सदा सर्वदा वैभवें चाड नाहीं॥
मला भेटवीं राम आत्मा जगाचा। वदे मारुतीलागिं तो दीन वाचा॥
ह्मणे मारुती धन्य गा धन्य साधू। महाशक्ति वीरक्ति बोधें अगाधू।
नव्हे साधनें भेटि ब्रह्मादिकांला। तुह्मांलागिं भेटीस तो राम आला
नमस्कार केला तया मारुतीनें। रजें डौरलें भाळ माहा विरानें॥
प्रिती लागली अंतरीं ते ढळेना। ह्मणे धन्य गा धन्य लीळा कळेना
तया देखतां चित्त सूखें निवालें। मनामाजि तें थोर आश्चर्य केलें॥
ह्मणे वीर अद्भुत वैराग्य कैसें। महाभाग्य हें मानिलें तृण जैसें॥
पुढें वीर रामानुजें काय केलें। पुरीमाजि शत्रूघना पाठवीलें॥
समस्तां वसिष्ठादिकां जाणवीलें। असंभाव्य तें सैन्य पालागवीलें
ह्मणे वीर तो राम येईल आतां। सुखी जाहली मुख्य माता समस्ता
प्रसंगें तये थोर आनंद जाला। पुरीमाजि तो लोक सर्वै मिळाला
पुढें शीघ्र पालाणिले दिव्य घोडे। महीमंडळीं त्यांस नाहींत जोडे।
असंभाव्य तीं हींसती दिव्य घोडीं। उफाळें तयां धांवतां भूमिथोडी।
मुठाळी झुली पाखरा मुक्तमाळा। बहू रत्नमंडीत भासे उफाळा॥
अळंकार भांगार मंडीत केले। बहूभार शृंगारिले सिद्ध जाले॥
गिरीसारिखीं चंड बाडें अपारें। बहू मातलीं कुंजरें थोरथोरें॥
पताका झुली रम्य दिव्यांबरांच्या। बहू रंग लावण्य नानापरींच्या

---

१ अधिकारांत. २ विरक्त. ३ शोभलें. ४ सज्ज केलें. ५ अळंकार.

महामस्त ते हस्ति भारें निघाले। त्वरें चालतां भव्य सर्वांग डोले ॥
भुमी हाणितां अंदु वाजे खणाणा। बळें वाजती चंड घंटा घणाणा
हयारूढ ते वीर कितीक जाले। धडाडीत सेना असंभाव्य चाले ॥
शिबीका बहूसाल सूखासनातें। पताका निशाणें फडाडीत वातें ॥
महावीर शत्रूघ्नू लागवेगीं। सुमंतु प्रधानू तया पृष्ठभागीं ॥
बहूवाद्य तो घोष गेला दिगंता। ऋषीराज वासिष्ठ त्या मुख्य माता
पदीं चालिला मुख्य तो योगिबंधू। सवें घेतला मारुती वीर्यसिंधू ॥
महा वीर दोघे पुढें शीघ्र आले। असंभाव्य ते भार मागें उदेले ॥
पुढें राम तेथूनि वेगीं निघाला। महापुष्पकारूढ होऊनि आला ॥
त्वरें पावतां पावतां नंदिग्रामा। कपी वीर तो दाखवी शीघ्र व्योमा
असंभाव्य तें तेज हेलावताहे। ह्मणे गा कपी काय हें येत आहे
तया सांग तो मारुती राम आला। नभामाजि तो पुष्पकारूढ जाला
पुढें रामभ्राता नमस्कार घाली। सुखाची असंभाव्य ते वेळ आली।
तया देखतां सौख्य अद्भुत जालें। वरी पाहतां यान सन्नीध आलें ॥
पुढें देखिला भव्य तो रामयोगी। असंभाव्य सेना तया पृष्ठभागीं ॥
त्वरें चालतां धांवतो रामभ्राता। नव्हे धीर त्या भेटिचा काळ येतां
बहू रम्य लावण्य कामावतारी। महावीर दोघे रुपें योगधारी ॥
बयां देखतां राम अंगीं थरारी। मुखें पाहतां सर्व सेना थरारी ८७॥
रुपें सारिखे वीर दोघे मिळाले। सुखाचे बहू कंप रोमांच आले।
पदीं ठेविला मस्तकू बांधवानें। तया ऊठवीलें त्वरें राघवानें ॥८८
स्फुरद्रूप आलिंगनीं वीर गात्रीं। जळें लोटलीं रम्य राजीवनेत्रीं।
तयां राम रामानुजां भेटि जाली। प्रसंगीं तये सृष्टि सूखें निवाली ॥
सुमित्रासुता भेटला वीतरागी। नमस्कारिली जानकी ते प्रसंगीं॥
खुणा दावितां रामराजाधिराजें। कपीनाथ आलिंगिला योगिराजें
पुढें भेटिचा लाभ नैर्ऋत्यनाथा। पदीं ठेविला शीघ्र येऊनि माथा ॥

१ सांखळया. २ आकाशाला. ३ हालताहे. ४ निरिच्छ.

तयालागिं रामानुजें ऊठवीलें। समस्तां विरां राघवें भेटवीलें ॥९१
प्रिती भेटला अंगदा जांबवंतां। प्रसंगें कपी थोर थोरां समस्तां।
स्तुती उत्तरीं बोलती एकमेकां।स्नेहें लागला सौख्य जालें अनेकां

प्रितीनें तया गूहका भक्तराजा
कृपाळूपणें भेटला रामराजा।
नमस्कार केला समस्तां विरांला।
तया अंतरीं थोर आनंद जाला ॥ ९३ ॥

पुढें सर्वही पुष्पकारूढ जाले। दळेंशीं महा वीर तैसे निघाले।
अयोध्यापुरीं देखतां सौख्य जालें। प्रसंगें रघूनायकें दाखवीलें॥
रुद्राच्या मनासारिखें वर्तताहे। महीमंडळीं यान येऊनि राहे।
भुमी ऊतरे रामबंधू सितेसीं। कपीनाथ सुग्रीव बीभीषणेंशीं९५॥

कपी रीस ते भार कोट्यानुकोटी।
दिसेना भुमी जाहली थोर दाटी।
समर्थें विमानासि त्या पाठवीलें।
कुबेरासि भेटावया शीघ्र गेलें ॥ ९६ ॥
असंभाव्य तो वाद्यकल्लोळ जाला।
कपी पाहतां[1] भार अद्भूत आला।
रजें व्योम आच्छादिलें सर्व कांहीं।
विरां कुंजरां घोडियां मीति नाहीं ॥९७॥

कपी सर्व चाकाटले[2] पाहताती। गिरीच्या परी भार अद्भूत येती।
कपीभार ते देखिले राजभारें। पहाया दळें लोटलीं तीं अपारें ९८
खुणा दाविती एकमेकांस तेथें। मुखें बोलती राहिला राम येथें।
महावीर ते मुख्य धांवोनि गेले।कपीभार त्यांमाजि वेगीं मिळाले
रघूनायकालागिं शत्रूघनानें। नमस्कार केला तया मंत्रियानें।
उभा वर्ग ते भेटले राघवाला। तयां मानसीं थोर आनंद जाला १००

१ वर बसलेल्या लोकांच्या. २ आश्चर्य पावले.

सुमित्रासुता आणि त्या जानकीला।
महा वीर तींहीं नमस्कार केला।
प्रसंगीं समस्तां सिते भेटि जाली।
सुखाची नदी अंतरामाजि आली॥ १०१॥

सुमंतू समर्था ह्मणे पैल पाहें। ऋषी जननी मंडळी येत आहे।
तयें सांगतां राम तो सिद्ध झाला। पदीं चालतां तो पुढें शीघ्र गेला
पुढें देखिला तो ऋषी ब्रह्मनिष्ठ। कुळा रक्षिता तो कुळामाजि श्रेष्ठ।
रघूनाथ तेथें नमस्कार घाली। स्तुतीउत्तरें आदरें भेटि जाली॥
प्रसंगें नमस्कारिली मुख्य माता।बहू सौख्य जालें तयां भेटि होतां
समस्तां जणींला नमस्कार केला।तया देखतां प्राण त्यांचे निवाले
समस्तांस तो भेटला राम जैसा। यथासांग तो वीर सौमित्र तैसा।
नमस्कार घाली बहू स्तुति केली। तया देखतां मंडळी ते निवाली।
सितासुंदरीनें नमस्कार केले। असंभाव्य ते लोक तेथें मिळाले।
स्तुती उत्तरें एकमेकांस जालीं। प्रसंगें तयें अंतरें तीं निवालीं॥

समस्तां समस्तां जणां भेटि जाली।
पहाया सुखें लोकमांदी मिळाली।
पुरीमाजि तो थोर आनंद जाला।
मुखें बोलती हो सुखें राम आला॥ १०७॥

सुखें पाहतां मुख्य माता मिळाल्या।
सवें सुंदरा त्या असंभाव्य आल्या।
वधूंची बहू दाटणी थोर जाली।
सिता सुंदरी शीघ्र तेथें मिळाली॥ १०८॥

नमस्कारिली नम्र होऊनि श्रेष्ठां। प्रसंगेंचि भेटी वरिष्ठां वरिष्ठां।
घडाडां नभीं वाजती चंड भेरी। बहू वारितां जाहली दाटि थोरी।
महावैभवाची कथा राघवाची।जनी सौख्यदातीच ब्रह्मादिकांची
पुढें रामउपासकें रामदासें। पुरी वर्णिली रम्य नाना विलासें॥

## बारावा प्रसंग

पुढें चालिली ते असंभाव्य सेना। रजें मातलें व्योम पुढें दिसेना।
कितीएक ते भार सन्मूख आले। समर्थास तींहीं नमस्कार केले ॥१
दळें राहिलीं दूर वेष्टीत पाळा। कपीचक्र एकीकडे चंड मेळा।
तया मध्यभागीं ऋषी बंधु माता।महा वीर ते मुख्य चत्वारि कांता
उभा राहिला राम तो राजभारें। गृहें निर्मिलीं अंबरांचीं अपारें।
सभामंडपीं धर्मशाळा विशाळा। गृहें रम्य अंतरगृहें चित्रशाळा ३

बहूसाल दिव्यांबरें थोरथोरें।
सुचित्रें विचित्रें अमूल्यें अपारें।
कितीएक त्या लाविल्या स्तंभबोळी।
प्रभा रत्नमंडीततेजें झळाळी ॥ ४ ॥

बहू रत्नमाळा बहू मुक्तमाळा। बहू लागले घोंस नक्षत्रमाळा।
कितीएक जाळीवरी अंतराळीं। कितीएक मुक्तें निराळीं निराळीं

सुढाळा[1] किळा[2] मंडपीं ढाळ[3] देती।
विशाळा शिळामाजि त्या दिव्य ज्योती।
सुवर्णासनें दिव्य नानापरीचीं।
कितीएक सिंहासनें कूसरीचीं ॥ ६ ॥

बहू ते फुलारे बहूतां परीचे। वरी घोंस हेलावती माणिकांचे।
निळे पाच गोमेद इत्यादिकांचे। बहू रंग नानापरी कांचनाचे ॥ ८
नभामाजि त्या दिव्य नक्षत्रमाळा।तयाचे परी शोभती मुक्त माळा।
विराजे तया मंडपा मध्यभागीं। ऋषी राम माता सखे बंधुवर्गीं ॥

असंभाव्य ते संपदा वैभवाची।
मुखें सर्व बोलावया शक्ति कैंची।
वरी पाहतां उंच आकाश एथें।

---

१ अतितेजस्वी. २ कांति. ३ प्रकाश.

असंभाव्य तें भव्य लावण्य तेथें ॥ ९
समूदाय तो बैसला स्वस्थ जाला। वधूमेळ अंतर्गृहामाजि गेला।
ऋषी राम माता सखे बंधुवर्गीं। स्नेहें उत्तरें बोलिजे ते प्रसंगीं ॥१०
कितीएक तो काळ गेला वियोगें। असंभाव्य तें सौख्य संयोगयोगें
सरेना मुखें बोलतां मोह माया। निवाली मुखें पाहतां सर्व काया ॥
कपीनाथ बिभिषिणाला भुपाळें। रहाया गृहें दीधलीं तीं विशाळें।
तयांमाजि ते सर्वही स्वस्थ जाले। समर्थें बहू सोहळे दाखवीले १२
पुढें मंगलस्नान तेणेंचि काळें। बहूसाल ते चालिले एक वेळे।
किती एक ते हाटकाचे[1] तटाकीं[2]। जळें ठेविलीं सेवकें ग्रामलोकीं ॥
असंभाव्य तीं सिद्ध केलीं फुलेलें। बहूतांपरींचीं सुगंधेल तेलें।
किती चौकिया चौक गंगाळपात्रें। विशाळें पवित्रें सुचित्रें विचित्रें
सुगंधें रसें चोखण्यां[3] कालवील्या। यथासांग सामग्रिया सिद्ध केल्या
बहू आर्त पोटीं उभा भर्त बंधू। करी प्रार्थना राम कारुण्यसिंधू १५
प्रभू बोलता जाहला शीघ्र काळें। किजे मंगलस्नान या लोकपाळें।
अयोध्यापुरीमाजि त्या सर्व लोकां। विरें सर्व संकेत केला अनेकां॥
समस्तांसि तत्काळ अभ्यंग जालें। महा लोक ते सर्व सूखें निवाले।
कितीएक सामग्रिया सिद्ध केल्या। कपीनाथ बीभीषणा पाठवील्या
पुन्हा राम बोले वरिष्ठां वरिष्ठां। किजे मंगलस्नान हो सर्व श्रेष्ठां।
पुढें जननीलागिं देवाधिदेवें। ह्मणे मंगळस्नान तुह्मीं करावें ॥ १८॥
समस्तीं यथासांग अभ्यंग केले। पुन्हा देव तो भ्रातयालागिं बोले
सखे बोलती स्वामि देवाधिदेवा। तुह्मी सांग अभ्यंग आधीं करावा।
बहूतांपरी प्रार्थिलें बांधवासी। कितीएक ते सिद्ध जाले विलासी।
उभी मंडळी कूशळां नापितांची। तिहीं मांडिली सांग सेवा प्रभूची
समश्रू[4] क्रमें जाहली त्या प्रसंगीं। नखें काढिलीं नीळरंगी तरंगीं।
जटाजूट ते मोकळे केश केले। स्नेहें[5] घाळितां दिव्य चक्षू निवाले २

---

९    १ सुवर्णाचे. २ तळ्यांत. ३ उत्या. ४ श्मश्रु. ५ तेल.

पुढें दर्पणीं पाहिलें रूप रामें। प्रसंगीं तये कोटिकंदर्पधामें ।
कळा बाणली भव्य लावण्य गात्रीं। असंभाव्य सौंदर्य राजीवनेत्रीं
जळें पादप्रक्षालना सिद्ध जालीं। पदीं लागतां स्वर्गगंगा निवाली
पदांगुष्ठ भागीरथीओघ आला।जनें मज्जनें लोक निर्दोष केला २३
पुढें तीर्थ वंदूनि बंधूजनानें। निवाले पवित्रोदकें तीर्थपानें ।
बहू लाविलें लोचना आवडीनें।मनीं मानिलें सौख्य या बांधवानें
बहूसाल आयुष्य हो कल्पकोडी। घडावी सदा सर्वदा भक्तिजोडी।
सुगंधें फुलेलें चवाबीत माथां। महा मस्तकीं मर्दिती लोकनाथा २५
बहू मर्दना सांग नाना परीची। लिळे काढिली ते मळी निर्मळाची ।
जळें निर्मळें घालिती उष्ण धारा।मुखें बोलती तोय आणीक सारा
शिरीं घालिती तोय नेटें घळाळां।नद्या वाहती उष्ण बोधें खळाळां
सुगंधेंचि दोहीं तिरीं पंक जाला। असंभाव्य तो भृंग तेथें मिळाला।
यथासांग अभ्यंग केले भुपाळें। पुढें रम्य दिव्यांबरें शीघ्र काळें ।
महा तेज पुंजाळ तें लागवेगीं। चिरें वल्कलें त्यागिलीं ते प्रसंगीं ॥२
प्रसंगीं तये रत्नमंडीत मानें। पुढें पादुका ठेविल्या बांधवानें।
वसिष्ठासि रामें नमस्कार केला। महा वीर तो बैसला स्वस्थ जाला॥
बहू कस्तुरी केशरें तेचि काळीं। ऋषी राम वीलेपवी गंध भाळीं।
बहू भूषणें रत्नमंडीत रामें। अमूल्यें सुखें घेतलीं पूर्णकामें॥ ३० ॥
उटी घेतली घातल्या पुष्पमाळा। बहूतांपरीच्या बहू रत्नमाळा ।
महामस्तकीं हेम मुकूट साजे। असंभाव्य तो तेजकल्लोळ माजे ॥३१
वरी कीरटी कुंडलें वैजयंती। अलंकार नानापरी ढाळ देती ।
चिरें सुंदरें घातला भव्य घाटा। कटीं किंकिणी नागरा क्षुद्रघंटा ॥
वरी कंकणें मुद्रिका चापपाणी। ब्रिदें घातलीं अंदु वांकी झणाणी।
महीमंडळीं सर्वही एक जालें। रघूनायका भव्य लावण्य आलें ३३
पहातां नसे तळणा ही तुळाया। विराजे बहू भूषणें दिव्य काया।

१ तेज. २ चकाकी. ३ घागऱ्या.

ऋषीराजबंधू सखे आणि माता। सुखें पाहती राम हा सौख्यदाता।
प्रितीनें सुखें बोलता राम जाला। ह्मणे स्नान कीजे तया बांधवाला।
स्नेहें उत्तरें बोलतां शीघ्र तैसें। किजे मंगलस्नान नाना विलासें ॥
जटाजूट ते मोकळे सर्व केले। मळें त्यागिले भव्य सुस्नात जाले।
सुगंधें उटी घेतली पुष्पमाळा। अलंकार दिव्यांबरें रत्नमाळा ३६
प्रसंगें समस्तांसि अभ्यंग जाले। सभोंते सखे आप्त सर्वै मिळाले।
अळंकार दिव्यांबरें दिव्य माता। सुखें राघवा पाहती त्या समस्ता
फळें खाद्य नैवेद्य नानापरीचे। फळाहार ते आणिले कूसरीचे।
बहूतांपरीचे बहू उंच मेवे। ह्मणे राम सर्वांस ते पाठवावे ॥ ३८ ॥

समस्तांसि ऊदंड ते पाठवीले।
फळें सेवितां लोक संतुष्ट जाले।
स्वइच्छा स्वयें सेविलें अल्प कांहीं।
जनीं सेवितां तूळणा त्यासि नाहीं ॥ ३९ ॥

जळें निर्मळें आच्मनें शुद्ध केलीं। समस्तांसि पानें बहू पाठवीलीं।
विडे घेतले सर्वही स्वस्थ जाले। असंभाव्य ते पाकही सिद्ध जाले।
पुढें मंडळी सेवकांची मिळाली। विशाळें स्थळें सर्वही सिद्ध केलीं।
बहू चित्रशाळा बहू होमशाळा। सडे शिंपिले घातल्या रंगमाळा।
बहू रत्नमंडीत मोठीं अचाटें। दुकांठीं बहू मांडिलीं दिव्य ताटें॥
कितीएक तीं बत्तिसा वाटियांचीं कितीएक विस्तीर्ण नानापरीचीं
असंभाव्य तीं रम्य चित्रें विचित्रें। बहूतांपरीचीं बहू तोयपात्रें।
बहू आसनें दिव्य नानापरीचीं असंभाव्य तीं घातलीं कूसरीचीं ॥
बहूवर्ण दिव्यांबरें[1] पट्टकूळें[2]। बहूरंग नानापरीचीं दुकूळें ॥
असंभाव्य तीं सोंवळीं सिद्ध केलीं कितीएक दिव्यांबरें आणवीलीं
पुढें भोजना सर्वही सिद्ध जाले। कितीएक ते लक्षकोटी मिळाले ॥
मिळाली ऋषीमंडळी ब्राह्मणांची। बहू भव्य मार्तंड जैसे विरंची[3]।

---

१ जरीकाठी पीतांबर. २ रेशमीवस्त्रें. ३ ब्रह्मा.

वयें धाकुटे थोर कोटयानुकोटी। स्थळें रुंधिलीं जाहली थोर दाटी
बहूसाल संतोषले थोर तोषें। असंभाव्य ते गर्जती नामघोषें ॥४६॥
बहूसाल गंधाक्षता पुष्पमाळा। बरीं धोत्रपात्रें दिल्या रत्नमाळा ॥
चिरें सुंदरें रम्य यज्ञोपवीतें। धनें चंदनें दीधलीं ब्राह्मणांतें ४७
पुढें वाढिते जाहले शीघ्र काळीं। बहू दाटल्या त्या असंभाव्य वोळी।
महामंडपीं बैसला रामराजा। ऋषी मुख्य बंधू सखे आप्त वोजा ॥
पुढें रत्नझाऱ्या बहू साल चंबू। सुवासी तयांमाजि संपूर्ण अंबू ॥
स्थळें सर्वही सिद्ध पूर्वीच केलीं। असंभाव्य अन्नें बहू आणवीलीं ॥
कपीनाथ सुग्रीव बीभीषणाला। बहू घाडिलीं दिव्य अन्नें तयांला।
रसें पूर्ण त्या कावडी लक्ष कोटी। पथामाजि नेतां असंभाव्य दाटी।
तुपें वाढिते जाहले पात्रधारीं। असंभाव्य ते चालिले एकहारी ॥
रुची रायतीं लोणचीं रम्यवोळी बहु स्वाद शाखावळी शीघ्र काळीं
बहू वाढिला ओदनू तो सुवासें। वरान्नें क्षिरी शर्करा पंच भक्षें ॥
कितीएक आणीक नानापरीचीं बहू वाढिलीं भिन्नभिन्नां रुचीचीं।
सुगंधें तुपें वाढिती ते खळाळां। पयें घालिती थोर नेटें घळाळां ॥
पुढें दिव्य नाना रसें पूर्ण पात्रें। सभा शोभली भव्य राजीवनेत्रें ॥
बहूसाल संतोष नाना सुवासें। ऋषीमंडळी गर्जती नामघोषें ॥
पुढें सर्व ओगारिती सावकाशें। सुखें जेविती सर्व नाना विलासें ॥
गिरीसारिखा ओदनू शुभ्र वर्णें। बहू भक्षिलीं भक्ष संपूर्ण पूर्णें ॥
कथा मागुती सांगती एकमेकां। असंभाव्य ते तृप्ति जाली अनेकां।
कढी वर्पिती आवडीनें फरारां। ऋषी जेविती ढेंकरीती डरारां ॥
पुरे हो पुरे अन्न ऊदंड झालें। बहू भोजनें कंठमर्याद आलें ॥ ५६ ॥
पुढें शीघ्र दध्योदनें लागवेगीं। पुन्हा वाढिते जाहले ते प्रसंगीं।
ऋषी राम बंधू सखे सर्व माता। मुखें बोलती सर्वही तृप्ति आतां ॥
सुवासें रुचीचीं असंभाव्य तक्रें। कदाही कधीं नेणिजे स्वाद शक्रें।

१ व्यापिलीं. २ सुन्दर. ३ उदक भात. ५ वरण. ६ वाढिती.

सुखें सेविती जेविती लोक इच्छा। यथासांग संपूर्ण जालें स्वइच्छा
यथासांग तीं भोजनें सर्व जालीं। खळाळें बरीं आचमनें शुद्ध केलीं
सुपारी विडे दीधले कर्पुराचे। बहू चूर्ण ते शुद्ध मुक्ताफळाचे ५९
सुवासी चतुर्भाग मागून घेती। सुखी जाहल्या सर्वही वेदमूर्ती॥
बहूसाल मंत्राक्षता मंत्रघोषें। मुखें बोलती सर्वही विप्र तोषें॥६०॥

कपी रीस ते सर्वही तृप्त जाले।
बहू भक्षिलें अन्न सूखें निवाले॥
गिरीसारिखीं राहिलीं सर्व अन्नें।
विडे घ्यावया धाडिलीं त्यांसि पानें॥ ६१॥

यथासांग सर्वस्व संतृप्ति जाली। सभामंडपीं मंडळी ते मिळाली।
पुढें ब्राह्मणीं मांडिली धर्मचर्चा। मुखें बोलती धन्य दीनू सुवाचा।
पुढें दीन तो चालिला अस्तमाना नमायासि आली असंभाव्य सेना
कितीएक तीं दीवट्यांचीं अचाटें सभामंडपीं चाललीं दाट थाटें।

प्रसंगीं तये वाद्यकल्लोळ जाला।
दुरस्ता बहू लोक सूखें मिळाला।
विराजे सभेमाजि तो रामराजा॥
पुढें चालिल्या त्या कळावंत फौजा॥ ६४॥

झणाणीत वीणे मनोरम्य नादें। दणाणीत मृदंग गंभीर शब्दें।
अलापें कळा दाविती रागमाळा। सुरें सुस्वरें माजली रंगवेळा॥
बहू ताळ कल्लोळ वाजे खणाणां। विणे वाजती तंतुनादें झणाणा।
बहू गीत संगीत ते कूसरीचीं। भले जाणती ते घडी अमृताची।
असंभाव्य तो नृत्यकल्लोळ जाला सुखें पाहतां शुद्धि नाहीं जनांला
गुणीं रातले मातले गायनानें। तदाकार ते वर्तित केली मनानें॥
अळंकार चीरें पुढें ढीग केले। कळावंत ते सर्व संतुष्ट जाले।
विसर्जी सभा तो पुढें रामराजा। निरोपेंचि गेल्या बहू लोकफौजा

---

१ समुदाय.

समस्तीं घडी एक विश्रांति केली ॥
अकस्मात प्राभात ते प्राप्त जाली ।
पुढें सारिते जाहले नित्य नेमें ।
महा वीर ते आपुलाल्या स्वधर्मे ॥ ६९ ॥

सभे बैसिजे स्वामि देवाधिदेवें । ह्मणे आजि वेगीं अयोध्येसि जावें
पुरी सर्व शृंगारमंडीत केली । असंभाव्य ते सर्व सेना निघाली ७०
महीमंडळीं मुख्य आर्धी पुराणीं । मुखें बोलिजे ते रवीवंशखाणी ।
अयोध्यापुरी धन्य ही पुण्यराशी । किती राहिले तापसी तीर्थवासी
मुनी संत योगी सदा वीतरागी । उदासीन साधू परांचे विभागी ।
ऋषीमंडळी सात्विकांसज्जनांची। महायोगि व्युत्पन्नविद्वज्जनांची
किती एक ते मंडळी प्रेमळांची । कितीएक ते ब्राह्मणां सुशिळांची
मनस्वी किती ते यती ब्रह्मचारी । बहूतांपरीचे बहू वेषधारी ॥
सदा सर्वदा योग ध्यानस्थ जाले । कितीएक ते काळ घेऊनि गेले।
भुयारें मठ्या त्या बहूतांपरीच्या।नदीचे तिरीं पूर्णशालामठाच्या।
प्रभू देव हा सर्व ब्रह्मादिकांचा । जया वर्णितां शीणल्या वेदवाचा
स्वयें वास जेथें जगन्नायकाचा। महीमा वदे कोण त्या हो स्थळाचा

कितीएक ते राहिले भक्त ज्ञानी ।
कृपाळू बहू मुख्य नामाभिधानी ।
बहू सुकृती[3] सूर्य जैसे तपाचे ।
सदा धर्मचर्चा अखंडीत वाचे ॥ ७१ ॥

नदीवाळिली भव्य ते पूर्णतोया।जनालागिंआधार आली उपाया
शिवाल्यें बहू बांधिलीं थोरथोरें । ध्वजा देउळें शीखरें तीं अपारें
तडागें जळें निर्मळें कूप बावी । सदा सर्वदा राहिजे मानुभावीं ।
स्थळें निर्मळें निर्मिलीं पावनानें । कितीएक कल्पतरूंचीं उद्यानें ॥
कितीएक त्या लागल्या वृक्षजाती।वनें वाटिका जीवनें पुष्पजाती

१ विरक्त. २ परब्रह्माचे. ३ पुण्यवान.

अयोध्यापुरी रम्य लावण्य नांवें। महा रम्य विस्तीर्ण तें वोस गांवें
गृहें बांधिलीं तीं असंभाव्य उंची। कितीएक तीं पंच सप्त खणांचीं
सजे चौक दामोदरें थोरथोरें। विशाळें विचित्रें गवाक्षें अपारें॥८०
विदी हाट बाजार चौवार कुंचे। असंभाव्य ते भव्य नानापरीचे।
कितीएक तीं सारखीं दीसताती। महा धूर्त तेही बळें भ्रांत होती।
गृहें गोपुरांचा बहू दाट खेटा। हुंडे माडिया ऊपरा त्या अचाटा।
महद्भाग्य श्रीमंत ते लोक तेथें। सदा सर्वदा दाटणी थोर पंथें।
पुरीमाजिचे लोक आरोग्य भारी। मुलें लेंकरें थोरले आणि नारी
करंटें तयांमाजि कोणींच नाहीं। नसे द्वेष ना मत्सर सर्व कांहीं॥
सदानंद उद्वेग नाहीं जनाला। नव्हे वृद्ध ना मृत्यु नाहीं तयांला।
कुरूपी महामूर्ख तेथें असेना। सुखाचें जिणें दैन्यवाणें दिसेना ८४
पुरीमाजि ते सर्वही लोक कैसे। सुवर्णाचळीं नांदती देव जैसे।
प्रतापी बळाचे सदा सत्य वाचे। पुरींमाजि लावण्य देहे जनांचे॥
बहू नीतिन्यायें विवेकें उपायें। कदाही तया बाधिजे ना अपायें।
बहूतां धनांचे उदारा मनांचे। विशेषा गुणांचे गुणी सज्जनांचे॥
पुरीमाजि त्या सर्व चातुर्य मोठें। कदाही मनीं नावडे त्यांसि खोटें
विलापें वसे राम आणीक विद्या। कळा सर्वधारणा सर्वसाध्या॥
अळंकार दिव्यांबरें सर्वलोकां। सदा प्रीतिनें बोलती एकमेकां।
महा वैभवाचे बहू सूकृतांचे। पुरीमाजि ते लोक नानागुणांचे ८८

पुरीमाजि ते दाटणी मंदिरांची।
रिकामी भुमी ते रहायासि कैंची।
तया मध्यभागीं असंभाव्य तेथें।
महा भूवनें उंच आकाशपंथें॥ ८९॥

गृहें गोपुरें निर्मिलीं कांचनाचीं। बहूसाल विश्रांतिदातीं मनाचीं।
महारत्नमंडीत तीं थोरथोरें। किती धाकटीं भव्य मोठीं अपारें॥

---

१ बुरूज. २ पुण्याईचे.

भुमी बांधल्या पाचबंदी विशाळा।
मनोरम्य त्या रेखिल्या दिव्य शाळा।
कितीएक द्वारें लघू थोर थोरें
स्थळें दिव्य तीं पाहतां सौख्यकारें॥ ९१॥
किती अन्नशाळा किती वस्त्रशाळा।
कितीएक विस्तीर्ण त्या होमशाळा।
किती नाट्यशाळा बहू रत्नशाळा।
कितीएक त्या धर्मशाळा विशाळा॥ ९२॥

गृहें रम्य अंतर्गृहें हाटकांचीं। बहू हांसल्या पूतळ्या नाटकांचीं।
भुयारें घरें वीवरें गुप्त द्वारें। स्थळें भव्य बैसावया थोरथोरें॥ ९३॥
सभामंडपीं ते असंभाव्य शोभा। बहू शोभतो हेमकल्लोळगाभा।
फुलारे बहू लाविले माणिकांचे। कितीएक ते घोंस मुक्ताफळांचे।

महीमंडळीं तेज पुंजाळ[२] आलें।
असंभाव्य तें सर्व लावण्य आलें।
विशाळा स्थळीं निर्मिल्या भव्य भिंती।
निळे पाच गोमेद ते ढाळ[३] देती॥ ९५॥
बहू रत्न पुंजाळले ज्वाळ जैसे।
असंभाव्य हारी उभे पुंज जैसे।
विशाळें स्थळें निर्मिलीं जाड कैशीं।
सुवर्णाचळींमाजि वीस्तीर्ण जैशीं॥ ९६॥
विचित्रा कळाकूसरी लेखनाच्या।
बहूरत्नमंडीत त्या कांचनाच्या॥
सभामंडपीं फांकल्या रत्नकीळा[४]।
दिसे रंग तेथें निराळा निराळा॥ ९७॥

कितीएक तीं फांकलीं दिव्य किर्णें। बहूतांपरींचीं बहू रंग वर्णें।

१ स्वर्णाचीं. २ पुंजके. ३ तेज. ४ रत्नकांति.

कितीएक हेलावती हेमपर्णें। कितीएक घंटावळी त्या सुवर्णें ९८
स्थळें शोभती रम्य बैसावयाचीं। बहूसाल तीं भिन्नभिन्नां परींची
कितीएक तीं रत्नमंडीत यानें। कितीएक सिंहासनें तीं विमानें।
बहू बैसका दिव्य रम्यांबरांच्या। विचित्रा बहूरंग नानापरींच्या।
वरी लोंबती घोंस मुक्ताफळांचे। कितीएक मुक्तावळी जाळियांचे।
कितीएक रत्नावळी रम्य कैशा। कितीएक मुक्तावळी शुक्र जैशा॥
प्रभेचे बहू घोंस हेलावताती। बहूतांपरींच्या बहू रत्नजाती १०१
स्थळें निर्मिलीं रम्य विस्तीर्ण नाना॥कितीएक बैसावया सर्व सेना
कितीएक विस्तीर्ण राजांगणें तें। भुमी पाचबंदी महा रम्य तेथें॥
हुडे कोठ माड्या सजे मोठमोठे। उभें राहिलें भव्य ब्रह्मांड वाटे।
असंभाव्य चर्या लघू पंथ हारी। नभा भासवी रूप नाना विकारी।

झरोके कितीएक त्या गुप्त वाटा।
किती ऊपऱ्या अंतराळीं अचाटा
कितीएक त्या भक्ति संख्यारसाच्या।
कितीएक त्या उंच तेरा खणांच्या॥ १०४॥

वरी रत्नकळसाचिया रम्य वोळी। रवीकीर्ण तैशा कळा अंतराळीं
वरी लागल्या सर्व नक्षत्रमाळा।मनीं भासती फांकती दिव्य कीळा

रवीवंशिचे स्वर्ग विख्यात राजे।
तयांच्या प्रतापें विधीगोळ गाजे
करी कोण संख्या तया वैभवाची।
उणी वर्णितां बुद्धि ब्रह्मादिकांची

किती कोण लेखा मला मानवाला। मतीमंद मी काय वर्णूं तयाला
ह्मणे दास त्या अल्पशा भक्तिभावें। प्रभू बोबड्या उत्तरीं तोषवावें



१ बुरूज. २ गणना.

## तेरावा प्रसंग.

पुरी वर्णिली हो यथासांग येथें। परी पाहतां दीसतें अल्प तेथें।
मनीं संशयो श्रोतयां प्राप्त जाला। प्रतीउत्तरें काय दील्हीं तयांला
अयोध्यापुरी स्वर्गलोकासि गेली। पुढें वोस होतांचि ते भग्न जाली
असेना जना राहणें वस्ति जेथें। खडे माणिकें कोण ठेवील तेथें॥
पुरें पट्टणें वोस होती कितेकें। पुढें पाहतां दीसती सर्व टेकें।
युगें लोटतांही वसे अल्प कांहीं। असंभाव्य हें तूं विचारूनि पाहीं॥

असो तूटला संशयो श्रोतयांचा।
पुढें राहिला वोघ जातां कथेचा।
अयोध्यापुरा चालिले वीर जेठीं।
निघाले स्वयें भार कोट्यानुकोटी॥ ४॥

ऋषी राम ते चालिले नीज भारें। दळें चालिलीं पृष्ठभागीं अपारें।
शिबीका पुढें चालती दिव्य हारी। सखे लोक बंधू मधें रावणारी
पुढें दाटले भार माहारथांचे। दळीं घोष जाले गजां घोडियांचे।
गिरीतुल्य सेना रिसांवानरांची। बहू दाटि राक्षेस लंकापतीची॥
पुरी पावतां रुंधल्या सर्व वाटा। असंभाव्य तो जाहला दाट खेटा॥
शतांचीं शतें धांवती वेत्रधारी। दळें माजलीं कोण कोणास वारी
कितीएक ग्रामस्थ मध्येंचि गेले। कितीएक ते चूकले भ्रांत जाले।
अयोध्यापुरीमाजि ऊभीं अचाटें। गृहें गोपुरें पाहती दाट थाटें॥

करीं रत्नताटें कितीएक हारी।
असंभाव्य त्या चालिल्या दिव्य नारी।
बहूसाल नीराजनें लक्ष कोटी।
पुरींतूनि येतां पुढें थोर दाटी॥ ९॥

रूपें राजसा सुंदरा त्या मितीनें। रघूनाथ ओंवाळिती आवडीनें।
मनामाजि ते लागलीसे अवस्था। सुखें पाहती एकपत्नीव्रतस्था॥

---

१ अडविल्या. २ आरत्या. ३ चिन्ता.

करीती बहू सुंदरा अक्षवाणें। कितीएक ओंवाळिती निंबलोणें।
असंभाव्य थांवे तया नायिकांचे। मुखें गर्जती भाट वेताळ वाचे॥
पताका निशाणें बहूरंग वर्णें। महातेजपुंजाळ मार्तंडपर्णें।
वरी दाटलीं तीं असंभाव्य छत्रें। भ्रमों लागलीं दिव्य छत्रें विचित्रें
पहा हो पहा पैल तो राम आला। असंभाव्य हा वीरमेळा मिळाला।
दिसेना पुढें पाहतां गर्द जाला। समस्तीं करें ताळिकाघोष केला॥
पुढें सर्वही भूवनामाजि गेले। महावीर ते बैसले स्वस्थ जाले।
पुरीमाजि आनंद सर्वांस जाला। उभे राहिले भाग्य हें राम आला॥
ऋषी सांगती हे बरी शुद्ध वेळा। त्वरें बैस भद्रासनीं तूं नृपाळा।
समस्तांसि आनंद राज्याभिषेकें। ऋषी अक्षता टाकिती मंत्रघोषें॥
विधीयुक्त भद्रासनीं रामराजा। यथायोग्य संपादिली सांग पूजा
कितीएक पुष्पांजळी वाहताती। सदानंद आनंद सूखें पहाती॥१६
असंभाव्य नानापरी दान केलें। बहूतांपरी याचकां तोषवीलें।
गिरीचेपरी शर्करादीग केले। कितेकीं समस्तांसि ते पाठवीले॥
नभीं दाटलीं मेघडंबें अपारें। कितीएक तीं चामरें थोरथोरें।
असंभाव्य हेलावती रत्नपुच्छें। बहू डोलती उन्मतें शक्रतुच्छें॥
सुचित्रें विचित्रें रवीतेजपत्रें। असंभाव्य तीं दाटलीं भव्य छत्रें।
विशाळा पताका सतेजें निशाणें। वरी सर्व आच्छादिलें व्योम तेणें
असंभाव्य ते दाटली भीमसेना। प्रसंगें विरीं घाव केला निशाणा।
महादिव्य सिंहासनीं रामराजा। पहाया भ्रमों लागल्या वीरफौजा।
बरी रामराजें गुढी ऊभवीली। गजेबे सुखें लोकपांदी मिळाली।
झडा घालिती राम पहावयाला। समस्तां मनीं थोर आनंद जाला।
पुरीमाजि तीं वैभवाचीं अचाटें। दुताळीं तिताळीं उभीं लोक-थाटें
खुणा दाविती सांगती एकमेकां। बहुवीध तो राम वेधी अनेकां॥
दमामे घुमामे ददाडां धडाडां। बहू वाजती चंड भेरी भडाडां।

१ समूह. २ मेघसमूह. ३ इन्द्राला तुच्छ करणारी.

तुतारे नगारे बहू शंख शृंगें। किती चौघडे ढोल कर्णे बुरंगें॥ २३

तुरें गंभिरें तीं बहू गर्जताती। कितीएक पांवे मुखीं घोष वाती।
नफेऱ्या बहू दुंदुभी घोष जाला। असंभाव्य तो वाद्यमेळा मिळाला

कितीएक ते चौघडे वाजताती। कितीएक ते बागडे नाचताती।
कितीएक ते मागुते मेळ आले। कितीएक ते वेषधारी मिळाले॥

कितीएक थोंवे कळावंत गाती।
हरीदास ते कीर्तनीं गर्जताती।
कितेकी गुणी नाचणी नृत्यरंगें।
अलापें कळा रागरंगें तरंगें॥ २६॥

कितीएक वाखाणिती भाट ब्रीदें। कितीएक ते छंद नाना विनोदें।
दिंडीगान तें मांडिलें वासुदेवीं। बहू कीनऱ्या लाधले लोक जीवीं

कितीएक ते भैरवाचे मिळाले। कमाचे कितीएक घेऊनि आले।
कितीएक ते नाचताती धबाबां। मुखें डोलती वाजवीती खबाबां॥

कितीएक ते गारुडी नाचताती। गळे फूगले घागऱ्या लोळ घेती।
कितीएक ते लोक नाना गुणांचे। ब्रिदें अंकुशें लाविले भार कुंचे॥

कितीएक ते भोंवती भेद नाना। भ्रमों लागले पाय भूमी स्थिरेना।
कितीएक ते टीपऱ्या खेळताती। मिळाले समेळे बहू वाजताती ३०

घनें सुस्वरें नादकल्होळ जाला। बहूतांपरीचा बहू लोक आला।
महद्भूत ते माजली रंगवेळा। दणाणी मही नाद गेला भुगोळा ३१

निशी प्राप्त जाली असंभाव्य दाटी।
बहू दीवट्या लक्ष कोट्यायानुकोटी।
कितीएक ते उंच नेले उमाळे।
नळे जाळितां घोष तैसे उफाळे॥ ३२॥

सरारां फुलें धांवती अंतराळीं। कडाडीत घोषें निराळीं निराळीं।
भुरारां हवाया कितीएक वेळां। बळें पाहती ऊर्ध्व नक्षत्रमाळा॥ ३३

---

१ समूह.

बहू औषधें दिव्य नानापरींचीं । कितीएक तेजाळ तीं कूसरीचीं ।
घडीनें घडी तेजपुंजाळ होती । उजेडेंचि ते लोक लोकां पहाती ॥
पुढें ऊठिला राम तो ते प्रसंगीं । प्रभू चालिला भूवनामाजि वेगीं ।
समस्तांसि आरोगणा[1] सांग केली । विडे कर्पुरें घेतले तृप्ति जाली

गृहें दीधलीं रम्य दिव्यांबरांचीं ।
दळें स्वस्थ जालीं रिसांवानरांचीं ।
कपी वीर राक्षेस सूखें निघाले ।
सुपुत्रींचिया भूवनामाजि गेले ॥ ३६ ॥

सुवर्णाचिया मंचकीं मृदु शय्या । वरी सूमनें सेज त्या देवराया ।
सभामंडपीं ते निशी अर्ध गेली । प्रभूनें यथासांग विश्रांति केली ॥

निजेले ऋपी राव तो बंधु माता ।
यथायोग्य विश्रांति जाली समस्तां ।
कितीएक त्या वीरफौजा समस्ती ।
असंभाव्य तो वाद्यकल्लोळ वस्ती ॥ ३८ ॥

प्रभातींचि ऊठोनियां नित्य नेमें ॥ किजे स्नानसंध्यादिकें सांग कर्में
कितीएक दानें कितीकांपरींचीं । धनें कांचनें भव्य नानापरींचीं ॥
अँळंकार मुक्ताफळें मुक्तमाळा । कितीएक दिव्यांबरें रत्नमाळा ।
कितीएक धोत्रें कितीएक पात्रें । दिलीं ब्राह्मणां दान राजीवनेत्रें ॥
कितीएक कोट्यावधी गोधनांचीं । कितीएक लक्षावधी कुंजरांचीं
वळाचे बहू अश्व ते पारखीले । धनेंशीं द्विजां ब्राह्मणां दान केले ॥
ऋषी बांधवीं सारिलीं स्नानदानें । यथायोग्य उंचासनें स्थान मानें ।
सभेमाजि तो बैसला राम राजा ॥ निघाल्या कपीरीसराक्षेसफौज ॥
कपीनाथ तो अंगदू जांबवंतू । कुमूदू गजू वीनतू वीर्यवंतू ।
महावीर लंकापती मारुती तो । सुमूखू द्विवीदू कपी केसरी तो ॥
प्रमाथी गवायू निळू हेमकूटू । सुषेणू नळू मैंद गोठा अचाटू ।

---

१ भोजन.

कपी क्रोधनू ऋषभू आणि शर्भू । गवाक्षू दधीमूख स्वेदू शराभू ॥
कपी रीस राक्षेस कोट्यानुकोटी । असंभाव्य ते चालिले रामभेटी
समस्तीं प्रभूला नमस्कार केले । पुढें सर्वही हात जोडूनि ठेले ॥ ४९
समस्तीं विरीं रामगूणागराला[१] । बहू प्रार्थिलें त्या दयासागराला ।
समस्तांसि देवें निरोपासि द्यावें । ह्मणे राम तो शीघ्र जेऊनि जावें॥
नमस्कार केले तया विश्ववंद्या । पुढें शीघ्र संपादिली स्नानसंध्या ।
असंभाव्य तीं दिव्य अन्नें सुवासें । बहू पंगती घातल्या सावकाशें ॥
ऋषी राम ते सर्वही बंधुवर्गीं । कितीएक ते बैसले आप्तवर्गीं ।
प्रभा फांकली दिव्य रत्नीं अनर्घीं। कपी रीस ते बैसले जेविं स्वर्गीं
हरी ऋक्ष राक्षेस सर्वै मिळाले । असंभाव्य ते भोजनालागिं आले ।
बहू पाकनिष्पत्ति नानापरीची । पक्वान्नें रसाळें कळाकूसरीचीं ४९
जगज्जन्ननी जानकी वाढिताहे । सुवासें महा सौख्य तें होत आहे ।
यथासांग संपूर्ण तें अन्न जालें । पुढें शीघ्र तें शर्करा आज्य आलें ॥
पयादीक नाना रसें पूर्ण पात्रें । त्वरें घेतले ग्रास राजीवनेत्रें ।
समस्तांसि आज्ञापिलें देवधीशें । कपी सर्वही गर्जती नामघोषें ५१
तयां जेवितां जेवितां भक्ष्य जालें। पुन्हा मागुती खाद्य ऊदंड आलें
घृतें वाढितां वाढितां वोघ गेले । असंभाव्य नानापरी तृप्त केले ॥
अपेक्षी तया मागती सर्व शाका । कितीएक ते आणवीती कथीका
क्षिरी लोणचीं रायतीं भात भक्षें । खुणा दाविती मागती एक लक्षें
जळें शीतळें सर्वही सेविताती । पुन्हा मागुते वीर ते जेविताती ।
समस्तांसि तीं सांग संपूर्ण जालीं । पुढें शीघ्र दध्योदनें[२] आणवीलीं
बहू जेवितां जेवितां एक मध्यें । प्रतापें मुखें बोलती श्लोक गद्यें ।
मनीं भासती अर्थ नानापरीचे । मुखें रामनामें महद्घोष वाचे ५५॥
समस्तांसि तें सर्व संपूर्ण जालें । महा तृप्तिनें लोक सूखें निवाले ।
वरी आचमनें शुद्ध केलीं स्वळाळां । कितीएक ते तोय घेती घळाळां

१ गुणांचें आगर. २ दहीभात.

सभामंडपीं सर्वही स्वस्थ जाले। सुगंधी विडे शीघ्र ते आणवीले।
समस्तांसि संपूर्ण गंधें सुवासें। कपी पूजिले सर्व नाना विलासें॥
समस्तीं विडे घेतले पीतपर्णें। सुपारी बरी कर्पुरू मुक्तचूर्णें।
बहू वेळ लौंगा सुवासें खदीरें। किती जाति कंकोळ नाना प्रकारें
अळंकार चीरें बहू सिद्ध केलीं। असंभाव्य दिव्यांबरें आणवीलीं
बहू भूषणांचे बहू ढीग केले। जगज्जनकें ते कपी गौरवीले ८९
तुरे लाविले घातल्या पुष्पमाळा किती एक त्या रत्नमाळा सुढाळा
करीं कंकणें मुद्रिका लेववील्या। यथासांग सर्वांस संपूर्ण केल्या॥
सभामंडपीं फांकल्या रत्नकीळा[2] समस्तांसि ते जाहली सौख्यवेळा
किती एक सांगीतल्या गुप्त गोष्टी। महावीर आनंदले सर्व पोटीं॥
स्तुतीउत्तरीं सर्व लावण्यखाणी। सुखें बोलिला राम कारुण्यवाणी।
तुह्मीं कष्ट केले जिवीं सर्व भावें तुह्मांलागिं म्यां काय उत्तीर्ण व्हावें
कपी सुग्रिवा अंगदा जांबवंता। गजा मारुता आणि नैर्ऋत्यनाथा
समस्तांसि सन्मानिलें रामचंद्रें। सुधाउत्तरीं तोषवीलें नरेंद्रें॥६२
सुखें बोलिजे वैद्यराजासि[3] देवें। कपी तूज ऊचीत म्यां काय द्यावें।
वरू दीधला रामचंद्रें उचीती। तुझ्या दर्शनें लोक आरोग्य होती
समस्तांकडे पाहिलें राघवानें। तयां सर्व रोमांच आले फुराणें।
नमस्कारिलें स्वामि देवाधिदेवा। ह्मणे राम तो लोभ आतां असावा
असंभाव्य केली स्तुती राघवाची। वदों लागली मंडळी प्रेमळांची॥
कपी बोलती सर्व कारुण्यवाचा। स्तुती ऐकतो राम सिंधू सुखाचा
गिरीकंदरामाजि आह्मीं असावें। नरां देखतां वानरीं शीघ्र जावें
समर्थें सवे लाविली मर्कटांला। महा सूकृतें पार नाहीं सुखाला।
प्रभू बोलणें चालणें काय जाणें। बरें वोखटें सर्व कांहींच नेणें।
बहूतांपरी चालवीलें दयाळें। तुह्मां योग्य हें आमुचें तोंड काळें।
कृपाळूपणें राघवें थोर केलें। बरें वोखटें सर्व साहून नेलें।

१ अतितजस्वी. २ रत्नकांति. ३ सुषेणाला.

बहू देखिलें सौख्य नानापरीचें । प्रभूच्या पदालागिं हें प्राप्त कैंचें ।
सभाग्याचिया संगतीनें असावें । बहूतांपरीचें बहू सौख्य घ्यावें ।
तयासारिखें सर्व आह्मांसि जालें । महा वैभवें चित्त सूखें निवालें ॥
नव्हे भेटि नानापरी योगयागें । नव्हे भेटि नानापरी भोगत्यागें ।
नव्हे भेटि ब्रह्मादिकां शीघ्र काळें । त्रिकूटाचळीं दाखवीलें भुपाळें ।
कपी रीस ते बोलती दैन्यवाणे । कृपासागरू जीविंचा भाव जाणे।
तयांच्या शिणें देव तो शीणताहे । बहूतांपरी राम संबोखिताहे[1] ॥
सवे लागली राघवाची सुटेना । प्रिती गुंतली तोडितांही तुटेना ।
बहू दीस गेले सुखाचेनि योगें । अकस्मात तें दुःख जालें वियोगें ॥
प्रभूसंगतीची सवे दृढ केली । अकस्मात कां सर्व छेदूनि नेली ।
तयां बोलतां जाहला रावणारी । तुह्मां भेटि देईन कृष्णावतारीं ॥
दयाळासि तींहीं नमस्कार केले । प्रभू सव्य घालूनि तैसे निघाले ।
समस्तीं समस्तांसि वंदूनि वेगीं । पुढें नीघते जाहले ते प्रसंगीं ॥
मनें वीकले भक्तपाळें भुपाळें । मनामाजि ते खंति केली दयाळें ।
जनी सेवकांलागिं देखोनि ऊणें । बहू कष्ट घेऊनियां सौख्य देणें ।
मनीं भावना भक्तलोकासि जैशी । तयासारिखी देवरायासि तैशी ।
जनीं सेवकांकारणें जन्म घेणें । महद्भाग्य सांडोनियां नीच होणें॥
पडे सांकडें सर्वदा सेवकांचें । दिनानाथ हें ब्रीद विख्यात साचें ।
मनामाजि ते जैशि जैशी अपेक्षा ।करीना कदा राम त्याची उपेक्षा
असंभाव्य अन्याय तो आठवीना । बहू चूकतां देव कांहीं शिणेना
तया मानसीं लागली प्रेममाया । करी सेवकालागिं नाना उपाया॥
सदा सर्वदा देव हा साभिमानी । कृपा भाकितां शीघ्र पावे निदानीं[2]
तया अंतरीं थोर लाहान नाहीं । परी पाविजे दृढ भावार्थ कांहीं ॥
जया अंतरीं भाव होईल जैसा । तयालागिं तो देव पावेल तैसा ।
यदर्थीं कदा संशयोही असेना । अभावें तरी देव तो पाळेना ८१

१ सांत्वन करीत आहे. २ शेवटीं.

कितीएक अन्याय कोटयानुकोटी भ्रमें होय नानापरी बुद्धि खोटी
परी पाहतां लोभ त्याचा सरेना। कृपासागरू तो कदा वोसरेनां॥
कृपाळूपणें देवराजाधिराजें। शिरीं वाहिजे सर्वही भक्तवोझें।
जनीं दास देखोनियां दैन्यवाणा। मनामाजि वोसावतो देवराणा॥
बहूसाल हें बोलणें काय कीती।स्वयें जाणिजे ज्या असे स्वप्रचीती
अयोध्यापुरीमाजि तो रामराजा। कृपाळू सुखें राहिला भक्तकाजा
कपी रीस गेले स्थळें जेथजेथें। मिती मारुती राहिला राम तेथें।
रघूनाथ सीता तया बंधुवर्गीं। उभे राहिजे सेवकें पूर्वभार्गी ॥८५॥
समस्तांसि पूजूनि नाना विलासें। नमस्कारिले सर्व दासानुदासें।
उदासीन श्रोतीं कदाही न कीजे। बहू भेद भाषा क्षमा सर्व कीजे।
मनामाजि ऊपासना रामध्यानीं। जनीं दास तो नीववी ब्रह्मज्ञानी।
अखंडीत त्या राघवाच्या प्रतापें। विवेकें विचारें समाधान सोपें॥
पदीं लागतां निर्गुणीं भक्त जाले। बहू संग निःसंगे हाऊनि गेले।
विवेकें बरें पाहतां ध्येय ध्याता। विचारें बरें शोधितां ज्ञेय ज्ञाता॥
विवंचूनि तो साधकू साध्य जाला।असंभाव्य तो ब्रह्मबोधें बुडाला
पुसावें कळेना तरी सज्जनाला। धरूनी त्यजावें विदेहीपणाला ॥
असे हें जनीं प्राप्त तेणें धरावें। अनिर्वाच्य तें वाच्य कैसें वदावें।
सदा नित्य नीरूपणीं वीवरावें। नुरावें परी कीर्तिरूपें उरावें॥

असो जाणत्याला कळे सर्व कांहीं।
जनीं नेणता त्यासि कांहींच नाहीं।
नसे ज्ञान त्या सर्वही व्यर्थ गेलें।
जळो पांञ्च मौतीक हें काय जालें ॥९१॥

असो ही कथा बोलिली राघवाची।जनीं सर्वदा ऐकती धन्य त्यांची
सुखें ऐकतां ते महा दोष जाती।दुखें नासती लोक ते धन्य होती॥
चरित्रें बरीं उत्तमें राघवाचीं।असंभाव्य विस्तारलीं पावनाचीं ।

---

 १ दूर जाईना. २ समाधान पावतो. ३ विषयवासनारहित.

कितीएक ते पाहती कोटि होती। जनीं एक एकाक्षरें दोष जाती ॥
शतांचीं शतें पूर्ण आरंभ संधीं। कळाया कथा हेतुसंकेतसिद्धि ॥
पुढें बोलिलें तें बरें वीवरावें। बुजायास हें गद्य पोटीं धरावें ॥ ९४॥
मुळारंभ ते स्तूति नाना परीची। गिरी वर्णिला जाइली सागराची।
पहीले शतीं भेटि बीभीषणाची। पुढें शेवटीं शेज दर्भासनाची ॥
द्वितीयीं शतीं राम क्रोधासि आला। कथेलागिं तेथूनि आरंभ झाला
बळें सिंधु पालाणिला शूक गेला। अपेक्षा मनीं शृंग पाहावयाला ॥
तृतीयीं शतीं शृंग पाहों निघाले। रिपूलागिं तो शिष्ट जावूनि बोले
बहू वीर राक्षेस युद्धीं निमाले। कपी सर्वही नागपाशीं निजेले ॥
रणीं दाखवीलीं तये जानकीला। तये वीरेशीं तो महस्तू निमाला॥
प्रसंगेंचि मंदोदरी नीति सांगे। निघाला दशग्रीव तो लागवेगें ॥
चतुर्थी शतीं युद्ध त्या रावणानें। रघूनायकें सोडिला जीवदानें ॥
पुढें कुंभकर्णासि संहार केला। समूदाय तो कूमरांचा निमाला ॥
कितीएक ते वीर माहोदरेशीं। प्रतापें रणामाजि ते प्रेतराशी ॥
पुढें इंद्रजीतें कपी भग्न केले। महावीर ते बाणजाळीं निमाले ॥
शता पंचमा लागिं आरंभ जाला। कपी वीरद्रोणाचळालागिं गेला
महावीर ते ऊठले स्वस्थ जाले। त्रिकूटाचळू सर्व जाळूं निघाले ॥
कपी क्षोभले काळ युद्धा निघाले। कितीएक राक्षेस युद्धीं निमाले।
नभींहूनि तो रावणी वीर आला। समस्तांसि भेटूनियां शीघ्रगेला।
सहावे शतीं रावणू दुःख सांगे। त्रिकूटाचळीं रावणी लागवेगें ॥
पुन्हा इंद्रजीत् रणामाजि आला। विरीं वानरीं होम तो भग्न केला।
शतीं सातवे त्या विरें इंद्रजीतें। असंभाव्य केलीं रणामाजि प्रेतें ।
सुमित्रासुतें मारिला बाणघातें। यथासांग तो वन्हि सूलोचनेतें ॥
शतीं आठवे वीर घायाळ जाले। कितीएक राक्षेस युद्धीं निमाले।
सुमित्रासुता रावणें घात केला। गिरि द्रोण आणूनियां स्वस्थ जाला

१ वीरश्रीनें.

नवामाजि रामासि सौमित्र सांगे। बळें मांगिला होम तो लागवेगें
रघूनायकें थोर संग्राम केला। रणामाजिं तो मुख्य शत्रू निमाला
दहावे शतीं शोक अंतःपुराचा। प्रसंगें महोत्साव बीभीषणाचा
रघूनायकें जानकी आणवीली। समस्तां सुरां राघवा भेटि जाली॥
शतीं ऐक एकादशीं राघवाची असंभाव्य ते स्तूति ब्रह्मादिकांची
महापुष्पकारूढ होऊनि गेले। पुढें भ्रातया भेटले स्वस्थ जाले॥
पुढे द्वादशीं मंदिरें त्या विरांचीं।यथायोग्य मानें समस्तां जणांची
पुजा भोजनें सांग सर्वांसि जालीं। पुरी वर्णितां मानसें तीं निवालीं
शतीं अष्टपंची पुरीमाजी गेले। रघूराज भद्रासनीं बैसवीले।
महोत्साव उत्साव नानापरीचा। समूदाय तो बोळवीला कपींचा॥
करी राज्य तो राव नाना विलासी।जनामाजि ऊपासना रामदासी
यथासांग तेरा शतें श्लोक जाले। गुणी ऐकतां सर्व सूखें निवाले॥
॥ इतिश्रीरामदासकृत श्लोकबद्धयुद्धकांड संपूर्ण ॥

रामदासकृत रामायण




मनाचे श्लोक[१] नित्यनैमित्तिकामध्यें पान ८११९८ पहा.

---

१ प्रमाणानें.

॥ श्री ॥



# रामदासस्वामिकृत

## अभंग.

हे


**बाबाजी अनंत प्रभु–तेण्डुलकर.**

यांनीं आपल्या

" श्रीहरिवरदा " प्रिंटिंगप्रेसमध्यें छापिले.

मुंबई.

शके १८१४.

सन १८९२.

किंमत १२ आणे.

# रामदासस्वामिकृत अभंग.



## बालक्रीडा.

नमस्कार माझा हा विघ्ननाशना। शारदा आननामाजी राहो ॥ १ ॥ राहो सर्वकाळ गोविंदाचें नाम। कीर्तन उत्तम यादवाचें॥२॥ यादवाचे कुळीं गोकुळीं गोविंद। आनंदाचा कंद अवतरला ॥३॥ अवतरला पूर्ण अवतारी अच्युत। आयुधें मंडित चतुर्भुज॥ ४ ॥ चतुर्भुज वरी डोळस सांवळा। वैजयंतीमाळा पीतांबर॥ ५ ॥ पीतांबरधारी प्रकटे मुरारी। मथुरेमाझारीं कारागृहीं ॥ ६ ॥ कारागृहीं माता पिता वसुदेव। तेथें आले देव सोडवणे ॥७॥ सोडवणे आला वैकुंठींचा राव। येतां चि लाघव थोर केलें॥ ८॥ थोर केलें कर्म सर्वां भुलवीलें। स्वयें आच्छादीलें निजरूप॥९॥ निजरूप देवें सोडुनी कौतुक। जहाला बाळक नंदजीचें॥ १० ॥ नंदजीचें बाळ करि पंथ मोकळा। जावया गोकुळा विश्रांतीसी॥ ११ ॥ विश्रांतीसी आलें स्थळ पालटलें। नवल जाणवलें कंसराया॥ १२ ॥ कंसराया जाय मारूं आपटोनी। मन गडबडोनी उसळली॥ १३ ॥ उसळली ह्मणे कंसा तुझा वैरी। गोकुळामाझारीं वाढतसे ॥ १४॥ वाढतसे वैरी नंदाची कुमारी। बोलोनी अंबरीं गुप्त झाली॥ १५ ॥ झाली तळमळ एकतां कंसासी। लागली मानसीं थोर चिंता १६॥ थोर चिंता करी ह्मणे माझा वैरी। वाढतसे मारी कोण आतां१७॥ कोण आतां तरी करावा उपाय। वैरीया अपाय होय जेणें ॥१८॥ होय जेणें मृत्यु तया बाळकासी। तंव आले जोशी ह्मावळभट्ट१९॥ ह्मावळभट्ट आले रायें सन्मानीले। तयांप्रती बोले कांहीं एक॥२०॥ कांहीं एक भटो मांडिलें संकट। तंव येरें पट उकलीला॥ २१ ॥ उकलीला पट पाहिला मुहूर्त। ह्मणे चिंता व्यर्थ कां करितां ॥२२॥

---

१ पंचांग. २ उघडिला.

कां करितां चिंता तया बाळकाची।वधूनि शीघ्र चि येतों आतां२३ येतों आतां ऐसें बोलोनि वचन। शीघ्र चि गमन आरंभिलें ॥ २४॥ आरंभिलें तेणें ब्रह्मांडगमन। पावला भुवन नंदजीचें ॥२५॥ नंदजीचें बाळ आलें मुळावरी । बैसवूनि नारी सांगतसे ॥ २६ ॥ सांगतसे ह्मणे हें तुह्मां वाईट। कुळाचा शेवट करूं आलें॥२७॥करूं आलें घात सर्वांचें अनहित। वोखटें बहुत दिसतसे ॥२८॥दिसतसे दुष्ट सांगतों मी स्पष्ट। बुद्धीनें वरिष्ठ आहों आह्मी॥ २९ ॥ आहां तुह्मी माझे कीं हो यजमान। ह्मणोनि सांगणें लागे आह्मां ॥३०॥ लागे आह्मां शब्द ऐसें न करावें। सत्वर वधावें लेंकुरासी ॥ ३१ ॥ लेंकुरासी क्रोध ऐकोनि वचन। मग पीढेदानें आरंभीलें॥३२॥आरंभीलें थोर कठीण द्विजासी। उठोनि त्वरेंसी पळतसे ॥३३॥ पळतसे पुढें मागें पीढे दान। पृष्ठीचें कंदन तें होतसे॥ ३४ ॥ होतसे ताडन काष्ठाचें चहुंकडून। कष्टला ब्राह्मण पळतसे ॥ ३५ ॥ पळतसे भय भरलें अंतरीं॥ ह्मणे हरी हरी नारायणा॥ ३६॥ नारायणें मज रक्षीलें जीवेंसीं। दावी राया पाशीं पृष्ठभाग ॥३७॥ पृष्ठभागीं थोर झालेंसे ताडण। भटो बहु सीण पावलेती॥३८॥ पावली ती पूतना ह्मणे काय झालें। बाळकें मारिलें ब्राह्मणासी॥ ३९॥ ब्राह्मणासी जेणें दिल्हें पीढें दान। तयासी मारीन शीघ्रकाळें॥ ४०॥ शीघ्रकाळें विषें भरी पयोधर। पावली मंदिर पूतना ते ॥ ४१ ॥पूतना मावसी होय गोविंदासी।ह्मणोनी वेगेंसीं पाहों आली॥४२॥पाहों आली परी कपट अंतरीं। भाव वरीवरी दावीतसे॥४३ ॥ दावीतसे भाव शब्दाचें लाघव।जाणीयेली माव बाळकानें॥४४॥बाळकासी पुढें घेऊनि चुंबन। देत स्तनपान आदरेंसीं॥ ४५॥ आदरेंसीं हरी स्तनपान करी। पूतना अंतरीं जाजावली॥४६॥जाजावली ह्मणे पुरे बापा आतां। जाऊंदे अनंता सोड वेगीं ॥४७॥ सोड वेगीं हातें

१ पाट देणें. २ कष्ट पावला.

लोटिलें श्रीमुख । निघेना बाळक शोषीतसे ॥ ४८॥ शोषीली पूतना आक्रंदे मानसीं । मुकली प्राणासी कृष्णमुखें ॥ ४९ ॥ कृष्णमुखें रीठासुर रगडीला । लातीं विदारीला शकटासुर ॥ ५० ॥ शकटासुर लातीं हाणे बाळपणीं । वृक्ष उन्मूळूनी सांगतसे ॥ ५१ ॥ सांगतां सांगतां देवें गिळियेला । उदरीं दाविला विश्व लोक॥५२॥ विश्वलोक नांदे जयाचे अंतरीं । गाई राखे हरी गौळीयांच्या५३॥ गौळीयांच्या गाई राखी तये वेळीं। खेळे चेंडूफळी गोपाळांसीं५४॥ गोपाळांसीं चेंडू खेळतां उडाला । जाऊनी बूडाला डोहामध्यें ५५ डोहामध्यें कृष्णें टाकियेली उडी । पाहतातीं थडीं संवगडे॥५६ ॥ सांगतातीं कृष्ण बुडाला तुमचा । जेथें काळियाचा डोह आहे॥ ॥ ५७ ॥ डोहो आहे तेथें दावीतीं गोपाळ । मिळाले सकळ विश्वजन ॥ ५८॥ विश्वजन सर्व पहाती गोविंदा । आक्रंदे यशोदा दीनरूप ॥ ५९ ॥ दीनरूप माता करीते रोदन । संबोखितां जन यशोदेशी ॥ ६० ॥ यशोदेसी ठाव दावीला गोपाळीं । मोडली इहाळी कळंबाची॥६१॥कळंबाची छाया दिसे जळा वरी ।बुडाला श्रीहरी तये ठायीं॥६२॥ तये ठायीं माता घालूं पाहे उडी । धरितीं देवगडी नगरलोक ॥ ६३ ॥ नगरलोक सर्व गोपाळ रुदती । गाई हुंबरती कृष्णालागीं ॥ ६४॥ कृष्णालागीं सर्व जन आक्रंदती । मग संबोखिती येर येरां ॥ ६५॥ येरयेरां संबोखुनियां निघाले । कृष्णें काय केलें डोहामाजी ॥ ६६ ॥ डोहामाजी क्रूर काळिया विखार। परस्परें थोर युद्ध झालें॥ ६७॥ युद्ध झालें थोर काळिया नाथीला। गोकूळासी आला कृष्णनाथ ॥ ६८॥ कृष्णनाथें अग बग विभांडीले । धेनुका मारीलें आपटूनी॥ ६९ ॥ आपटूनी मांडी खेळती गोपाळ। घूमरी कल्लोळ पांवयांचे ॥ ७० ॥ पांवयांचे नाद वाजती मोहरी । तेणें नगरनारी लुब्ध होतीं ॥ ७१ ॥ लुब्ध होती

---

१ सर्व. २ नाहींसा केला. ३ मुरली.

पक्षी नर वनचर । यमुनेचें नीर तुंबळलें ॥ ७२ ॥ तुंबळले गोप ला-
गला वणवा । गिळूनीयां अश्वा वधीयेलें ॥ ७३ ॥ वधीयेलें कृष्णें
पन्नग आवर्ता । दुष्ट तृणावर्ता मारीयेलें ॥ ७४ ॥ मारीयेला गर्व
थोर ब्राह्मणांचा । जाहाला सर्वांचा समुदाय ॥ ७५ ॥ समुदाय सर्व
गोपाळ स्वजन । बळें गोवर्धन उचलीला ॥ ७६ ॥ उचलीला तळीं
राखीलें गोकुळ । इंद्राचा सकळ गर्व नेला ॥ ७७ ॥ नेलें मथुरेसीं अ-
क्रूरें कृष्णासी । मल्ल चाणूरासी वधीयेलें ॥ ७८ ॥ वधीयेला कंस
घातलें आसन । तेथें उग्रसेन बैसवीला ॥ ७९ ॥ बैसवीला उग्रसेन
नृपासनीं । चैद्यासी त्रात्रूनी मारीयेलें ॥ ८० ॥ मारी शिशुपाळ
आणि भौमासुर । वधीला असुर जरासंध ॥ ८१ ॥ जरासंध का-
ळयवन महासुर । मारीले असुर थोर थोर ॥ ८२ ॥ थोर ख्याती
केली अर्जुना रक्षीलें । सर्व साह्य केलें पांडवांचें ॥ ८३ ॥ पांड-
वांचा सखा सर्व साहाकारी । संकटीं कैवारी द्रौपदीचा ॥ ८४ ॥
द्रौपदीचा सखा द्वारकेभीतरी । सोळा सहस्र नारी गोपांगना
॥ ८५ ॥ गोपांगना राधा रुक्मिणी सुंदरी । सुखें राज्य करी याद-
वेंसीं ॥ ८६ ॥ यादवांसी शाप दिल्हा ऋषीश्वरीं । मांडिली बोहरी
तेणें मीसें ॥ ८७ ॥ तेणें मीसें सर्व आटले यादव । तेकाळीं उद्धव उ-
पदेशिला ॥ ८८ ॥ उपदेशिला दास श्रीकृष्णें आपुला । अवतार
झाला पूर्ण आतां ॥ ८९ ॥

---

## वैराग्यशतक.

नमन योगीया स्वामी दत्तात्रेया । गाईन वोविया संसारींच्या
॥ १ ॥ संसारींचें दुःख आठविलें मनीं । मागें नाना योनी भोगीयेल्या
॥ २ ॥ भोगीयेल्या परी नाहीं आठवण । दुःख तें कठीण विसरलों
॥ ३ ॥ विसरलों राम चित्तीं दृढ काम । तेणें गुणें श्रम थोर झाला

१. नाश.

॥ ४ ॥ झालों कासावीस थोर गर्भवासी । नको त्या दुःखासी सांगवेना ॥ ५ ॥ सांगवेना सीण अत्यंत कठीण । रामा तुजवीण दुःख झालें ॥ ६ ॥ दुःख झालें भारी मातेच्या उदरीं । नवमासवरी कोंडीयेलें ॥ ७ ॥ कोंडियेलें मज अत्यंत सांकडीं । रामा कोण सोडी तुजवीण ॥ ८ ॥ तुजवीण मज जाहालें बंधन । जठरीं शयन जननीचे ॥ ९ ॥ जननीचें जठर संकोचित थोर विष्ठा आणि मूत्र नाकीं तोंडीं ॥ १० ॥ नाकीं तोंडीं जंत वांती आणि पित्त । निर्बुजलें[1] चित्त वायु नाहीं ॥ ११ ॥ वायु नाहीं तेथें वन्हीचा उबारा । तेणें या शरीरा दुःख होय ॥ १२ ॥ दुःख होय थोर सर्वांग आहळे[2] । तेणें गुणें पांळे अस्थिमात्र ॥ १३ ॥ अस्थिमात्र पंजर शिरीं वेटाळीला । नाहीं गुंडाळीला मेदमांसें ॥ १४ ॥ मेद मांस कृमी कुत्सित कातडी । गळती आंतडीं लवथवीत ॥ १५ ॥ ऐसें अमंगळ अत्यंत कुश्चीळ । प्राण हा व्याकुळ होय दुःखें ॥ १६ ॥ दुःखें आला त्रास तेणें कोंडे श्वास । कोंडिलें उबेस घेतां नये ॥ १७ ॥ नये नये येतां सर्वथा बाहेरी । ऐसी दाटी थोरी उकडीलों ॥ १८ ॥ उकडीतां प्राणी करी तळमळ । तंव जन्मकाळ आला पुढें ॥ १९ ॥ आलें पुढें अंतकाळींचें संकट । कष्टावरी कष्ट थोर झाले ॥ २० ॥ थोर झाले कष्ट मातेच्या उदरीं । सीणला श्रीहरी दास तुझा ॥ २१ ॥ दास्य मी करीन ऐसें होतें ध्यान । जन्मकाळीं प्राण गेला माझा ॥ २२ ॥ गेला माझा प्राण झालें विस्मरण । स्वामीचे चरण विसरलों ॥ २३ ॥ विसरलों सोऽहं मग ह्मणे कोऽहं । जन्मकाळीं बहु दुःख झालें ॥ २४ ॥ दुःखें दुखावलों ह्मणे आहा आहा । जन ह्मणे टाहा फोडीयेला ॥ २५ ॥ फोडीयेला टाहो पडतां भूमीवरी । दिवसेंदिवस हरी विसरलों ॥ २६ ॥ विसरलों बुद्धि स्वहिताची शुद्धी । अज्ञानाची वृद्धी होत असे ॥ २७ ॥ होत असे वृद्धी दृढ देहबुद्धी । तुज कृपा-

[1] विटलें. [2] तापे.

निधी अंतरलों ॥ २८ ॥ अंतरलों सुख तुज वीसंबता । विषय भोगीतां दुःख झालें ॥ २९ ॥ दुःख झालें फार ऐसा हा संसार । पुढें षड्विकार उद्भवले ॥ ३० ॥ उद्भवले तेणें सुख दुःख कळे । प्राण हे आंदोळे दुःख होतां ॥ ३१ ॥ दुःख होय देहीं माता नेणे कांहीं । मज वाचा नाहीं काय करूं ॥ ३२ ॥ काय करूं दुःखें पोळे अभ्यंतर । मातेसी अंतर जाणवेना ॥ ३३ ॥ जाणवेना माझें दुःख मी अज्ञान । मग मी रोदन करीं देवा ॥ ३४ ॥ करीं देवा आतां माझी सोडवण । दुःख हें दारुण भोगवेना ॥ ३५ ॥ भोगवेना दुःख संसारींचें आतां । धांव बा अनंता पाव वेगीं ॥ ३६ ॥ पाव वेगीं दास सोडवीं आपुलें । लोभेंचि वाहिले मायाजाळीं ॥ ३७ ॥ मायाजाळीं झालें दृढ माझें मन । रामा तुझें नाम आठवेना ॥ ३८ ॥ आठवेना चित्तीं स्वहिताचें ज्ञान । मायबापें लग्न केलें लोभें ॥ ३९ ॥ लोभें लग्न केलें मानीली आवडी । पायीं ओविली बेडी बंधनाची ॥ ४० ॥ बंधनाची बेडी प्रबळला काम । मग कैंचा राम आठवेना ॥ ४१ ॥ आठवेना राम स्वामी त्रैलोक्याचा । झालों कुटुंबाचा भारवाही ॥ ४२ ॥ भारवाही झालों रामा अंतरलों । बंधनीं पडलों काय करूं ॥ ४३ ॥ काय करूं मज कामाचें सांकडें । संसाराचें कोडें उगवेना ॥ ४४ ॥ उगवेना मन आठवे कांचन । सर्वकाळ ध्यान प्रपंचाचें ॥ ४५ ॥ प्रपंचाचें ध्यान लागलें मानसीं । चिंता अहर्निशीं दुःश्चचंळ ॥ ४६ ॥ चंचळ मानस संसारउद्वेगें । क्षणक्षणीं भंगे चित्तवृत्ती ॥ ४७ ॥ वृत्ति कांता धन पाहें जनमान । इच्छेनें बंधन दृढावलें ॥ ४८ ॥ दृढावलें वोस प्रपंचाच्या माथा । तेणें गुणें व्यथा थोर झाली ॥ ४९ ॥ थोर होय व्यथा तारुण्याच्या भरें । कामाचें कांविरें आवरेना ॥ ५० ॥ आवरेना क्रोध तेणें होय खेद । वृत्तीचा उच्छेद करूं पाहे ॥ ५१ ॥ करूं पाहे घात थोर पुढीलाचा । मार्ग स्वहिताचा अंतरलों ॥ ५२ ॥

---

१ आवेश.

अंतरलों भक्ती ठाकेना विरक्ती। देवा तुझी प्राप्ती केवीं घडे ५३। केवीं घडे प्राप्ती मज पतितासी। झाल्या पापराशी सांगूं कीती॥ ५४॥ सांगूं किती दोष झाले लक्षकोटी। पुण्य माझे गांठीं आढळे-ना॥ ५५ ॥ आढळेना पुण्य पापाचे डोंगर। करितां संसार माझें माझें॥ ५६॥ माझी माता पिता माझे बंधु जन। कन्या पुत्र धन सर्व माझें॥ ५७॥ सर्व माझें ऐसा मानीला भरवसा। तुज जगदीशा वीसरलों॥ ५८॥ वीसरलों तुज वैभवाकरितां। शेवीं माता पिता राम झाली॥५९॥ राम झाली माता देखत देखतां। तरी ह्मणें कांता पुत्र माझे॥ ६०॥ माझे पुत्र माझे स्वजन सोयरे। दृढ देहीं मरे अहंभाव॥ ६१॥ अहंभावें मनीं दुःख आच्छादूनी। वर्ततसें जनीं अभिमानें॥६२॥ नाहीं नाहीं सुख संसारीं पहातां। पुरे देवा आतां जन्म नको॥ ६४॥ नको नको आतां घालूं या संसारीं। पोळलों अंतरीं काय करूं॥ ६५॥ काय करूं माझें नेणतीं स्वहित। आपुलालें हित पहातात॥ ६६॥ पहातात सुख वैभवाचीं सर्वी। कोणी मज शेवीं कामा नये॥ ६७॥ कामा नये कोणी तुजवीण रामा। नेई निजधामा माहीयेरा॥६८॥ माहेर हीं माझें अंतरलें दुरी। लोभें दुराचारी गोवीयेलें॥ ६९॥ गोवीयेलें मज आपुलीया हिता। माझी कोणी चिंता केली नाहीं॥ ७०॥ केली नाहीं चिंता लोभें गुंडाळीलें। पिळूनी घेतलें सर्व माझें॥ ७१॥ सर्व माझें गेलें झालें निष्कारण। स्वामीचे चरण अंतरलों॥ ७२॥ अंतरलों देवा आयुष्य वेचलें। अंतर पडलें काय करूं॥ ७३॥ काय करूं आतां शरीर ही गेलें। मज वोसंडीलें जीवा लागीं॥७४॥ जीवा लागीं मज मोकलील देवा। काय करूं ठेवा प्रारब्धाचा॥७५॥ प्रारब्धाचा ठेवा प्रपंचीं रंगला। देहांतीं खंगला वृद्धपणीं॥ ७६॥ वृद्धपणीं माझें चळलें शरीर। श्रवण बधिर नेत्र गेले॥ ७७॥ नेत्र गेले

१ टाकिलें. २ सोडील.

मज पहातां दीसेना । स्वयें उठवेना पाय गेले ॥ ७८ ॥ पाय गेले तेणें दुःख होय भारी । तेथेंचि बाहेरी जाववेना ॥ ७९ ॥ जाववेना तेणें झालें अमंगळ । अत्यंत कुश्चीळ वातपित्त ॥ ८० ॥ वात पित्त जन देखोनी पळती । दुर्गंधी गळती नव नाळीं ॥ ८१ ॥ नवनाळीं वाहे दुर्गंधी न साहे । वांती होऊं पाहे देखतांची ॥ ८२ ॥ देखतां सकळ सुटले पाझर । मळ मूत्र धीर धरवेना ॥ ८३ ॥ धरवेना क्षुधा निद्रा आणि तृषा । पर धनीं आशा प्रबळली ॥ ८४ ॥ प्रबळली आशा झाली अनावर । चिंता-तृष्णा-तुर सर्वकाळ ॥ ८५ ॥ सर्व-काळ चित्तीं थोर लोलंगतां । खायासी मागतां नेदी कोणी ॥८६॥ नेदी कोणी कांहीं क्षीण झालों देहीं । जीवलग ते ही वोसंडीले८७ वोसंडीलें मज वैभव गेलीया । देह खंगलीया दुःख झालें ॥ ८८ ॥ दुःख झालें थोर क्षुधा आवरेना । अन्न ही जिरेना वांती होय॥८९॥ वांती होय तेणें निर्बुजे[1] वासना । स्वादिष्ठ चावेना दांत गेले॥९०॥ दांत गेले तेणें जिव्हेसी बोबडी । कंठ गडगडी बोलवे ना ॥९१ ॥ बोलवे ना अंध-काळींच्या विपत्ती।सर्वही ह्मणती मरे ना कां॥९२ मरे ना कां आतां कासया वांचला । देवा वीसरला नेणोनियां।९३। नेणोनीयां याची मर्यादा खुंटली । सकळा लागली चिंता मनीं ॥९४॥ चिंता मनीं वाटे कृत्याची सकळां । सर्वांसी कंटाळा[2] आला थोर॥ ९५ ॥ आला थोर त्रास जिवलग बोलती । देवा याची माती उचलावी ॥ ९६ ॥ उचलावी माती सर्वांचे अंतरीं । सुखाचीं सोयरीं दुरी ठेलीं ॥ ९७ ॥ दुरी ठेलीं सर्व दुःखाचीं चोरटीं । कोणी च संकटीं सोडवीना ॥९८॥ सोडवीना कोणी श्रीरामा वांचूनी संकटीं धांवणी राम करी ॥ ९९ ॥ राम करीतसे दासाचा सांभाळ। भक्तांचा स्नेहाळ राम माझा ॥ १०० ॥

---

१ विषयासक्ति. २ कंटाळे.

## ज्ञानशतक.

संतांचे संगतीं काय प्राप्त होतें। तें तुम्हां निरुतें सांगईन॥१॥ सांगईन परी मानसीं धरावें। मग उद्धरावें या संसारीं॥२॥संसारीं-चें सार जया नाश नाहीं।तें चि पडे ठायीं संतसंगें॥३॥संतसंगें चुके जननीजठर। दुस्तर संसार मायाजाळ॥४॥ मायाजाळ तुटे तरी देव भेटे। संतसंगें आटे भवसिंधु॥५॥ भव भयानक बुडवी सकळां। त्या हूनि वेगळा साधुसंग॥६॥ साधुसंग साधी असाध्य वस्तू मी। जेथें आहे त्यासी वाट नाहीं॥७॥ वाट नाहीं जेथें जावया इतरा। अभाविका नरा पापबुद्धि॥८॥ पापबुद्धि झडे संतांचे संगतीं। नाहीं अधोगती गर्भवास॥९॥ गर्भवास संतसंगें मुक्त होय। वेगीं धरीं सोय आलीया रे॥१०॥ आलीया संसारीं स्वहित विचारीं। एके भावें धरीं संतसंग॥११॥ संतसंग धरी धन्य तो संसारीं। बोलिले श्रीहरी भागवतीं॥१२॥ भागवतगीतासारनिरूपण। त्याचें विवरण संतसंगें॥१३॥संतसंगें कळे सर्व शास्त्रभाग। आणि ज्ञान-योग अप्रयासें॥१४॥ प्रयासें साधीतां कधीं न ये हाता। तें लाभे तत्वता साधुसंगें॥१५॥ साधूचेनी संगें अलभ्याचा लाभ। मुक्ति हे सुलभ होत आहे।.१६॥ आहे एक देव परी तो वळेना। जयासीं मिळेना संतसंग॥१७॥ संतसंग नाहीं जयालागीं जनीं। तयाकां जननी प्रसवली॥१८॥ प्रसवली माता शीणाचि उरला। पुत्र नाहीं झाला हरिभक्त॥१९॥ हरिभक्त नर वंशाचें मंडण। दोपावें खंडण करीतसे॥२०॥ करीतसे भक्ती संताचे संगतीं। सायुज्यतामुक्ती पावावया॥२१॥ पावावया मुक्ती हरीचें भजन। श्रवण मनन सर्वकाळ॥२२॥ सर्वकाळ होय सार्थक श्रवणें। ब्रह्मनिरूपणें संतसंगें॥२३॥ संतसंगें ब्रह्मपद वोळखावें। विवेकें पावावें निरंजन[१]॥२४॥ निरंजना जातां नाहीं जन वन। अंत्राळीं गमन

---

१ विषयमळरहित.

एकाएकीं ॥ २५ ॥ एकाएकीं देव निर्मळ निश्चळ। आतुडे प्रांजळ दुजेवीण ॥ २६ ॥ दुजेवीण देव एकला एकट। उभा घनदाट मागें पुढें ॥ २७ ॥ मागें पुढें सर्वदेवांचा नायक। सांपडे विवेक झालीयानें ॥ २८॥ झालीयानें कृपा संतसज्जनाची। मग विवेकाची वाट फूटे ॥ २९ ॥ वाट अवघड पहातां दीसेना जेथें नाहीं मना समागम ॥ ३० ॥ समागमें जातां वाटचि फुटेना। संशय तुटेना बहुविध ॥ ३१ ॥ बहुविध पंथ कोणें तो धरावा दुजेपणीं देवा पावीजेना ॥ ३२ ॥ पावीजेना देव संतसंगावीण। मार्ग हा कठीण विवेकाचा ॥ ३३ ॥ विवेकाचा मार्ग विवेकें चालावा। मनाचा त्यागावा संग सर्व ॥ ३४ ॥ सर्व त्याग करीं पावसी श्रीहरी। परी एक धरीं संतसंग ॥ ३५ ॥ संतसंगावीण त्याग हा घडेना। श्रीहरी पडेना कदा ठायीं ॥ ३६ ॥ ठाव सज्जनाचा सज्जन जाणती। तेथें नाहीं गती मीपणाची ॥ ३७ ॥ मीपणाची गती संगाचें लक्षण। ठाउकी हीं खूण सज्जनाची ॥ ३८ ॥ सज्जनाचें वर्म सज्जनाला तूटे। उतरा कुवाटे मायाजाळ ॥ ३९ ॥ मायाजाळ पाहों जातां आढळेना। सर्वथा कळेना न पाहातां ॥४०॥ पाहातां संसार मायिक वेव्हार। परी निरंतर लागलासे ॥ ४१ ॥ लागला दिसेना परी निरसेना। मायिक वासना सत्य झाली ॥४२॥ सत्य झाली असे विवेकें निरसे। निरसोनी वसे जवळीच ॥ ४३ ॥ जवळीच आहे अंतरीं चोरटा। आतां कोण्या वाटा धांवसील ॥ ४४ ॥ धांवसील परी वासना सरेना। सर्वथा मरेना साधूवीण ॥ ४५ ॥ साधूवीण प्राणी पडती आटणी। तपतीर्थाटणीं नानाकर्मीं ॥४६॥ नाना कर्मीं देव चुकोनी राहीला। सज्जनीं पाहीला अनुभवें ॥ ४७ ॥ अनुभव सर्वदेहीं वेगळाले। कोण झाले भले संतजन ॥ ४८ ॥ संत जन परी कोण ओळखावे। कैसे ते जाणावे साधुजन ॥४९॥ साधूची वोळखी साधु वोळखीला।

१ मिळे. २ भ्रांतीचा.

येर भांबावला माया धरी॥५०॥ माया धरी प्राणी जवळी चूकले। नाहीं वोळखीले साधूजन ॥ ५१ ॥ साधूजन कोण कैसें वोळखण। तेंचि निरूपण सांगीतलें॥ ५२ ॥ सांगीतलें आहे मागें थोरथोरीं। तेंचि अवधारीं आलीया रे ॥ ५३ ॥ आलीया रे साधू जाणावा कवणें। तयाचीं लक्षणें असंख्यात ॥ ५४ ॥ असंख्यात परी वोळखीकारणें। साधू पूर्णपणें सारिखाची ॥ ५५ ॥ सारिखाचि दीसे जनाचीयापरी। परी तो अंतरीं वेगळाची ॥ ५६ ॥ वेगळाचि ज्ञानें पूर्ण समाधानें। स्वस्वरूपीं मनें बस्ती केली ॥ ५७ ॥ वस्ती केली मनें निर्गुणीं सर्वदा। मीपणें आपदा तया नाहीं ॥५८॥ तया नाहीं काम तया नाहीं क्रोध। तया नाहीं खेद स्वार्थबुद्धी ॥ ५९ ॥ बुद्धी निश्चयाची स्वरूपीं तयाची।कल्पना ठायाची निर्विकल्प॥६०॥निर्विकल्प मद मत्सर सारीला। आणि संहारीला लोभ दंभ॥६१॥दंभ हा लौकीक विवेकें सांडीला। दुरी वोसंडीला अहंकार॥६२॥ अहंकार नाहीं दुराशा अंतरीं। ममताही दोरी मोकळली ॥ ६३ ॥ मोकळली भ्रांती शरीर संपत्ती। वैभव संगती लालंगता॥ ६४ ॥ लोलंगता नसे ज्ञानें धालेपणें। ऐसीं हीं लक्षणें सज्जनाचीं॥ ६५ ॥ सज्जनलक्षणें सांगेन पुढती। आर्त चित्तवृत्ती लांचावली ॥ ६६ ॥ लाचावली वृत्ती सज्जन सांगतां। होय सार्थकता जयांचेनी॥६७॥ जयांचेनी ज्ञानें तरती अज्ञानें। साधू संगतीनें समाधान ॥६८॥ समाधानें शांती क्षमा आणी दया। रंक आणी राया सारिखाची ॥ ६९॥ सारिखाची शोध तेथें नाहीं भेद। सर्वांसीं अभेद सर्वकाळ ॥ ७० ॥ सर्व काळ गेला श्रवणें मननें। सत्क्रिया साधनें हरिभक्ती ॥७१॥ हरिभक्ति करी जन तारावया। स्वधर्मा वीलया जाऊं नेदी ॥ ७२ ॥ जाऊं नेदी भक्ति जाऊं नेदी ज्ञान। अनुतापीं मन निरंतर ॥७३॥ निरंतर भाव सगुणीं भजन। येणें बहु जन उद्धरती ॥७४॥

---

१ मोकळी सुटली. २ विषयलंपटपणा. ३ तृप्तता.

उद्धरती जन करितां साधन। क्रियेजें बंधन आचरतां ॥ ७५ ॥ आचरतां साधूजना होय बोधु। लागतसे वेध मुक्तिभावें ॥ ७६ ॥ भक्तिभावें देवप्रतिष्ठा पूजना कथा निरूपण महोत्साव॥७७॥महोत्साव साधुभक्तीचें लक्षण।करी तीर्थाटण आदरेंसीं ॥७८॥ आदरेंसीं विधी करणें उपाधी॥ लोकांतें सद्बुद्धी लागावया॥७९॥लागावया बुद्धी सत्क्रिया भजन। करीतो सज्जन मुक्तिदाता ॥८०॥ मुक्तिदाता साधू तोचि तो जाणावा। जेणें संपादावा लोकाचार ॥ ८१ ॥ लोकाचार करी तो जना उद्धरी। ज्ञाता अनाचारी कामा नये ॥८२॥ नये नये निंदू जनीं जनार्दन। ह्मणोनि सज्जन क्रियावंत ॥ ८३ ॥ क्रियावंत साधू विरक्त विवेकी। तोचि तो लौकिकीं मान्य आहे ॥ ८४ ॥ मान्यता सत्क्रिया लौकीक सोडीला। तोचि उद्धरीला जनीं नाहीं ॥ ८५ ॥ जनीं नाहीं मान्य तो सर्व अमान्य। ह्मणोनियां धन्य क्रियावंत ॥ ८६ ॥ क्रियावंत तेणें लौकीक सोडावें। आणि वसवावें ब्रह्मारण्य ॥८७॥ ब्रह्मारण्य सेवी साधू तो एकला। जना नाहीं आला उपेगासी ॥ ८८ ॥ उपेगासी येणें जना पूर्णपणें। तयाचीं लक्षणें निरूपीलीं ॥ ८९ ॥ निरूपिलीं येणें लक्षणें जाणावा। साधू वोळखावा मुमुक्षूनें ॥९०॥ मुमुक्षूनें गुरू क्रियाभ्रष्ट केला। तरी अंतरला दोहीं पक्षीं ॥९१ ॥ दोहीं पक्षीं शुद्ध तया ज्ञान बोध। येर तें अबद्ध अनाचार ॥ ९२ ॥ अनाचार करिसा कोण आहे जनीं। परी निरूपणीं बोलिजेतें ॥९३॥ बोलीजे साचार सत्य निरूपणीं। घडे तें करणी सुखें करूं ॥ ९४ ॥ करूं नये कदा मिथ्या निरूपण। करीतां दूषण लागों पाहे ॥ ९५ ॥ पाहें पाहें बापा साधा तें शोधुनी। ठाकेना ह्मणोनी निंदूं नको ॥ ९६ ॥ निंदूं नको शास्त्र निंदूं नको वेद। तरीच स्वानंद पावसील ॥ ९७ ॥ पावसील राम जिवाचा विश्राम। अहंतेचा[1] श्रम सांडितांची ॥९८॥

---

[1] गर्वाचा.

सांडितां विवेकें मिथ्या अभिमान। तरी समाधान पावसील॥९९॥ पावसील गती शुद्ध निरूपणें। रामदास ह्मणे क्षमा करीं॥१००॥

---

## उपदेशशतक.

उपदेशरीती आतां सांगईन। होंई सावधान आलीया रे॥१॥ आलीया रे सांग तूं कोण आहेसी। वेगीं आपणासी ठायीं पाडीं॥२॥ ठायीं पाडीं तुज तूंचि चुकलासी। देहाचा धरीसी अभिमान॥३॥ अभिमान देहीं कोण वाहे याचा। पांचां पंचकांचा स्थूलदेह॥४॥ स्थूलदेह दृश्य याचा तूं जाणता। देह मी ह्मणतां जीवदशा॥५॥ जिवदशा गेली साक्षित्वें वर्ततां। ईश्वर तत्वता याचें नांव॥६॥ नांव रूप देहीं साक्षी तो विदेही। या विवेकीं नाहीं देह-बुद्धि॥७॥ देहबुद्धिभाव या स्थूल देहाचा। उरे संदेहाचा लिंगदेह॥८॥ लिंगदेह मन वासनेची वृत्ती। होतसे निवृत्ती साक्षिरूपें॥९॥ साक्षिरूपें पांच पंचकें राहिलीं। जाणोनी सांडीलीं कर्णादिकें॥१०॥ करण प्राण आणि विषयपंचक। इंद्रियदशक पंचवीस॥११॥ पंचवीस तत्वें या लिंगदेहाचीं।साक्षी वेगळाची अनुभवें॥१२॥ अनुभवें साक्षी स्थूलसूक्ष्माचा। जागृतिस्वप्नांचा जाणता तूं॥१३॥ जाणता तूं कोण सांग वोळखण। नेणती आपण आपणासी॥१४ आपणासी नेणे स्वामीनें सांगावें। अज्ञान जाणावें रूप तुझें॥१५॥ तुझें तूंचि बापा नेणें ह्मणतोसी। तेंचि निश्चयेंसीं रूप तुझें॥१६॥ रूप तुझें तूज दृश्य होत आहे। नेणपण पाहें साक्षिरूप॥१७॥साक्षिरूपें मज कळेना ह्मणसी। तो तूं निश्चयेंसीं वेगळा चि॥१८॥वेगळा चि तींहीं देहां विलक्षण। वर्ततो आपण साक्षिरूपें॥१९॥ साक्षिरूपें सर्व पदार्थ जाणता। तो कांहीं तत्वता आत्मा नव्हे॥२०॥ आत्मा नव्हे जाण जाणे अंतःकरण। नाहीं जाणपण आत्मरूपीं

---

११ करणपंचक, प्राणपंचक, विषयपंचक, इंद्रियदशक.

क्ति । या नांव विभक्ति सत्य जाण ॥ ७० ॥ सत्य जाण मनें आधार घेतला । सुखें सुखावला विषयासी ॥७१॥ विषयाचें सुख चांडूनी अंतरीं । त्याग दुराचारी उच्छेदिती ॥७२॥ उच्छेदिती ऐशी भक्ति सगुणाची । वाट साधनाची मोडतसे ॥७३॥ मोडतो आचार कुळकर्माचार । करी भ्रष्टाकार पापरूपी ॥ ७४ ॥ पापरूपी नर जाणावा साचार । करी एकाकार शब्दज्ञानें ॥ ७५ ॥ शब्दज्ञान गातां अहंतेचा माथा । तेणें तो सर्वथा आवरेना ॥ ७६ ॥ आवरेना तोंडीं धरितां पाषांडी । वेदआज्ञा मोडी तोंडबळें ॥ ७७ ॥ तोंडबळें बापा क्रिया न सांडावी । अशक्ति दंडावी वीतरागें ॥ ७८ ॥ वीतरागें मन मोकळें करावें । सुख न धरावें संसारींचें ॥७९ ॥ संसाराचें सुख नाशवंत आहे । जाइजणें पाहें विचारूनी ॥ ८० ॥ विचारूनि पाहें अशक्ति मनाची । दुर्दशा ज्ञानाची करूं नको॥८१॥ करूं नको मुक्त क्रियेचा निश्चय । तेणें होतो क्षय साधनाचा ॥ ८२ ॥ साधन सोडितां सिद्धपण गेलें। साधनेंचि भलें सिद्धपण ॥ ८३ ॥ सिद्धपण आंगीं आदळों न द्यावें । जाणपण द्यावें सोडूनियां ॥ ८४ ॥ सोडूनी जाणीव जाणोनी नेणता । सिद्धपणें स्वता साधक तो ॥ ८५ ॥ साधक तो आहे ब्रह्मा विष्णु हर । साधनीं तत्पर सर्व काळ ॥ ८६॥ सर्वकाळ त्याग करूनी उदास । योगी ते तापस दिगंबर ॥ ८७ ॥ दिगंबर हरू साधनीं सादरू । त्याहूनियां थोरू जीव काय ॥८८॥ काय ते चुकले उदासीन झाले । त्याहूनि हे भले शब्दज्ञानी ॥८९॥ शब्दज्ञानी भला तोचि तो जाणावा । स्वयें पाळटावा झालेपणें ॥९० ॥ झालेपणें भाव भजावें सगुणा । भक्ति उपासना जप ध्यानीं ॥ ९१ ॥ जप ध्यान मन भोगीं उदासीन । स्वधर्मरक्षण यथाशक्ति ॥ ९२ ॥ शक्तीहूनी वाड ज्ञान बोलूं नये । सोय सांडूं नये सगुणाची ॥ ९३ ॥ सगुणाची सोय सांडूनी एकदा । तीर्थ क्षेत्र सदा

---

१ वैराग्यानें. २ अधिक.

आवडावें ॥ ९४ ॥ आवडावें सदा स्वयें निरूपण । श्रवण मनन निदिध्यास ॥ ९५ ॥ निदिध्यास होय अंतरींचा त्याग । बाह्यें वीतराग उदासीन ॥ ९६ ॥ उदासीनवृत्ति कोठें गुंडाळेना । उपाधि जोडेना बाह्यात्कारीं ॥ ९७ ॥ बाह्यें अभ्यंतरीं त्याग निरंतरीं । वैराग्य यापरी आचरावें ॥ ९८ ॥ आचरावें कर्म ज्याचा जो स्वधर्म आणि नित्यनेम साधनाचा ॥ ९९ ॥ साधनाची वाट वोस पाडूं नये । बोलावी हे सोये निरूपणीं ॥ १०० ॥ निरूपणीं सत्य तेंचि प्रतिष्ठावें । मग आचरावें यथाशक्ति ॥ १०१ ॥ शक्ति सार स्वयें जैसा आचरतो । तेंचि प्रतिष्ठीतो मूढजन ॥ १०२ ॥ मूढजन तरे साधनीं लाविता । पाविजे अनंता भक्तिपंथें ॥ १०३ ॥ भक्तिपंथें जातां होय सायुज्यता । वाक्य हें तत्वता दास ह्मणे ॥ १०४ ॥

## सगुणनिर्गुणसंवादशतक.

करीं चाप बाण महेश्वरीं[1] ठाण । रूप हें सगुण राघवाचें ॥ १ ॥ राघवाचें रूप निर्गुण जाणावें । सगुण स्वभावें नाशवंत ॥ २ ॥ नाशवंत देव कदा ह्मणों नये । निर्गुणासि काये पाहाशील ॥ ३ ॥ पाहातां निर्गुण देवासी दुर्लभ । त्याचा होय लाभ पूर्वपुण्यें ॥ ४ ॥ पूर्वपुण्यें लाभ ब्रह्मादिकां झाला । कैवारी जोडला रामचंद्र ॥ ५ ॥ रामचंद्र नाम रूप हें मायिक । बोलिला विवेक वेदशास्त्रीं ॥ ६ ॥ वेदशास्त्रीं भक्ती राघवाची सार । तेणें पैलपार पाविजेतो ॥ ७ ॥ पाविजेतो पार आत्मनिवेदनें । भक्तीचीं लक्षणें नवविध ॥ ८ ॥ नवविध भक्ति करितां तरले । जीव उद्धरले नेणों किती ॥ ९ ॥ नेणोंनियां देव मायिक भजतां । मुक्ति सायुज्यता अंतरली ॥ १० ॥ अंतरली मुक्ति भक्तिमार्गें धांवे । राघवाचीं नांवें निरंतर ॥ ११ ॥ निरंतर देव अंतरीं न घ्यावा । विवेक पहावा सज्जनाचा ॥ १२ ॥ सज्जनसंगती

[1] शंकराच्या ठायीं.

चुके अधोगती। राम सीतापती ज्याचें नाम ॥ १३ ॥ नाम ज्याचें घ्यावें त्यास ओळखावें। देवासी धुंडावें आदरेंसीं॥१४॥आदरसीं जपे रामनाम वाणी। स्वयें शूळपाणी महादेव ॥ १५ ॥ महादेव गुरुगीता निरूपीली। तेथें मन घालीं आलीया रे ॥१६॥ आलीया संसारीं रामनाम तरी। दुजें पृथ्वीवरी आढळेना ॥ १७ ॥ आढळेना परी संतसंग धरीं। तेणें तूं अंतरीं निवसील ॥१८॥ निवाले अंतर रामासी भजतां। दुजें कांहीं आतां आवडेना ॥ १९ ॥ आवडेना जया संताची संगती। तया अधोगती गर्भवास ॥ २० ॥ गर्भवास माझे राम चुकवील। मज सोडवील अनाथासी ॥ २१ ॥ अनाथाचा नाथ पतितपावन। तया संतजन दाखवीती ॥ २२ ॥ दाखवीती संत वाटे नीचधामीं। माझें मन रामीं विश्वासलें॥ २३ ॥ विश्वासलें परी रामासी नेणवे। तो राम जाणवे संतसंगें ॥ २४ ॥ संतसंगें करीं निःसंग होईजे। मग तो जाणीजे राम केवीं ॥ २५ ॥ रामासी मिळतां संताचे मिळणीं। मग दुजेपणीं उरी नाहीं ॥२६॥ उरी त्या रामाची जन्मोजन्मीं असे। मन हें विश्वासे रामपायीं ॥ २७ ॥ रामपायीं मन होतसे उन्मन। तेथें भिन्नाभिन्न ऐक्यरूप ॥ २८ ॥ ऐक्यरूप ज्ञान तें मज नावडे। गाईन पवाडे राघवाचे ॥ २९ ॥ राघवासी गुण नाहीं तो निर्गुण। ठायीं पडे खूण संतसंगें ॥ ३० ॥ संतसंगतीचा निर्गुण पवाडे। मज वाटे गोड रामकथा ॥ ३१ ॥ कथानिरूपण श्रवण मनन। होय समाधान संतसंगें ॥ ३२ ॥ संतसंगें बोध होय निर्गुणाचा। मांडे सगुणाचा भक्तिभाव ॥ ३३ ॥भक्तिभाव करीं निर्गुण पावावें। मग काय व्हावें सांग बापा ॥ ३४ ॥ बाप माय राम विश्वाचा आधार। भक्ता निरंतर सांभाळीतो ॥ ३५ ॥ सांभाळीतो काय प्रारब्धावेगळें। होणार न टळे ब्रह्मादीकां ॥ ३६ ॥ ब्रह्मादीकां मान्य तो नव्हे सामान्य। असावें

---

१ अधिक.

अनन्य सगुणासी ॥ ३७ ॥ सगुणासी ठाव उरेना कल्पांतीं । ह्मणोनी सांगती संतजन ॥ ३८ ॥ संतजन ज्ञानी पूर्ण समाधानी । तेही जंपध्यानीं सर्वकाळ ॥ ३९ ॥ सर्वकाळ ध्यान करिती सज्जन। परी तें निर्गुण ध्यान त्याचें ॥ ४० ॥ ध्यानीं आकळेना मनासी कळेना। तयासी कल्पना केवीं धरी ॥ ४१ ॥ धरीला विश्वास साधूचे वचनीं। अवस्था उन्मनी तेणें गुणें ॥ ४२ ॥ गुणेंचि निर्गुण कळे सर्व खूण। ह्मणोनि सगुण देव धरीं ॥ ४३ ॥ धरावा सगुण निर्गुणाकारणें। तयाविण येणें चाड नाहीं ॥ ४४ ॥ चाड नाहीं ऐसें कासया ह्मणावें। सगुणें पावावें निर्गुणासी ॥४५॥ निर्गुणासी पावे निर्गुणाकारितां। सगुण पहातां तेथें नाहीं ॥४६॥ नाहीं कां ह्मणसी सद्गुरु सगुण। आणि निरूपण बहुविध॥४७॥बहुविध रूप नव्हे सद्गुरूचें। निर्गुण बा याचें जाण बापा ॥ ४८ ॥ जाण आतां बापा तूं तरी सगुण। झालासी शरण सद्गुरूसी ॥ ४९ ॥ सद्गुरूसी गेला जो कोणी शरण। तयासी सगुण कोण ह्मणे ॥५०॥ ह्मणसील काय सगुणावांचोनी। सर्वही करणी सगुणाची ॥५१॥ सगुणाची नव्हे निर्गुणाची सत्ता। निर्गुण करितां सर्व झालें॥५२॥ सर्व झालें जेव्हां निर्गुणाकरितां। तेव्हां सगुणता निर्गुणाची ॥ ५३ ॥ निर्गुणाची लीला वांझेची कुमारी। बोलतां अंतरीं मानीजेना ॥ ५४॥ मानीजेना तरी सृष्टीस रचीलें। सर्व कोणें केलें तयावीणें ॥ ५५ ॥ तयावीणें दुजें काय सत्य आहे। अनुभवें पाहें आपुलीया ॥ ५६ ॥ आपुला विचार निर्गुणीं सर्वदा। निर्गुणासी कदा विसंबेना ॥ ५७ ॥ विसंबेना घडे सत्संग नसतां। संग विचारीतां सगुण कीं ॥ ५८ ॥ सगुणाचा संग ज्ञानीयासी नाहीं। ज्ञानीया विदेही पुरातन ॥ ५९ ॥ पुरातन देही तरीच विदेही। देहावीण नाहीं विदेहता ॥ ६० ॥ विदेहता बोल स्वभावें लागली। नि-

---

१ जविन्मुक्त.

गुणाची खोली कोण जाणे ॥ ६१ ॥ जाणे सुख दुःख जाणे गुणा- गुण । तयासि निर्गुण बोलवेना ॥ ६२ ॥ बोलवेना परी निर्गुण कळावें । विवेकें मिळावें निर्गुणासी ॥ ६३ ॥ निर्गुणीं सगुणीं मिळ- तां संकट । व्यर्थ खटपट कां करीसी॥६४॥ कां करिसी भक्ती सगु- णा देवाची । तुज निर्गुणाची शुद्धी नाहीं॥६५॥ शुद्धी नाहीं झाली जया आनंदाची । तया विवादाची उरी नाहीं ॥ ६६ ॥ उरी नाहीं कदा निर्गुणीं भजतां । निर्गुण तत्वता सार आहे॥६७॥सार तें सा- कार भक्तीचा निर्धार । भक्ती पूर्वापर सगुणाची ॥६८॥ सगुणाची भक्ती अज्ञानें धरावी । सज्ञानें करावी निर्गुणाची ॥ ६९ ॥ निर्गु- णाची भक्ती या नांव अभक्ती । अव्यक्ताव्यक्ती लावूं नये॥७०॥ लावूं नये भाव सगुण देवासी । व्यर्थ पाषाणासी काय काज ॥ ७१ ॥ काय कारण हा विवेकें पाहीजे । भावार्थ लाहीजे सर्व का- हीं॥७२॥ सर्व कांहीं नाहीं जैसें मृगजळ । वायां खळखळ कां करो- सी॥ ७३ ॥ कां करिसी सर्व देहाचा संबंध । जरी झाला बोध निर्गु- णाचा ॥७४॥ निर्गुणाचा बोध संसार निरसी । तेथें अज्ञानासी रीघ नाहीं ॥ ७५ ॥ रीघ नाहीं जया भावार्थभजनीं । तया हृदयभु- नीं शून्याकार ॥७६॥ शून्याकार होय विवेकवासना । मग समा- धाना काय उणें ॥ ७७ ॥ उणें झालें दूणें निर्गुणाच्या गुणें । अभा- विकां कोणें उद्धरावें ॥७८॥उद्धरावें एका सज्जनसंगती । ऐसें वेद श्रुती बोलताती ॥ ७९ ॥ बोलताती परी नाहीं आठवण । ह्मणोन सगुण आवडेना॥८०॥आवडेना मिथ्या मायीक भजन । असत्या- सी मन विश्वासेना ॥ ८१ ॥ विश्वासेना मन सगुणासी जरी । त- यासी कैवारी देव कैंचा ॥ ८२ ॥ कैंचा देवभक्त कल्पना आपुली । ते सर्व नाथीली ज्ञानीयांसी ॥८३॥ ज्ञानीयांसी देव दुरी अंतरला । संदेहीं पडला अंतकाळीं॥८४॥ अंतकाळ कैंचा अनंत ठायींचा । सं-

१ मिथ्या.

देह देहाची मिथ्याभूत॥८५॥मिथ्याभूत शब्दज्ञानें माया जाणा। अभक्त तरेना मायापूरीं ॥८६॥ मायामोहपूर दूस्तर संसार । अद्वैतविचार जंव नाहीं ॥ ८७ ॥ जंव नाहीं भावें श्रीहरि अर्चीला। तंव नव्हे भला ज्ञानगर्वी ॥ ८८॥ ज्ञानगर्वी नव्हे ज्ञान त्या दुर्लभ। जयाचेनी लाभ स्वरूपाचा॥८९॥स्वरूप रामाचें मनीं आठवावें। नाम उच्चारावें रात्रंदिवस ॥९०॥ दिवसा ना रजनीं मनीं ना उन्मनीं। ज्ञाता जनीं वनीं सारिखाचि ॥ ९१ ॥ सारिखाचि भाव तया भेटे देव। येर सर्व वावं शब्दज्ञान ॥ ९२ ॥ ज्ञानावीण सर्व [1]व्यर्थचि जाणावें। जंव नाहीं ठावें आत्मज्ञान ॥ ९३ ॥ ज्ञाता दाता हरी मनीं दृढ धरी। तोचि यमपुरी चुकवील ॥ ९४॥ चुकवील ज्ञान सर्वही अज्ञान। पावीजे [2]विज्ञानें संतसंगें ॥ ९५ ॥ संतसंगें जरी सगुणीं भजन। स्वधर्मसाधन क्रिया कर्म ॥ ९६ ॥ क्रिया कर्म कैचें ज्ञानीयाचे अंगीं। मुक्त ज्ञानी जगीं विचरती ॥ ९७ ॥ विचारिजे देहीं तों कीजे सर्वही। क्रिया कर्म कांहीं सोडूं नये ॥ ९८ ॥ सोडूं नये भक्ती स्वधर्मविरक्ती। ब्रह्मज्ञानप्राप्ती रामदासीं ॥ ९९ ॥ रामदास ह्मणे रामउपासकां। भक्ती सोडूं नका राघवाची॥१००॥

## वैराग्यपंचक.

॥ १॥ प्रपंच त्यागियेला बुद्धी। जडली परमार्थी उपाधी ॥१॥ मना होईं सावचित्त। त्याग करणें हा उचित ॥ २ ॥ संप्रदाय समुदाव। तेणें जडे अहंभाव ॥ ३ ॥ रामदास ह्मणे नेम। भिक्षा मागणें उत्तम ॥ ४ ॥

॥ २ ॥ प्रपंच केला ताडातोडी। खंडी परमार्थ जेवढी ॥ १ ॥ सावधान होईं जीवा। त्याग केलाचि करावा ॥ २ ॥ काम क्रोध राग द्वेष। अंगीं जडले विशेष ॥ ३ ॥ रामदासें बरें केलें। अवघें जाणोनी त्यागिलें ॥ ४ ॥

---

१ व्यर्थ. २ अनुभवयुक्तज्ञान.

॥ ३ ॥ कोण कैंचा भिकारी । भीक मागे दारोदारीं ॥ १ ॥ ऐसें ह्मणती तेथें जावें । सुखें वैराग्य करावें ॥ २ ॥ आहे ब्राह्मण विदेशी । नाहीं ठाऊक आह्मांशी ॥ ३ ॥ रामीरामदास ह्मणे । कोण आहे कोण जाणे ॥ ४ ॥

॥ ४ ॥ नको वोळखीचे जन । अंगीं वाजे अभिमान ॥ १ ॥ आतां तेथें जावें मना । जेथें कोणी वोळखीना ॥ २ ॥ लोक ह्मणती कोण काये । पुसों जातां सांगों नये ॥ ३ ॥ रामदास ह्मणे पाहीं । तेथें कांहीं चिंता नाहीं ॥ ४ ॥

॥ ५ ॥ देह जावो अथवा राहो । रामें फेडिला संदेहो ॥ १ ॥ रामालागी देसवटा । संसाराच्या बारा वाटा ॥ २ ॥ जीवलग आदि अंतीं । एक रामाची संगती ॥ ३ ॥ रामदासीं रामरावो । नाहीं आणीक उपावो ॥ ४ ॥

॥ ६ ॥ सांजे वोसरतां सात । वांया करावा आकांत ॥ १ ॥ तैसीं सर्वां जीवलगें । जाती एकामेकां मागें ॥ २ ॥ चार दिवस यात्रा भरे । सर्वेंचि मागुती वोसरे ॥ ३ ॥ पूर्ण होतां महोत्सावो । फुटे अवघा समुदावो ॥ ४ ॥ बहुत वराडी मिळाले । जैसे आले तैसे गेले ॥ ५ ॥ एक येती एक जाती । नाना कौतुक पाहाती ॥ ६ ॥

॥ श्लोक ॥ ऋणें द्यावया घ्यावया जन्मताती । पुरें काम होतां अकस्मात जाती । कळेना जना मोहिलें कामलोभें । ढळेना मना अंतरीं कर्मक्षोभें ॥ १ ॥

॥ ७ ॥ बंधु बहिणी माता पिता । कन्या पुत्र आणी कांता ॥ १ ॥ ऋणानुबंधाचें[१] कारण । वायां शोक निष्कारण ॥ २ ॥ एक बहुत काळ जिती । एक वेळे वरी जाती ॥ ३ ॥ बहु साल दासदासी । नाना पशु गाई महिषी ॥ ४ ॥ धनधान्याचें संचित । कांहीं होत कांहीं जात ॥ ५ ॥ रामीरामदास ह्मणे । संसारासी येणें जाणें ॥ ६ ॥

---

१ पूर्वजन्मांतील देण्याघेण्याच्या संबंधानें.

॥ श्लोक ॥ जिवलग जग मानी जागतां अंतरंगें । अचपळ अळसिंध मोड नाहीं तरंगें । विपरित रतरंगें शीणसी कां त्रिरंगें । अकळ निखळ भासे सज्जनाचेनि संगें ॥ १ ॥

॥ ८ ॥ कोणी पुत्र कामा नये । मित्र करी तो उपाये ॥ १ ॥ कैंचें आपुलें परावें । अवघें ऋणानुबंधें घ्यावें ॥ २ ॥ जीवलग जीव घेती । यासी परावीं रक्षिती ॥ ३ ॥ जीवलगाचिये परी । मातेहुनी लोभ करी ॥ ४ ॥ आहे कोण जाणे कैंचे । आहे जिवलग जीवींचे ॥ ५ ॥ रामीरामदास ह्मणे । नकळे देवाचें करणें ॥ ६ ॥

॥ ९ ॥ जे जे संसारासी आले । ते ते तितुकेहि एकले ॥ १ ॥ वायां आपुलीं मानिलीं । शेखीं दुरी दूरावलीं ॥ २ ॥ शेखीं सांडूनियां देशीं । मृत्यु पावला विदेशीं ॥ ३ ॥ खाती व्याघ्र आणि लांडगे । तेथें कैंचीं जीवलगें ॥ ४ ॥ घरीं वाट पाहे राणी । आपण मेला समरंगणीं ॥ ५ ॥ दास ह्मणे रामा विणें । अवघीं जाणावीं पिशुनें ॥ ६ ॥

॥ १० ॥ देह बहुतांचें खाजें । मूर्ख ह्मणे माझें माझें ॥ १ ॥ विंचू विखार अजगर । नाना श्वापदें अपार ॥ २ ॥ नाना पक्षी गीध काक । श्वान मार्जार जंबुक ॥ ३ ॥ [१]लाव लासी भूत खेत । सांगों जातां असंख्यात ॥ ४ ॥ किती सांगों वारंवार । जीव जीवाचा आहार ॥ ५ ॥ ह्मणे रामीरामदास । कैंचा देहाचा विश्वास ॥ ६ ॥

॥ ११ ॥ घात करूनी आपुला । काय रडसी पुढिला ॥ १ ॥ बहुत मोलाचें आयुष्य । विषयलोभें केला नाश ॥ २ ॥ नाहीं वोळखिलें सत्या । तेणें केली आत्महत्या ॥ ३ ॥ नर-देहाची संगती । गेली गेली हातोहातीं ॥ ४ ॥ नाहीं देहाचा भरवसा । गेली गेली रे वयसा ॥ ५ ॥ रामीरामदास ह्मणे । भुलूं नको मूर्खपणें ॥ ६ ॥

॥ १२ ॥ कोणें कोणासी रडावें । एकामागें एकें जावें ॥ १ ॥ एक वेळ गेली माता । एक वेळ गेला पिता ॥ २ ॥ द्रव्य दारा जाती

---

१ अत्यंत.

पुत्र । जीवलगें आणि मित्र ॥ ३ ॥ प्राणी संसारासी आला । तितुका मृत्युपंथें गेला ॥ ४ ॥ पूर्वज गेले देवापासीं । तेचि वाट आपणासीं ॥ ५ ॥ रामदास ह्मणे लोक । करी गेलियांचा शोक ॥ ६ ॥

॥ १३ ॥ ज्याचें होतें तेणें नेलें । येथें तुझें काय गेलें ॥ १ ॥ वेगीं होई सावधान । करीं देवाचें भजन ॥ २ ॥ गती नकळे होणाराची । होत इच्छा भगवंताची ॥ ३ ॥ पूर्व-संचिताचें फळ । येती दुःखाचे हळाळ ॥ ४ ॥ पूर्वी केलें जें संचित । तें तें भोगावें निश्चित ॥ ५ ॥ दास ह्मणे पूर्वरेखा । प्राप्त न कळे ब्रह्मादिकां ॥ ६ ॥

॥ १४ ॥ वाटे संसार दुस्तर । येती दुःखाचे डोंगर ॥ १ ॥ तरी श्रवण करावें । तेणें दुःख विसरावें ॥ २ ॥ पुढें काय करूं आतां । वाटे संसाराची चिंता ॥ ३ ॥ येतां उभें उघरेनां । मायाजाळ आवरेना ॥ ४ ॥ दुरी जाउनी विवेक । आगीं आदळतो शोक ॥ ५ ॥ रामीरामदास ह्मणे । दुःख जीवें उघरणें ॥ ६ ॥

॥ १५ ॥ काम क्रोध मद मत्सर । जरि जाले अनावार ॥ १ ॥ त्यांसि करावें साधन । सदा श्रवण मनन ॥ २ ॥ बोला ऐसें चाळवेना । जीवभ्रांती हालवेना ॥ ३ ॥ दुष्ट लौकिक सांडेना । ज्ञान विवेक मांडेना ॥ ४ ॥ पोटीं विकल्प सुटेना । नष्ट संदेह तुटेना ॥ ५ ॥ दास ह्मणे निर्बुजलें । मन संसारीं बुडालें ॥ ६ ॥

## संशयपंचक

॥ १ ॥ गेलों काशी विश्वेश्वरा । सेतुबंध रामेश्वरा ॥ १ ॥ तरी संशय तुटेना । पूर्व गुण पालटेना ॥ २ ॥ भागीरथी गोदावरी । केली कृष्णा आणि कावेरी ॥ ३ ॥ राम अयोध्येचा पती । केली कृष्णद्वारावती ॥ ४ ॥ बदरी ओढ्याजगन्नाथ । केला स्वामी त्रिमल्लनाथ ॥ ५ ॥ मातापुर तुळजापुर । सप्तशृंगी कोल्हापुर ॥ ६ ॥ केली पंढ-

१ उमाळे. २ ओघ. ३ वोसरेना. ४ श्रमलें.

ो नरहरी । शंभु पाहिला शीखरीं ॥७॥ मोरेश्वर मुळ्यां ...
ुखी हरिहरेश्वर ॥ ८ ॥ सिद्ध मैराळ मारुती । देवें केले नेणों किती
। ९ ॥ बारा लिंगें या वेगळीं । तीर्थें केलीं भूमंडळीं ॥ १० ॥ राम-
ास ह्मणे भावें । आपलें मन पालटावें ॥ ११ ॥

॥ २ ॥ तेणें संशयो तूटती । पूर्व गुण पालटती ॥ १॥ एक उपा-
सना धरीं । भक्ति भावें त्यासी करीं ॥ २ ॥ सर्व नश्वर जाणून । वृ-
त्ति करीं उदासीन ॥ ३ ॥ सत्य वस्तू सारासार । याचा करावा वि-
चार ॥ ४ ॥ त्यागूनियां अनर्गळ । सदा असावें निर्मळ ॥ ५ ॥ ध्यानें
आवरावें मन । आणि इंद्रिय-दमन ॥ ६ ॥ अखंड वाचे रामनाम ।
स्नान संध्या नित्य-कर्म ॥ ७ ॥ दास ह्मणे सर्व गाव । जेथें भाव तेथें
देव ॥ ८ ॥

॥३॥ आतां कोठें धरूं भाव । बहुसाळ जाले देव ॥ १॥ मुख्य पूजा-
पारंपार[1] । एकाहूनी एक थोर ॥ २ ॥ माझे कुळींचीं दैवतें । सांगों
जातां असंख्यातें ॥ ३॥ राम कृष्ण महादेव । बनशंकरी खंडेराव ॥४
माता सटवाई आपण । स्वामी लक्ष्मीरमण ॥ ५ ॥ वीर बैसवी
देव्हारा । माझी माता एकवीरा ॥ ६ ॥ माया राणी पांडुरंग । मुंजा
नरसिंह झोटिंग ॥ ७ ॥ महालक्ष्मी रवळिया । कुळदैवत मोरया
॥ ८ ॥ मातापुरीची येमाई । सप्तशृंगी चंडाबाई ॥९॥ तुळजापुरींची
तुकाई । घाटमाथाची नवलाई ॥ १० ॥ हडपाणी जोगेश्वरी । माता
कामाक्षी कावेरी ॥ ११ ॥ मेसकाबाई नारायण । आग्या वेताळ कार-
ण ॥ १२ ॥ मुंजा जोगिणी मांगिणी । बहुसाळ मानविणी ॥ १३ ॥
सात पांच रंगनाथ । व्यंकटेश वैजनाथ ॥ १४॥ धोपेश्वर कोपेश्वर ।
सिद्धेश्वर सोमेश्वर ॥ १५॥ अन्नपूर्णा शालिग्राम । हयग्रीव मेघश्याम
॥ १६॥ परशुराम कोटेश्वर । नानाशक्ती परमेश्वर ॥ १७॥ ह्मंकावती
भोगावती । आमुच्या देव्हारां बैसती ॥ १८॥ राणादेवी नारायण ।

---

1 पूजेची परंपरा.

ह्मैसासुर मल्लिकार्जुन॥१९॥अग्निसारिखें दैवत। आणि मुख्य प्राणनाथ ॥ २० ॥ देव तांबडे अनेक। बहुसाळ केला टाक॥ २१ ॥ लांबे देव ते नर्मदे। देव दाटले तुमधे ॥२२॥ सोमकांत सूर्यकांत। नाग आणि चक्रांकित ॥ २३ ॥ औट मृत्तिकापूजन। नाना देवांचें भजन ॥ २४ ॥ डाउ पूजावे अनंत। गौरी आणि कपोईत ॥ २५ ॥ रामदासीं देव एक। येर सर्वही मायिक ॥ २६ ॥

॥ ४ ॥ भाव धरीं संतां पायीं। तेणें देव पडे ठायीं ॥१॥ नाना देवांचें भजन। तेणें नोहे समाधान ॥२ ॥ सकळ देवांमध्यें सार। आहे अनंत अपार ॥ ३ ॥ रामीरामदास ह्मणे। अवघे देव केले जेणें ४

॥ ५ ॥ आतां कोणा शरण जावें। सत्य कोणाचें मानावें ॥ १॥ नाना पंथ नाना मतें। भूमंडळीं असंख्यातें ॥ २ ॥ जपी तपी नाना हटी। मंत्रावळी लक्ष कोटी ॥ ३॥ एक मुद्रा जे लाविती। एक आसन घालिती ॥४॥ एक दाविती देखणी। एक अनुहात[1] ध्वनी ॥ ५॥ एक नासाग्रीं लक्षिती। एक हृदयीं दावीती ॥ ६॥ पिंडज्ञानी तत्त्वज्ञानी। योगाभ्यासी ब्रह्मज्ञानी ॥ ७ ॥ पंचाक्षरी धूम्रपानी। गोरांजनी[2] उपोषणी ॥८॥ दुग्धाहारी निराहारी। फळा-हारी पर्णाहारी ॥ ९ ॥ एक ओषधि-प्रयोग। एक देती धातुयोग ॥१० ॥ एक विभूती लाविती। एका प्रिय-द्वारावती॥११॥ दंडधारी जटाधारी। एक बाळब्रह्मचारी ॥ १२ ॥ मौनी नग्न दिगंबर। पंचाक्षरी योगेश्वर ॥१३॥ एक जोसी आणि वैदिक। एक पंडित पौराणिक॥१४ साधु संत मुनीश्वर। ऋषीश्वर कवीश्वर ॥ १५ ॥ गाती हरिदास बागडे। नृत्य करिती देवापुढें॥१६॥ एक ह्मणती अवघें वाव। एक ह्मणती अवघे देव॥१७॥ एक कळोंचि नेदिती। एक दाटूनी सांगती ॥ १८ ॥ एक कर्मी तत्पर। एक कर्मीं अनादर॥ १९ ॥ एक मानिती सगुण। एक ह्मणती पाषाण ॥ २० ॥ एकें केला सर्व त्याग।

---

१ योग्यांना ऐकूं येणारा एक नाद. २ जाळून घेणें.

एक ह्मणती राजयोग ॥ २१ ॥ रामदास सांगे खूण । भक्तिवीणें सर्व शीण ॥ २२ ॥

॥ ६ ॥ शरण जावें सत-जनां । सत्य मानावें निर्गुणा ॥ १॥ नानामतीं काय चाड । करणें सत्याचा निवाड ॥ २ ॥ ज्ञानेभक्तीसीं शिणावें । भक्त तयासीं ह्मणावें ॥ ३ ॥ रामीरामदास सांगे । सर्वकाळ संतसंग ॥ ४ ॥

॥ ७ ॥ संत कैसेनी जाणावे । साधु कैसे वोळखावे ॥ १ ॥ बहुत गोसावी असती । भले अवघेचि दीसती ॥ २ ॥ एक संसारीं गुंतले । एकें वेष पालटिले ॥ ३ ॥ रामीरामदास ह्मणे । कैसीं संतांचीं लक्षणें ॥ ४ ॥

॥ ८ ॥ तेचि जाणावे सज्जन । जयां शुद्ध ब्रह्म ज्ञान ॥१॥ जंववरि देहाची संगती । तंववरी सगुणीं भजती ॥ २ ॥ जाणोनियां सारासार । सदा श्रवणीं तत्पर ॥ ३ ॥ बाह्यत्याग संपादणें । अर्थत्याग निरूपणें ॥ ४॥ कर्म करीती आवडी । फळाशांची नाहीं गोडी ॥५॥ शांति क्षमा आणि दया । सर्व सख्यें मानी जया॥६॥ हरिकथानिरूपणें । सदा श्रवण मननें ॥ ७॥ बोलासारिखें चालणें । हींच संतांचीं लक्षणें ॥८॥ एकनिष्ठ उपासना । अति तत्पर भजना ॥ ९ ॥ स्वार्थ सांडूनीयां देणें । नित्य तेंचि संपादणें ॥ १० ॥ ह्मणे रामीरामदास । जया नाहीं आशापाश ॥ ११ ॥



## विवेकपंचक.

॥ १ ॥ एक देव आहे खरा । माया नांथिला पसारा ॥ १ ॥ हेंचि विचारें जाणावें । ज्ञाता तयासि ह्मणावें ॥ २ ॥ साच ह्मणों तरि न दिसे । मिथ्या ह्मणों तरी अभासे॥३॥पाहों जातां आकारलें । मुळीं कांहीं नाहीं झालें ॥ ४ ॥ कैसा देहीं देहातीत । कैसा अनंताचा अंत

१ मिथ्या.

॥ ५ ॥ रामदासाचें बोलणें । स्वप्नामाजी जाई जिणें ॥ ६ ॥

॥ २ ॥ पूर्वीं पाहतां मी कोण । धुंडुं आपणा आपण ॥१॥ स्वं आपुला उगवं । जाणे तोचि महानुभाव ॥ २ ॥ कोण धर्म आचरलों । कैसा संसाराशी आलों॥३॥आले वाटे जो मुरडे । देव तयासी सांपडे ॥ ४ ॥ आली वाट ती कवण । मायेचें जें अधिष्ठान ॥ ५ ॥ रामदासाची उपमा । ग्राम नाहीं कैंची सीमा ॥ ६ ॥

॥ ३ ॥ पांचां लक्षणीं पुरता । धन्य धन्य तोचि ज्ञाता ॥ १ ॥ राखे गुरुपरंपरा । देव सगुण दुसरा ॥ २ ॥ विवेक वैराग्य सोडीना । कर्ममर्यादा तोडीना ॥ ३ ॥ बाहेर बोले शब्द-ज्ञान । आंत निष्ठा समाधान॥४॥रामीरामदास ह्मणे कवी । न्यायनीतीनें शिकवी ॥४॥

॥४॥ अंतर्यामीं ब्रह्मज्ञान । बाह्य सगुण भजन॥१॥धन्य धन्य तेंचि ज्ञान । अंतरीं नाहीं विसमानें ॥ २ ॥ निरूपणें अंतरत्याग । बाह्य संपादी वैराग्य ॥ ३ ॥ रामीरामदास ह्मणे । ज्ञान स्वधर्म लक्षणें ॥ ४ ॥

॥ ५ ॥ शुद्ध सोनें आणि सुवास । जडित रत्नांचा प्रकाश ॥ १॥ मग जाली तैशी परी । त्याची संख्या कोण करी ॥ २ ॥ कल्पतरु राजांगणीं । त्यासी आहे चिंतामणी ॥३॥ रामदासी नवल गोष्टी । रम्य शारदेशी भेटी ॥ ४ ॥

॥६॥ कौल झाला रघुनाथाचा । मेळा मिळाला भक्तांचा॥१॥अहंभाव वरपे करी । बळेंचि घातला बाहेरी ॥ २॥ क्षेत्रीं विवेक मित्र झाला । क्रोध देशो-धडी केला ॥ ३ ॥ काम देहींच कोंडला । मद मत्सर पीडिला ॥४॥ लोभ दंभ नागविला । अहंकार बुडवीला॥५॥ कुतर्क मीपण पळालें । उभेंच अज्ञान गळालें ॥ ६ ॥ फितुरीकर होता भेद । त्याचा केला शिरच्छेद ॥ ७ ॥ तिरस्कार दावेदार । त्यास बोधें केला मार ॥ ८ ॥ मन चोरटें धरिलें । नित्य नेमें जर्जरीलें॥९॥

---

१ उत्पत्ति. २ विश्रान्ति.

आळस साक्षेपें घेतला ॥ पायीं धरुनी आपटीला॥१०॥ दुश्चितपण अकस्मात। निरूपणीं केला घात ॥ ११ ॥ कपट-मैंद सांपडलें। उभें सर्वांगीं तोडिलें ॥ १२ ॥ बंड पाषांड तूटिलें। बळेंचि थोथांड कूटिलें ॥ १३ ॥ द्वेष बांधोनी पाडिला। खेद खाणोनी पाडिला॥१४॥ गर्व ताठा विटंबिला। वाद विवेकें सोडिला ॥ १५ ॥ जेणें भावार्थ उडविला। धरुनि विकल्प उडविला ॥ १६ ॥ करुमि अभावाचा दास। राहे रामीरामदास ॥ १७ ॥

---

क्षोभपंचक.

॥ १ ॥ करितां सांभाळ आपुला। दुःखें जीव भांबावला ॥ १ ॥ पाहों जातां सारासार। कांहीं कळेना विचार ॥ २ ॥ लोभें वृत्ती लांचावली। क्षोभवृत्ती हे भागली ॥३॥ रामदास ह्मणे देवा। कोण उपाय करावा ॥ ४ ॥

॥ २ ॥ संग स्वार्थाचा धरिला। तेणें काम खवळिला ॥१ ॥ थोर पाप हें मातलें। तेणें अव्हाट घातलें ॥२॥ कामामागें आला क्रोध। क्रोधें केला बहू खेद ॥ ३ ॥ लोभ दंभाचें कारण। मोहें केलें विस्मरण ॥ ४ ॥ कामीं लाचावलें मन। झालें बुद्धीचें पतन ॥ ५ ॥ दास ह्मणे हें सकळ। अवघें ज्ञानाचें हें मूळ ॥ ६ ॥

॥ ३ ॥ गेला प्रपंच हातींचा। लाभ नाहीं परमार्थाचा॥१॥ दोहीं कडे अंतरलों। थोरपणें भांबावलों ॥ २ ॥ गेली अवघी निस्पृहता। नाहीं स्वार्थही पूरता ॥ ३ ॥ क्रोध गेला संतसंगें। लोभ जाला विरंग ॥ ४ ॥ पूर्ण झाली नाहीं आस। इकडे बुडाला अभ्यास ॥ ५ ॥ दास ह्मणे क्रोधें केलें। अवघें लाजिरवाणें जालें ॥ ६ ॥

॥ ४ ॥ उगमीं विष कालवलें। तेंचि प्रवाहीं पडलें ॥१॥ आतां कोणेकडे जावें। कोण्या प्रकारें असावें ॥ २ ॥ होता भूपणाचा ठावो। तेथें जाला अहंभावो ॥ ३ ॥ मूळ अंतरीं नावडे। जहालें अव-

घेंचि वावडें ॥ ४ ॥ छाया शांतीची नावडे । क्रोध-वणवा आवडे ॥ ५ ॥ रामदास ह्मणे जल्प । झाला अंतरीं विकल्प ॥ ६ ॥

॥ ५ ॥ ओढवलें पूर्वपाप । नाना प्रकारीं संताप ॥ १ ॥ तेणें शुद्धीचि उडाली । नीति अनीति बुडाली ॥ २ ॥ केली क्रिया ते कळेना । मन विवेका वळेना ॥ ३ ॥ भरी भरलें असे मन । अवघें त-ऱ्हेचें कारण ॥ ४ ॥ सोय विकल्पाची खाण । देहबुद्धि घेती रान ॥ ५ ॥ रामीरामदास ह्मणे । अवघीं जालीं कुलक्षणें ॥ ६ ॥

॥ ६ ॥ संन्यासाचें लक्षण । अवघें झालें कुलक्षण ॥ १ ॥ जन कोणीच नावडे । पापी विकल्पें वावडे ॥ २ ॥ अवा सवाची बडबडी । होऊं पाहे देशोधडी ॥ ३ ॥ प्राणी क्रोधें पिसाळले । त्यांस कोण ह्मणे भले ॥ ४ ॥ मना आलें तें करावें । बळेंचि अव्हाटीं भरावें ॥ ५ ॥ रामदास ह्मणे खरें । ज्याचें त्यासी वाटे बरें ॥ ६ ॥

॥ ७ ॥ अधिक बोलोंचि नेदिती । धरुनि जीभचि कापिती ॥ १ ॥ तेथें चालेना कीं वाटा । पोटासाठीं देशवटा ॥ २ ॥ हात पाय ते कापिती । कर्ण नासिक छेदिती ॥ ३ ॥ शिर छेदूनी सांडीती । कित्येकांसी फांसीं देती ॥ ४ ॥ नानाप्रकारीं वासना । अवघी श्रुत आहे जना ॥ ५ ॥ दास ह्मणे सेवाचोर । साहेबाचे हरामखोर ॥ ६ ॥

---

## नीतिपंचक.

॥ १ ॥ काम-क्रोध खवळला । तेणें सन्निपात झाला ॥ १ ॥ यासि औषध करावें । पोटीं वैराग्य धरावें ॥ २ ॥ कुपथ्य अवज्ञेचें झालें । मग तें पुढें उफाळलें ॥ ३ ॥ मर्यादेनें निर्बुजलें । वारें अभिमानें घेतलें ॥ ४ ॥ दडपणाचा घाम आला । प्रणी उठोनी पळाला ॥ ५ ॥ रामदास सांगे भलें । लोक ह्मणती पिसाळलें ॥ ६ ॥

॥ २ ॥ झालें होऊनीयां गेलें । आतां कैसें होय भलें ॥ १ ॥ या-

१ फिरे.

सि सांगतों साधन। जेणें होयें समाधान॥ २॥ दिवसेंदिवस व्यथा सरे। अंगीं आरोग्यता भरे॥ ३॥ अनुताप दुःख गेलें। कांहीं किंचित उरलें॥ ४॥ व्यथा हरली निःशेष। अल्पमात्र उरला शेष॥ ५॥ दास ह्मणे जन्मवरी। पुढें विकार नानापरी॥ ६॥

॥ ३॥ मर्यादेचे वाटे जावें। अनीति अव्हाट त्यजावें॥ १॥ इकडे राम आहे खरा। तिकडे गुरुपरंपरा॥ २॥ एकीकडे आहे सण। एकीकडे ते सज्जन॥३॥ पुढें विवेकें वर्तावें। मागें मूळ सांभाळावें॥ ४॥ उदंड झाला समुदाय। तरी अभि साडूं नये॥५॥ रामीरामदास ह्मणे। जगीं मान्य तें बोलणें॥ ६॥

॥ ४॥ अभक्तांसी निंदी जन। गुरुद्रोहीया सज्जन॥१॥ या कारणें वाटे जावें। लागे अवघें चि रक्षावें॥ २॥ सगुण भजतां ज्ञान मोडे। ज्ञानें सगुण अवघें उडे॥ ३॥ कर्म होतसे उपायें। कर्मठपण कामा नये॥४॥ शब्दें होय समाधान। कामा नये शब्द-ज्ञान॥५॥ रामीरामदास ह्मणे। किती सांगों मी लक्षणें॥ ६॥

॥ ५॥ धारितां देवासी अभाव। तोंडघशी पाडी देव॥ १॥ या कारणें वाटे जावें। लागे अवघेंचि रक्षावें॥२॥ आहे देवासी उपायें। गुरु-क्षोभ कामा नये॥ ३॥ होतां क्रिया अनर्गळ। त्यासि निंदिती सकळ॥ ४॥ सर्व वैराग्य त्यागितां। अंगीं वाजे [१]लोलंगता॥५॥ रामीरामदास ह्मणे। सर्व नीति हे करणें॥ ६॥



जेकोडेपंचक.

॥ १॥ संतावीसी तेरावें। त्याचें श्रीमुख बरवें॥ १॥ पांचां अक्षरीं उच्चार। त्यासी माझा नमस्कार॥ २॥ रत्नसंख्या अभ्यंतरीं। सर्वकाळ त्या सुंदरी॥ ३॥ इंद्र आसनाचें आयेन। रामदासें केलें ध्यान॥ ४॥

१ लंपटपणा.

॥ २ ॥ पल्वगमी अव्हेरीलें। जेणें तपासी निर्मीलें ॥ १ ॥ त्याच्या नामा ऐसें करा। तेणें भवसिंधू तरा ॥ २॥ दिनकरनामें जें निवडीलें। पतन मज सीध केलें॥ ३॥रामदास ह्मणे भावें। संतावीसीं तेविसावें॥ ४ ॥

॥३॥ बारांमाजि एकादशी। जन्म जहाला जयासी ॥१॥ तया नामीं एकाक्षर। गाळुनियां निरंतर ॥ २ ॥ बाळपीसे आणी मूर्ख। त्रिवर्गासीं परम सुख ॥ ३ ॥ रामीरामदास ह्मणे कळी। माजी पुजा भूमंडळीं ॥ ४ ॥

॥ ४ ॥ सार मुक्ताचा उगम। तेथें त्याचा पराक्रम॥ १ ॥ चंद्रउपमा तयाचें। आर्धजनीं च रक्षाचे ॥२॥ जया आकाशासी नाहीं। तेथें उद्भवलें सर्वही ॥ ३ ॥ तृप्ति जाहाली आश्रमा। त्यासी जयाची उपमा॥ ४ ॥ दास ह्मणे त्याचें। नाम दोहींच्या नामाचें ॥ ५ ॥

॥ ५ ॥ सत्यामाजी जे दुसरा। त्यासी होये एकोदरा ॥१॥ तिचा कांत केला शाम। धरा त्याचा नित्यनेम ॥ २ ॥ कलहप्रिया भंगनी। तिच्या पीत्याची जननी ॥३ ॥ रामदास ह्मणे कळी। माजी पूजा भूमंडळीं ॥ ४ ॥

॥ ६ ॥ साटी माजी जो दशमु। त्याच्या पित्याचा आश्रमु १॥ पीत्या पुत्राच्या आश्रमा। गेली कोण्हाची महीमा ॥२॥ भारामधें गेलें मास। तीतुकें आननें जयास ॥ ३ ॥ ह्मणे रामीरामदास। उभयांसी एकादश ॥ ४ ॥

---

## उडवणीपंचक.

॥ १ ॥ गुरु मरता शिष्य रडता। वीपरीत दोघांची ही कर्ता ॥ १ ॥ ऐसे शिष्य ज्ञानें मूढ। तयां बोध नाहीं दृढ ॥ २॥ गुरूसी गुरु ह्मणतां पणाचा ताठा। शिष्य रितेपणाचा फांटा॥ ३ ॥ रा-

---

१ मुखें.

मीरामदास ह्मणे । व्यर्थ गेलें त्याचें जीणें ॥ ४ ॥

॥ २ ॥ गुरु ह्मणे कांहीं देव । शिष्य ह्मणे मंत्रयव ॥ १ ॥ करावया शिष्यार्चन । पोसणें जालें ब्रह्मज्ञान ॥ २॥ गुरु दाटुनि दे उपदेश । अनाचार करी शिष्य ॥ ३ ॥ रामीरामदास ह्मणे । धिगधिग जळो त्याचें जीणें ॥ ४ ॥

॥ ३ ॥ ऐसा कैसा रे परमार्थ । जळो जळो जिणें व्यर्थ ॥ १ ॥ युक्त आहार करवेना । निद्रा आली धरवेना ॥ २ ॥ रसाळ गाणें कीं नाचणें । तेथें सावधान होणें ॥ ३॥ सर्वकाळ करणें रळी । दास्यविनोद टवाळी । श्रवणीं आवरेना क्रोध । सिद्ध असतां बोध ॥ ४ ॥ देहपांग[1] पडला गळां । ह्मणे मी चौदेहां वेगळा॥५॥ मन चळ आवरेना । निचलतर साहेना ॥ ६ ॥ रामदास ह्मणे भावें । स्थूळ क्रियेसी न जावें ॥ ७ ॥

॥ ४ ॥ गुरु शब्दज्ञान कावाडी । सीत तयाचा वराडी ॥ १ ॥ हा तो मांडला विनोद । क्रिये विण शब्दबोध ॥ २ ॥ गुरु आज्ञा धरुनि बोले । शिष्य परपांगानें डोले ॥ ३ ॥ कांहीं देतां अन्नदावें । रितें येतां कुसमुसावें॥४॥ गुरु रागें फिरवी डोळे । शिष्य त्यावरी चौताळे ॥ ५ ॥ शिष्य विषयी बापुडें । गुरु आस करी वेडें ॥ ६ ॥ आस सुटेना दोघांला । तारांबळी परमार्थाला ॥ ७ ॥ रामीरामदास ह्मणे । इतुकें लोभाचे कारणें ॥ ८ ॥

॥ ६ ॥ थोर अंतरीं भडका । आला क्रोधाचा कडका ॥ १ ॥ नित्य नीरूपणीं बैसे । अवगुण जैसे तैसे ॥ २ ॥ लोभें भांबावलें मन । रुक्यासाटीं वेंची प्राण ॥ ३ ॥ दंभ विशेष वाढला । पोटीं काम खवळला ॥ ४ ॥ मदमत्सराचा फांटा । अहंकार धरी ताठा ॥५॥ दास ह्मणे जालें काये । श्रोतीं राग मानूं नये ॥ ६॥

॥ ७ ॥ जोपा केली इक्षूदंड । तेंची जीवन येरंड ॥ १ ॥ संतसंग

[1] देहरक्षण.

लाथलीया । कोण बोध कोण माया ॥ २ ॥ जीवनाचें मुक्त फळ । ठ्याळा मुखीं हळाहळ ॥ ३ ॥ रामदासीं रामराव । नाहीं आणीक उपाव ॥ ४ ॥

---

## शिकवणपंचक.

॥ १ ॥ काम क्रोध आवरावा । मद मत्सर लुटावा ॥ १ ॥ सांडोनीयां कुलक्षणें । शुद्ध धरावीं लक्षणें ॥ २ ॥ लोभदंभांसी लुटावें । मीपणासी आटोपावें ॥ ३ ॥ विवेक वैराग्य विश्वास । धरा ह्मणे रामदास ॥ ४ ॥

॥ २ ॥ हो कां मुमुक्षु अथवा मुक्त । आहे विषयाचा सांगात ॥ १ विवेक वैराग्य-संग्रहो । करणें लागे यावद्देहो ॥ २ ॥ रामीं रामदास ह्मणे । शांति ज्याच्या दृढपणें ॥ ३ ॥

॥ ३ ॥ मना तूंचि शिकविसी । शेखीं तूंचि नायकसी ॥ १ ॥ काय सूचीसी पाहेरा । शरण जावें रघुवीरा ॥ २ ॥ कांति साचाचीये परी । करिसी शब्द भरोभरी ॥ ३ ॥ रामीरामदास ह्मणे । जळो बहिर्मुखाचें जीणें ॥ ४ ॥

॥ ४ ॥ खांडी वाउगीच वाळी । एक रामनामावळी ॥ १ ॥ प्रेम सोडी देह-बुद्धी । मांडी श्रवणीं समाधी ॥ २ ॥ रामीरामदास ह्मणे । अकस्मात लागे जाणें ॥ ३ ॥

॥ ५ ॥ ईश्वरासीं कानकोंडें । अंतीं जाइल कोण्या तोंडें ॥ १ ॥ लाजे हरीच्या रंगणीं । जावयासी लोटांगणीं ॥ २ ॥ धर्म न करी दुराचारी । नागविले राजद्वारीं ॥ ३ ॥ ना दे फुटका कवडा । चोरें घातला दरवडा ॥ ४ ॥ ह्मणे रामीरामदास । प्राणी नागवला सुखास

---

१ टाकी. २ बहिरा.

## भ्रमपंचक.

॥ १ ॥ पूर्व भूमिका सोडिली । जीव झाला दिशा भूली ॥ १ ॥ ऐसें भ्रमाचें लक्षण । भुले आपणा आपण ॥२॥ द्रव्य आपण ठेविलें त्याचें तयासी चुकलें ॥ ३ ॥ रामदास ह्मणे घरीं । वाट चूकले आंधारीं ॥४ ॥

॥ २ ॥ जाला स्वरूपीं निश्चय । तरी कां वाटतसे भय ॥ १ ॥ ऐसें भ्रमाचें लक्षण । भुले आपणा आपण ॥ २ ॥ क्षण एक निराभास । क्षण एक मी माणूस ॥३॥ रामीरामदास ह्मणे । देहबुद्धीचेनी गुणें ॥ ४ ॥

॥ ३ ॥ छाया देखोनि आपुली । जीव झाला दिशाभुली ॥१॥ ऐसें भ्रमाचें लक्षण । भुले आपणा आपण॥२॥ मुखें बोलतां उत्तर । तेथें जालें प्रत्युत्तर ॥ ३ ॥ डोळां घालितां आंगोळी । एकाचीं तें दोनी जालीं ॥ ४ ॥ पोटीं आपण कल्पीलें । तेंच आलेंसें वाटलें । ॥ ५ ॥ दास ह्मणे हे उपाधी । शंका धरितां अधिक बाधी ॥ ६ ॥

॥ ४ ॥ पोतें आहे खांद्यावरी । गेलें ह्मणोनि हांका मारी ॥१॥ ऐसें भ्रमाचें लक्षण । भुले आपणा आपण॥२॥नेणोनियां जन पुसे । पाहों जातां हातीं असे ॥ ३ ॥ शोकें जाहला विकळ । पाहों जातां कंठीं माळ ॥ ४ ॥ वस्तु बांधोनि पदरीं । पुसतसे दारोदारीं ॥ ५ ॥ रामदास ह्मणे जना । जवळी असोनी कळेना ॥ ६ ॥

॥ ५ ॥ कांहीं दीसे अकस्मात । तेथें आलें वाटे भूत ॥ १ ॥ वायां पडावें संदेहीं । मुळीं तेथें कांहीं नाहीं ॥ २ ॥ पुढें देखतां अंधारें । तेथें आलें वाटभरें ॥ ३ ॥ झाडझुडूप देखीलें । जीवीं वाटे कोण्ही आलें ॥ ३ ॥ पुढें रोविलासे झेंडा । भ्रांत्या ह्मणे कोण उभा ॥ ५ ॥ रामदास सांगे खूण । भितो आपणा आपण ॥ ६ ॥

॥ ६ ॥ वाजे पाऊल आपुलें । ह्मणे मागें कोण आलें ॥ १ ॥ को-

---

१ भ्रांतीनें.

ण धांवतसे आड । पाहों जातां झालें झाड ॥ २ ॥ भांवीतसे[1] अ-भ्यंतरीं । कोण चाले बरोबरी ॥ ३ ॥ शब्दपडसाद उठीला । ह्मणे कोणी रे बोलिला ॥ ४ ॥ रामीरामदास ह्मणे । ऐसीं शंकेचीं लक्षणें ॥ ५ ॥

॥ ७ ॥ आला आला रे बागुल । ह्मणतां शंका धरी मूल ॥ १ ॥ परी ते शाहाणे जाणती । तैसी माया हे मानिती ॥ २ ॥ मृगें ह्मणती मृगजळ । अवघें दाटलें तुंबळ ॥ ३ ॥ पाहों जातां दृष्टीचें बंधन । मूर्खा होय समाधान ॥ ४ ॥ पाहे स्वप्नींची संपत्ती । सत्य मानी मंदमती । ४ ॥ रामीरामदास ह्मणे । ऐसीं मूर्खांचीं लक्षणें ॥ ६ ॥



## झडपणीपंचक.

॥ १ ॥ पांचां भूतांची झडपणी । जाली जीवांसी जाचणी ॥ १ ॥ पूर्व स्मरण राहीलें । प्राणी आंगीं घुमारीलें[2] ॥ २ ॥ बाधा जाली अंतरीं । मन आळचि करी ॥ ३ ॥ बोलों जातां सारासार । त्यासी कळेना वीचार ॥ ४ ॥ जड देहाची भावना । संतजन वोळखेना ॥ ५ ॥ रामीरामदास ह्मणे । सत्य बोलावें शाहाणें ॥ ६ ॥

॥ २ ॥ आले संत पंचाक्षरी । शब्द मारीती अंतरीं ॥ १ ॥ पोटीं प्रस्ताव घालिती । अनुतापें पोळवीती ॥ २ ॥ दुःखमूळ हा संसार । विवेकाचे फोकें मार ॥ ३ ॥ धिक्काराचा धूर देती । तेणें होतसे विपत्ती ॥ ४ ॥ संसाराची रक्षा भली । त्याचे आंगीं बाणवीली ॥ ५ ॥ दास ह्मणे निगुती । प्राणीयांसी बोलाविती ॥ ६ ॥

॥ ३ ॥ कोण कोठील आहेसी । आह्मां सांग निश्चयेंसीं ॥ १ ॥ स्थूळ सूक्षम कारण । सांग तुझें कोण स्थान ॥ २ ॥ पिंडब्रह्मांड[3]रचना । अष्टदेहविवंचना ॥ ३ ॥ पिंडज्ञान तुझें स्थूळ । किंवा तत्वांचा पाल्हाळ ॥ ४ ॥ सांग मायेचें अरण्य । किंवा तुझें ब-

---

१ मानीतसे. २ आवेशास चढलें. ३ दृश्य, स्थूल.

ह्मारण्य ॥ ५ ॥ रामीरामदास ह्मणे । आतां बोलावें स्मरणें ॥६॥

॥ ४ ॥ चहू निगमींचीं बीजें । कानीं फुंकिलीं सहजें ॥ १ ॥ तेणें प्राणी उमजला । पाहे विचार आपुला ॥ २ ॥ नित्यानित्य सारासार । केला विवेक विचार ॥३॥ संत असतां दावीलें । आंत अनंत भावीलें ॥ ४ ॥ नाना साधनीं सायासीं । दृढ केलें निश्चयेसीं ॥ ५ ॥ दास ह्मणे निरूपणीं । केली भूतांची झाडणी ॥ ६ ॥

॥ ५ ॥ कांहीं एक उमजलें । पुन्हा संदेहीं पडिलें ॥ १ ॥ ह्मणे मज खाया देणें । मागें संदेह सांडणें ॥ २ ॥ आलें मीपणासरिसें । सनिविषयें संतोषें ॥ ३ ॥ येणें निष्ठेसी मांडिलें । मग आह्मीं सांडविलें ॥ ३ ॥ देहबुद्धीचें अज्ञान । मागे संशयाचें आन ॥ ५ ॥ रामदासीं उमजलें । भूतापासूनि सोडिलें ॥ ६ ॥

॥ ६ ॥ पंचभूतांचें अज्ञान । गेलें निःशेष निघोन ॥ १ ॥ ह्मणे येथें कोण आलें । जन कासया मिळालें ॥२॥ मी तों आहें सावधान । मज कां केलें बंधन ॥ ३॥ पूर्व स्मरण मजला । भूत लागलें जनाला ॥ ४ ॥ मी तो वस्तु केवळ । वाया मिळाले सकळ ॥ ५ ॥ रामीरामदास ह्मणे । संतकृपेचेनी गुणें ॥ ६ ॥

---

अभक्तपंचक.

॥ १ ॥ आह्मी सावधान गावें । तुह्मीं सावध ऐकावें ॥ १ ॥ सकळ सृष्टीचा गोसावी । त्याची वोळखी पुसावी ॥ २ ॥ स्वयें बोलिला सर्वेशु । ज्ञानेंवीण अवघे पशु ॥ ३ ॥ दास ह्मणे नाहीं ज्ञान । तया न करी पतन ॥ ४ ॥

॥ २ ॥ ज्ञानावीण जे जे कळा । ते ते जाणावी अवकळा ॥१ ॥ ऐसें भगवंत बोलिला । चित्त द्यावें त्याच्या बोला ॥ २ ॥ एक ज्ञानची सार्थक । सर्व कर्म निरर्थक ॥ ३॥ दास ह्मणे ज्ञानाविण । प्राणी जन्मला पाषाण ॥ ४ ॥

॥ ३ ॥ जेणें ज्ञान नेणवे । पशु तयासी ह्मणावें ॥ १ ॥ कोणें केलें चराचर । कोण विश्वाचा आधार ॥२॥ कोणें प्रारब्धा निर्मिलें । कोणीं संसारीं घातलें ॥ ३ ॥ ब्रह्मादिकांचा निर्मिता । कोण आहे त्यापरता ॥ ४ ॥ अनंत ब्रह्मयाच्या माळा । विपरीत भगवंताची लीळा ॥ ५॥ रामदासाचा विवेक । सर्वां घटीं देव एक ॥ ६ ॥

॥ ४ ॥ चोरा चांदिणें न साहे । सदा अंधकारीं राहे ॥ १ ॥ तैसा अभक्त दुर्जन । नेणे देवाचें भजन ॥ २ ॥ रविबिंबीं प्रकटलें । दिवाभीत तें पळालें ॥ ३ ॥ राजहंसांची पंगती । तेथें वायस कोठुनि येती ॥ ४ ॥ सभा देखतां अनेक । पळों गेले निर्नासिक ॥ ५ ॥ रामीरामदास ह्मणे । महायोगी कैंचें सुणें ॥ ६ ॥



## उपासना पंचक.

॥ १ ॥ नित्य कैंचें निरूपण । ज्ञान होतसे मळीण ॥१॥ ह्मणोनि सगुणीं भजावें । ज्ञानगर्वासी त्यजावें ॥ २ ॥ कल्प जातां त्या निर्गुण । ................॥३॥ मीच ब्रह्म हें धारिष्ट । तेथें संदेह अरिष्ट ॥ ४ ॥ देहबुद्धि हे सुटेना । द्वैतकल्पना तुटेना ॥ ५ ॥ रामीरामदास ह्मणे उपासना या कारणें ॥ ६ ॥

॥ २ ॥ ज्ञानगर्वें जो मातला । देव आव्हाटा घातला ॥ १ ॥ त्यासि नावडे सगुण । गेलें मीपण निर्गुण ॥ २ ॥ दोहींकडे अंतरला । थोर व्यवहारीं दाटला ॥ ३ ॥ देव सांडूनियां पुढें । नाना छंद करी वेडे ॥ ४ ॥ जेथें तेथें ज्ञान काढी । भांड झाला तो पाखांडी ॥ ५ ॥ रामीरामदास ह्मणे । मूर्ख दोहींकडे उणें ॥ ६ ॥

॥ ३ ॥ नाहीं एक उपासना । नाहीं भक्तीची भावना ॥ १ ॥ नाहीं निश्चय अंतरीं । मन फिरे दारोदारीं ॥ २ ॥ ज्यासी नाहीं एक देव । सातां पांचां ठायीं भाव ॥ ३ ॥ दृढ धरितां निश्चयेसीं । मुर्ख

१ कुत्रें.

ह्मणे एकदेशी ॥ ४ ॥ नानाविकार जल्पन । कैचें निष्ठेचें भजन । ॥ ५ ॥ रामीरामदास ह्मणे । निष्ठेविण काळें सुणें ॥ ६ ॥

॥ ४ ॥ पाहे दासीचिया सुता । कोण जाणे कोण पिता ॥ १ ॥ एक निष्ठा नाहीं भाव । त्यासी कैंचा देव ॥ २ ॥ नृत्यांगना जाली सती । कोण जाणे किती पती ॥ ३ ॥ निष्ठेवीण जैसा पशु । भोग भोगी बहुवसु ॥ ४ ॥ होती कुळवंत सुंदरी । श्रेष्ठ जाली बहुत घरीं ॥ ५ ॥ रामीरामदास ह्मणे । जळो बहुचकांचें जिणें ॥ ६ ॥

॥ ५ ॥ ज्ञातेपणें सखी पोसी । तेव्हां नव्हे एकदेशी ॥ १ ॥ एक निष्ठा उपासना । न ये अभक्ताचे मना ॥ २ ॥ नाना कष्टी जोडी अर्थ ॥ ................ ॥ ३ ॥ पोटासाठीं रात्री जागे । रागें श्वान पाठी लागे ॥ ४ ॥ कारितां आपुला संसार । घरीं जिवेसीं जोजार ॥ ५ ॥ रामीरामदास ह्मणे । ऐसीं मूर्खाचीं लक्षणें ॥ ६ ॥

॥ ६ ॥ पूजा देवाच्या प्रतिमा । त्याची नकळे महिमा ॥ १ ॥ देव भक्तांचा विश्राम । त्यास नेणे तो अधम ॥ २ ॥ नानास्थान भूमंडळीं । कोण सांगावी आकळी ॥ ३ ॥ ज्याचे चरणींचें उदक । धन्य होती विश्वलोक ॥ ४ ॥ ज्याचीं चरित्रें आयकतां । जनीं होय सार्थकता ॥ ५ ॥ रामीरामदास ह्मणे । धन्य होइजे स्मरणें ॥ ६ ॥

॥ ७ ॥ देव भक्तांचा कैवारी । रक्षीतसे नानापरी ॥ १ ॥ क्रोधें स्तंभीं प्रकटला । तेणें प्रल्हाद रक्षिला ॥ २ ॥ महासंकटीं रक्षिलें । मज इंद्रा सोडविलें ॥ ३ ॥ कूर्मरूपें धरिली धरा । जाला वराह दुसरा ॥ ४ ॥ तया द्रौपदी कारणें । वस्त्रें दिलीं नारायणें ॥ ५ ॥ जाणे दासाचें अंतर । लाखाजोहरीं वीवर ॥ ६ ॥

॥ ८ ॥ भक्तांलागीं पावे नेटें । वारी भक्तांचीं संकटें ॥ १ ॥ देवभावें काचावला । त्यांसी अभिमान लागला ॥ २ ॥ आपुल्या भक्ता-

---

१ चावट मनुष्याचें.

वें जें उणें। तें साहेना कोटिगुणें ॥ ३ ॥ दास ह्मणे नानापरी ॥ दे भक्तांचा कैवारी ॥ ४ ॥

---

भक्तिपंचक.

॥ १ ॥ सोडीं संसाराची आस। धरीं भक्तीचा हव्यास ॥ १ ॥ दुःखमूळ हा संसार। तयामध्यें भक्ति-सार ॥ २ ॥ ग्रंथ पहातां लक्ष कोटी। जेथें तेथें भक्ति मोठी ॥ ३ ॥ जन्मा आलीयाचें बळ। दास ह्मणे तें सफळ ॥ ४ ॥

॥ २ ॥ राम दीनाचा कैवारी। सेवकांचा अंगीकारी ॥ १ ॥ अंगीकारिले वानर। त्यांची ख्याती झाली थोर ॥ २ ॥ स्वयें निज धामा जाणें। राज्य कीजे बिभीषणें ॥ ३ ॥ भक्तउणें देखे जेथें। स्वयें धांव घाली तेथें ॥ ४ ॥ तया वैर केलें साहे। परि भक्तांचें न साहे ॥ ५ ॥ रामीरामदास ह्मणे। दृढ-भक्तीचेनि गुणें ॥ ६ ॥

॥ ३ ॥ श्लोक ॥ भक्तिरघुविराची पाहतां सार आहे। अगणित गुणतुळणा सर्व कांहीं न साहे ॥ भुषण हरिजनाचें ध्यानयोगी जनाचें। रहित मुनिजनांचें गूज हें सज्जनाचें ॥ १ ॥

॥ ४ ॥ भक्ती रामाची करावी। वंशावळी उद्धरावी ॥ १ ॥ तन मन आणि धन। सर्व लौकिक सांडून ॥ २ ॥ पांच पंचकांचे[1] भरें। सर्वकाळ अत्यादरें ॥ ३ ॥ रामीरामदास ह्मणे। स्वयें आनंदा कारणें ॥ ४ ॥

॥ ५ ॥ अरे मनुष्यें काय द्यावें। एका भगवंता मागावें ॥ १ ॥ उपमन्यें धांवा केला। क्षीरसिंधु त्या दीधला ॥ २ ॥ ध्रुरु शरण चक्रपाणी। आढळ शोभे तारागणीं ॥ ३ ॥ राम ह्मणतां वदनीं। गणिका बैसली विमानीं ॥ ४ ॥ बाळ मित्र निष्कांचन। त्याचें दरिद्र विच्छिन्न ॥ ५ ॥ कुब्जा खंगली ह्मातारी। कळा लावण्य सुंदरी

---

[1] कर्मेंद्रिय, ज्ञानेंद्रिय, प्राण, भूत, विषयपंचक.

॥ ६ ॥ शुकमिषें रामवाणी। ह्मणतां पावन कुंटिणी॥ ७॥ शरणागत निशाचर। राज्य देऊनी अमर॥ ८॥ होता बंधूनें गांजिला। तो सुग्रीव राजा केला ॥ ९ ॥ तया अंबऋषी-कारणें। दाहा वेळ येणें जाणें॥ १०॥ रामदासीं रामराव। त्याला निजपदीं दिधला ठाव॥ ११॥

॥ ६ ॥ शिरीं आहे देवराज। औषधाचें कोण काज॥ १ ॥ जो जो प्रयत्न रामावीण। तो तो दुःखासी कारण ॥ २ ॥ शंकराचें हळाहळ। जेणें केलें सुशीतळ ॥ ३॥ आह्मां तोचि तो रक्षिता। दास ह्मणे नाहीं चिंता॥ ४ ॥

॥ ७ ॥ विषें शंकरा जाळिलें। ज्याच्या नामें शीतळ झालें॥ १॥ रामनामाची ओषधी। जेणें तुटे भव-व्याधी ॥ २॥ शिवें केली काशीपुरी। विश्व नामें मुक्त करी॥ ३ ॥ राम-नामें पुरे कोड। न मने त्यांसी घाली होड॥ ४ ॥ रामदासीं दृढ भाव। संदेहासी केला वाव॥ ५॥

॥ ८॥ दास आपुले ह्मणावे। माझे गुण पालटावे ॥ १ ॥ काम क्रोध मद मत्सर। माझे ठायीं तिरस्कार॥ २॥ राग द्वेष लोभ दंभ। माझे अंतरीं स्वयंभ ॥ ३॥ रामदास ह्मणे आतां। देवा तुझे गुण गातां॥ ४॥

॥ ९॥ धन्य धन्य ते वानर। जवळी राम निरंतर॥ १ ॥ ब्रह्मादिकां नातुडे ध्यानीं। राम वानरां गोठणीं॥ २ ॥ वेद-श्रुतीसीं न-र्णवे महिमा। तो गुज सांगे प्लवंगमा[1] ॥ ३ ॥ वानर-वेष धरी देव। ज्यें लाधला केशव ॥ ४॥ दास ह्मणे ते देवाचे। न आवडते रघुनाथाचे॥ ५॥

॥१०॥ ताल धरूनी कथा करूं। रामालागीं हांका मारूं॥१॥ मा रामा रामा हरे रामा। तुजवीण गाये कोणा सोडी उठी

[1] वानरां.

मीतूंपणा ॥ ३ ॥ रामदास ह्मणे पाहे वास । भेटी देईं सावका शा॥४॥

॥११॥ ताळ वाजे मंद मंद । मुखीं हरि-नामाचा-छंद॥१॥ फट-के टाळी एके वेळा । घोष नामाचा आगळा ॥ २ ॥ रंगीं हरिदास मातले । नाम-घोषें आनंदले ॥ ३ ॥ उभे हरिदास रंगणीं । रामदास लोटांगणीं ॥ ४ ॥

॥ १२ ॥ राज्य झालें रघुनाथाचें । भाग्य उदेलें भक्तांचें ॥ १ ॥ कल्पतरु चिंतामणी । कामधेनूची दुभणी ॥ ३ ॥ परिस जहाले पाषाण । अंगीकार करी कोण ॥ ३ ॥ नाना रत्नांचे डोंगर । अमृतावें सरोवर ॥ ४ ॥ पृथ्वी अवघी स्वर्णमय । कोणीकडे न्यावें काय ॥ ५ ॥ ब्रह्मादिकांचे कैवारी । रामदासाचे अंतरीं ॥ ६ ॥

---

## हरिदिनपंचक.

॥ १ ॥ एकादशी नव्हे व्रत । वैकुंठींचा महापंथ॥ १ ॥ परि रुक्मांगदा ऐसा । व्हावा निश्चय मानसा ॥ २ ॥ एकादशी उपोषणें । विष्णुलोकीं ठाव घेणें ॥ ३ ॥ रामीरामदास ह्मणे । काय प्रत्यक्षा प्रमाणें ॥ ४ ॥

॥ २ ॥ रुक्मांगद होता नर । आह्मी काय आहों खर ॥ १ ॥ देव भक्तवेळाईत । राव रंक नाहीं तेथ॥२॥ तेणें नेला अवघा गांवू । आह्मी स्वयें तरी जावूं ॥ ३ ॥ रामीरामदासीं काज । धरा एकामेका लाज ॥ ४ ॥

॥ ३ ॥ ज्यासी हरीची प्राप्ती व्हावी । तेणें हरिदिनी करावी ॥ १ ॥ एकादशी त्यजिल्या अन्न । प्राप्त वैकुंठभुवन ॥२॥ रामीरामदास ह्मणे । हरिजागर उपोषणें ॥ ३ ॥

॥ ४ ॥ एकादशीच्या अन्नाखालीं । भय पातकें लपालीं ॥ १ ॥

---

१ वाट. २ भक्ताची वेळा राखणारा.

कां जीं संतीं अव्हेरिलीं। ह्मणुनि तेथें थारावलीं ॥२॥ ह्मणे रामी-रामदास। जडता अंगीकारी त्यास॥ ३ ॥

॥ ५ ॥ दीनानाथाचा सेवक। आह्मां स्वामीहूनि अधिक ॥१॥ शरणागत राघवाचे। परि शरण दारिद्राचे॥२॥जें देवास दुःखह। तेंचि आह्मां सुखावह ॥ ३ ॥ रामीरामदास ह्मणे । रामकृपेचेनि गुणें॥ ४ ॥

॥ ६ ॥ जेथुनीयां प्रबळता। केली तेथेंची अहंता॥ १ ॥ तरी तें सर्वही जाणार। पुढें घातचि होणार॥ २ ॥ होतां वैभवाचा भार। झाली वृत्ती अनावर ॥ ३ ॥ दास ह्मणे एकसर। पडे देवासी कातर॥ ४ ॥

॥ ७ ॥ सकळ कळा हातीं आल्या। ऋद्धिसिद्धिहीं वोळंगल्या ॥१॥ पारि आदि सांडूं नये। देवा भक्तांचा उपाये॥२॥ मनो-सिद्धी वाचा सिद्धी। जहाली उदंड उपाधी ॥ ३ ॥ दास ह्मणे राज्य झालें। इंद्र-पद हाता आलें॥ ४ ॥

॥ ८ ॥ आत्मज्ञान पारंगत। झाला बोलका महंत॥ १ ॥ गुरु-पद हाता आलें। भूमंडळीं सत्ता चाले॥२॥ दास ह्मणे ज्ञान झालें। सर्व मिथ्यासें कळलें॥ ३ ॥

॥ ९ ॥ ज्ञान झालें भक्तजना। सांडूं नये उपासना॥ १ ॥ ऐका साराचेंहि सार। मुख्य सांगतों विचार ॥ २ ॥ हेंचि सर्वांचें कल्याण। मानूं नये अप्रमाण॥ ३॥ दास ह्मणे अनुभवलें। भजन भगवताचें भलें॥ ४ ॥

॥ १० ॥ देव असतां पाठी-राखा। त्रैलोक्याचा कोण सखा॥१॥ नाना उद्वेग वाढती। नाना चिंता उद्भवती ॥ २ ॥ खंत वाटेना अंतरीं। नाना व्यवधान करी॥ ३ ॥ रामदास ह्मणे भावें। भजन देवाचें करावें॥ ४ ॥

---

१ सेवातत्पर झाल्या.

## कथापंचक.

॥ १ ॥ धन्य धन्य तें नगर । जेथें कथा निरंतर ॥ १ ॥ गुण गाती भगवंताचे । तेचि मानाचे देवाचे ॥ २ ॥ स्वयें बोले जगजीवन । थोर कलियुगीं कीर्तन ॥ ३ ॥ रामदास ह्मणे भले । हरि-भक्तीं उद्धरले ॥ ४ ॥

॥ २ ॥ कथा भगवंताची सार । सकळ तीर्थांचें माहेर ॥ १ ॥ सेतुबंध वाराणसी । पुण्यें लाभे हरिकथेसीं ॥ २ ॥ गंगा यमुना सरस्वती । कृष्णा वेण्या भागीरथी ॥ ३ ॥ रामदासीं संत संग । सदा कथेचा प्रसंग ॥ ४ ॥

॥ ३ ॥ रामनामकथा गंगा । स्नानें पावन करी जगा ॥ १ ॥ तिसी प्रेमपुर आला । शंकरहृदयीं स्थिरावला ॥ २ ॥ रामदासाची माउली । आळशा वरुनी गंगा आली ॥ ३ ॥

॥ ४ ॥ रामनामा-वीणें कांहीं । अंतीं सोडविता नाहीं ॥ १ ॥ थोर थोर योगेश्वर । अवघा व्यापार ईश्वर ॥ २ ॥ थोरपणें धरितां ताठा । तरि तो नागवला करंटा ॥ ३ ॥ बहुत पूजिलीं दैवतें । योग याग नाना मतें ॥ ४ ॥ धोती पोती हो भुजंगी । लोकीं कर्म करिती योगी ॥ ५ ॥ विनवी रामीरामदास । नाना साधनीं सायास ॥ ६ ॥

॥ ५ ॥ सकळ साधनाचें फळ । राम-नामचि केवळ ॥ १ ॥ जप तप अनुष्ठान । अंतीं नामची प्रमाण ॥ २ ॥ नाना यंत्र मंत्रावळी । सोडवीना अंतकाळीं ॥ ३ ॥ महापातकी पतित । नामें तारिले अनंत ॥ ४ ॥ नाम साराचेंहि सार । नाम सकळासी आधार ॥ ५ ॥ दास ह्मणे सांगों किती । नामावीण नाहीं गती ॥ ६ ॥



## निष्ठापंचक.

॥ १ ॥ ब्रीद आपुलें राखावें । आह्मां भक्तां सांभाळावें ॥ १ ॥

---

१ शरीरशुद्धीचे मार्ग ( योग्यांचे ).

बहु नाहीं वाडाचार। आतां एक चि निर्धार ॥ २ ॥ एथें कांहीं नाहीं व्यस्त। आतां बोल तो नेमस्त ॥ ३ ॥ रामदास ह्मणे एक। आतां धरावा नेमस्त ॥ ४ ॥

॥ २ ॥ आतां पावन करावें। शरणागता उद्धरावें ॥ १ ॥ आह्मी कांहीं नेणों हीत। ह्मणोनी जालों पतित ॥ २ ॥ पुण्य नाहीं माझे गांठीं। केली दोषाची राहाटी ॥ ३ ॥ दास ह्मणे माझें जिणें। देवा सर्वस्वेसीं उणें ॥ ४ ॥

॥ ३ ॥ नेणों भक्ति नेणों भाव। आह्मी नेणों दुजा देव ॥ १ ॥ राघवाचे शरणागत। झालों रामनामांकित ॥ २ ॥ मुखीं रामनामावळी। काळ घालूं पायां तळीं ॥ ३ ॥ रामदासीं रामनाम। बाधूं नेणे काळ काम ॥ ४ ॥

॥ ४ ॥ राम अनाथाचा नाथ। आह्मां कैवारी समर्थ ॥ १ ॥ वनीं शिळा मुक्त केली। गणिका विमानीं वाहिली ॥ २ ॥ राम दीनाचा दयाळ। देव सोडिले सकळ ॥ ३ ॥ रामीरामदास ह्मणे। आतां आह्मां काय उणें ॥ ४ ॥

॥५॥ भूतभविष्याचें ज्ञान। जयां अमृत-भोजन ॥१॥ तयां देवांचा कैवारी। तो चि आमुचा सहाकारी ॥२॥ कल्पतरु चिंतामणी। कामधेनुची दुभणी ॥३॥ नाना-रत्नांचे डोंगर। दिव्य भोग निरंतर ॥ ४ ॥ रामदासाची आवडी। अवघे देव तेहतीस कोडी ॥ ५ ॥

---

## संख्यापंचक.

॥ १ ॥ एकें[1] लक्ष दीनमणी। तृप्त होतसे कमळणी ॥ १ ॥ तैसा देव आहे दुरी। पारि तो भक्तांचे अंतरीं ॥२॥ दोन लक्षें[2] निशांपती[3]। परी ते चकोर तृप्त होती ॥ ३ ॥ रामदास ह्मणे घन। देता चातका जीवन ॥ ४ ॥

 १ एक लक्ष योजनांवर. २ दोन लक्ष योजनें. ३ चंद्र.

मांचा मेळा तो पातकाचें मूळ । तरी मायाजाळ गोड वाटे ॥ ७३ ॥ गोड वाटे माया सर्व ब्रह्म जया । जन वन तया सारखेंची ॥ ७४ ॥ सारखेंची नव्हे सारासार आहे । अनुभव पाहें गुरुमुखें ॥ ७५ ॥ गुरुमुखें ज्याचें झालें समाधान । त्यासी जन वन कदा नाहीं ॥ ॥ ७६ ॥ नाहीं जया आला संसाराचा वीट । तया मोक्षवाट सांपडेना ॥ ७७ ॥ सांपडेना मोक्ष जें मन चंचळ । यालागीं निश्चळ मन करीं ॥७८॥ करीं बापा आतां संसारासी सोडी । करूं नको गोडी आश्रमाची ॥ ७९ ॥ आश्रमाची गोडी कासया सांडावी । उपाधि मांडावी कासयासी ॥ ८० ॥ शिकवितां न घे तया कोण सांगे । सांगतां न लागे वीतराग ॥ ८१ ॥ वीतराग ऐसें कासया ह्मणावें । हो एक जाणावें निश्चयेंशीं ॥ ८२ ॥ निश्चय कळला तो कदा राहीना । वैभव राहीना कदाकाळीं ॥ ८३ ॥ कदाकाळीं प्राप्त भोगावें चुकेना । देहाची भावना वेगळाली ॥ ८४ ॥ वेगळालें प्राप्त तैसेंच भोगावें । परी निरोपावें वीतराग ॥ ८५ ॥ वीतराग देहें संबंध घडेना । वैभव सोडीना कांहीं केल्या ॥ ८६ ॥ केलियानें होतो केलेंचि पाहीजे । जें मनीं धरिजे तैसें होय ॥ ८७ ॥ होय प्रयत्न खरा प्रारब्धासारीखा । कांहीं पूर्वरेखा पाहिजे तो ॥ ८८॥ पाहिजे प्रयत्न आदरेंशीं केला । मग प्राप्त झाला शब्द घडे ॥ ८९ ॥ घडे तें प्रयत्नें होणारा सारीखें । नाहींत श्री देखा आठवेना ॥९० ॥ आठवेना तरी आळस नसावा । आळसाचा हेवा करूं नये ॥९१ ॥ करूं नये ऐसें बोलणें बोलावें । होणार स्वभावें होत जातें ॥ ९२ ॥ होत जातें परी प्रयत्नाविण नाहीं । आधीं प्रयत्न कांहीं करीजेतो ॥ ९३ ॥ करीजेतो परी घडोनी येईना । मनाची वासना पूर्ण नव्हे ॥ ९४ ॥ नव्हे समाधान साधना वांचून । वायां शब्दज्ञान वाउगेंची ॥ ९५ ॥ वाउगें साधन कासया करावें । स्वरूप

१ विरक्त.

स्वभावें सिद्ध आहे ॥ ९६ ॥ सिद्ध आहे परी अंतरीं बाणणें । संशय जाणेना निश्चयेंशीं ॥ ९७ ॥ निश्चयेंशीं ज्ञान विवेकसंपन्न । तया हें अज्ञान बाधी केंवी ॥९८॥ केंवि बाधीजेना अशक्तीच्या मूळें । माया-जाळ काळें ओढियलें ॥ ९९ ॥ ओढियेलें काळें अभक्ता जनासी । नाहीं जयापाशीं भक्तिभाव ॥ १०० ॥ भक्तिभाव क्रिया मोक्षाचें साधन । वीतरागी मन सर्वकाळ ॥ १०१ ॥ सर्वकाळ जेथें कथा-निरूपण । श्रवण मनन निदिध्यास ॥१०२॥ निदिध्यासें मनोवृत्ति उदासीन । नावडे कांचन आणी कांता ॥ १०३॥ कांता पुत्र धन वैभव स्वजन । रामावीण कांहीं आवडेना ॥१०४॥ आवडेना भार नाथिला संसार । रामदासीं सार रामदास्य ॥ १०५ ॥

॥ २७ ॥ जाणावा तो नर देवचीं साचार । वाचे निरंतर राम-नाम ॥ १ ॥ सगुणीं सद्भाव नाहीं ज्ञानगर्व । तया लागीं सर्व सारि-खेंची ॥ २ ॥ निंदकाचा ढका संकटीं सांभाळी । मन सर्वकाळीं पाल-टेना ॥ ३ ॥ पालटेना मन परस्त्रीकांचनीं । निववीं वचनीं पुढी-लासी ॥ ४ ॥ पुढीलांसी सूख नाना देत आहे । उपकारीं देह लावी-तसे ॥ ५ ॥ लावितसे देह रामभजनासी । रामीरामदासीं हरि-भक्ति ॥ ६ ॥

॥ २८ ॥ हरिभक्तीवीण जाऊं नेदीं क्षण । या नांव लक्षण सार्थ-काचें ॥ १ ॥ सार्थकाचें जीणें कथानिरूपणें । श्रवणमननें काळ गेला ॥ २ ॥ काळ गेला हरिभक्तीचेनी योगें । साधूचेनी संगें दास ह्मणे ॥ ३ ॥

॥ २९ ॥ ठकाराचें ठाण करीं चापबाण । माझें ब्रह्मज्ञान ऐसें आहे ॥ १ ॥ रामरूपीं देह झाला निःसंदेहो । माझे मनीं राहो सर्व-काळ ॥ २ ॥ रामदास ह्मणे रामरूपावरी । भावें मुक्ति चारी ओवा-ळीन ॥ ३ ॥

---

१ रामसेवा.

॥ ३० ॥ विष अमृत केवळ । महिमा नामाचा केवळ ॥ १ ॥ अमृत संजीवनी नाम । मुखीं असतां रामनाम ॥ २ ॥ हो जें पुराणीं ऐकिलें तेंची लोचनीं देखिलें ॥ ३ ॥ दास पावले कल्याण । कृपा रामाची परिपूर्ण ॥ ४ ॥

॥ ३१ ॥ डोळां अज्ञानझांपडी । भावें देहबुद्धी घानोडी ॥ १ ॥ तैसा पशु अज्ञान जाणा । जुंपिला संसाराचा घाणा ॥ २ ॥ खांदीं ओझें विषयाचें । पाठी फटके सुखदुःखाचे ॥ ३ ॥ रामीरामदास ह्मणे । व्यर्थ गेलें याचें जीणें ॥ ४ ॥

॥ ३२ ॥ राम गावा राम गावा । राम जीवींचा विसावा ॥ १ ॥ मंगळाचें जें मंगळ । राम कौसल्येचा बाळ ॥ २ ॥ सर्व तीर्थ एक्या तीर्थीं । माझ्या राघोबाची कीर्ति ॥ ३ ॥ कल्याणाचें जें निधान । रघुरायाचे गुण जाण ॥ ४ ॥ रामनामाचा गजर । आह्मां अढळ व्यापार ॥ ५ ॥ राम कैवल्याचा दानी । रामदासा अभिमानी ॥ ६ ॥

॥ ३३ ॥ अंतीं पंचभूतें भूतांशीं मिळालीं । वासना राहीली कोणे ठायीं ॥ १ ॥ कोणे ठायीं जेव्हां वासना ज राहे । कैसें रूप आहे वासनेचें ॥ २ ॥ वासनेचें रूप सूक्ष्म तें जाणावें । संकल्पस्वभावें वास तीचा ॥ ३ ॥ वासना हे वस्ती करीं अगोदर । जोंवरी कलीवर सचेतन ॥ ४ ॥ सचेतन काया कारणीं लावावी । वासना गोवावी रामरूपीं ॥ ५ ॥ रामरूपीं सत्य संकल्प धरावा । संसार करावा अवलीळे ॥ ६ ॥ अवलीळा भवसागर ओसरे । जेणें मनीं धरीं गुरुवाक्य ॥ ७ ॥ गुरुवाक्यें भक्ति रामदासीं झाली । मुक्ति हे लाधली सायुज्यता ॥ ८ ॥

॥ ३४ ॥ रामनामकथा श्रवणीं पडतां । होय सार्थकता श्रवणाची ॥ १ ॥ मुखें नाम घेतां रूप आठवेल । प्रेम दुणावेल पाहावया ॥ २ ॥ राम माझे मनीं शोभे सिंहासनीं । एकाएकीं ध्यानीं

---

१ देह. २ दूर हो.

सांपडेल ॥ ३ ॥ रामदास ह्मणे चावळलें मन । जेथें तेथें ध्यान दिसताहे ॥ ४ ॥

॥ ३५ ॥ सकळ साधनाचें फळ । रामनामची केवळ ॥ १ ॥ जप तप अनुष्ठान । अंतीं यमचीं प्रमाण ॥ २ ॥ नाममंत्र यंत्रावळी । सोडवीना अंतकाळीं ॥ ३ ॥ माहापातकी पतीत । नामें तरले हो अनंत ॥ ४ ॥ नाम साराचें ही सार । नाम कळीसी आधार ॥ ५ ॥ दास ह्मणे सांगूं किती । नामेंवीण नाहीं गति ॥ ६ ॥

॥ ३६ ॥ आह्मी अपराधी अपराधी । आह्मां नाहीं दृढ बुद्धी ॥ १ ॥ माझे अन्याय अगणित । कोण करील गणीत ॥ २ ॥ मज सर्वस्वीं पाळावें । प्रतिदीनीं सांभाळावें ॥ ३ ॥ माझी वाईट करणी । रामदास लोटांगणीं ॥ ४ ॥

॥ ३७ ॥ तुझी चिंता हो मानसीं । राम शरयूतीरनीवासी ॥ १ ॥ रूप सांवळें सुंदर । ज्यासी ध्यातसे शंकर ॥ २ ॥ जडित कुंडलें श्रवणीं । राम लावण्याची खाणी ॥ ३ ॥ सूर्यवंशाचें मंडन । रामदासाचें जीवन ॥ ४ ॥

॥ ३८ ॥ पावन असतां पतीत जालामी । सोय चुकलामी पावनाची ॥ १ ॥ पावनाची सोय धरितां अंतरीं । स्वरूप विचारीं समाधान ॥ २ ॥ सामाधान जालें पावनानें केलें । आत्म निवेदिलें दास ह्मणे ॥ ३ ॥

॥ ३९ ॥ कां गा धांवेनासी हरी । काय अन्याय माझे शिरीं ॥ १ ॥ काय तुझ्या द्वारीं केलें । ह्मणोनी मजसीं सांडियेलें ॥ २ ॥ माझे संकटवेळेसी । काय डोळे झांकितोसी ॥ ३ ॥ नाना भक्तांसी पावलां । माझ्या वेळेसी न आलां ॥ ४ ॥ दास ह्मणे वनमाळी । सत्य करीं ब्रिदावळी ॥ ५ ॥

॥ ४० ॥ धांवें धांवें दीननाथा । मज रक्षावें पतिता ॥ १ ॥ बहु

१ चंचळ झालें.

शीणलों गे माये । भवानि तूझी वाट पाहें ॥२॥ तुजसारिखा कुवा॑सा । उणें काय जगदीशा ॥३॥ आतां नकरीं आळस । फार झालों कासावीस ॥४॥ दास ह्मणे धांव येईं । आतां ऊशीर नलावीं ॥ ५ ॥

॥ ४१ ॥ धांव धांव नारायणा । दावीं पाय मज दीना ॥ १ ॥ जैसा जळावीण मीन । तळमळी रात्रंदिन ॥ २ ॥ तैसा तुज हो वेगळा । वाट पाहें वेळोवेळां ॥ ३ ॥ आतां न करीं आळस । प्राण जाला कासावीस ॥ ४ ॥ दास ह्मणे विठाबाई । माझी करुणा येऊं देई ॥ ५ ॥

॥ ४२ ॥ फुकाचे चरण दाखवितां । काय भिशी कृपावंता ॥१॥ काय म्यां तुज मागाया । वाट पुरवीं देवराया ॥२॥ पुढें देणें घेणें लागे । ह्मणोनी दडतोसी मागें ॥ ३ ॥ नलगे संतती संपदा । दावीं तुझ्या त्या पादुका ॥ ४ ॥ काय होतोसी कृपण । दास ह्मणे दावीं चरण ॥ ५ ॥

॥ ४३ ॥ माझ्या दृष्टी जालें काय । कां गा दृष्टी पडेना पाय ॥ ॥ १ ॥ आतां देवा कधीं येसी । मज दीनातें भेटी देसी ॥ २ ॥ कैसें करूं नारायणा । माझें दुःख सांगू कोणा ॥ ३ ॥ किती दिवस वाट पाहूं । आतां कोणा शरण जावूं ॥ ४ ॥ दास ह्मणे वेगीं यावें । आह्मां दीनातें भेटावें ॥ ५ ॥

॥ ४४ ॥ धांव धांव रुक्मिणी वरा । मज दीनाचें संकट हरा ॥ ॥ १ ॥ माझे अन्याय जाले कोटी । शरणआलों घालीं पोटीं ॥२॥ तुजवीण सखे माय । त्रिभुवनीं कोण आहे ॥ ३॥ दास ह्मणे धांवत येईं । पाय दावुनी सुखी करीं ॥ ४ ॥

॥ ४५ ॥ तुज वीण माझा देवा । कोणें सांभाळ करावा ॥ १ ॥ मज सारखा पातकी । पाहातां नाहीं तिहीं लोकीं ॥ २ ॥ तुझे पदरीं पडलों खरा । कळेल तैसा सांभाळ करा ॥३॥ अंकित झालों

१ आश्रय. २ स्वाधीन.

मी भीकारी। आतां देवा तारीं मारीं ॥ ४ ॥ माझे अन्याय लक्ष-कोटी। दास ह्मणे घालीं पोटीं ॥ ५ ॥

॥ ४६ ॥ किती देवा चाळविसी। वाट पाहाया लाविसी ॥ १ ॥ किती धीर धरूं माये। वेळोवेळां वाट पाहें ॥ २ ॥ जैसा चातक जीवनीं। पिऊं पिऊं करी पाणी ॥ ३ ॥ तैसी लागलीसे आस। वाट पाहें रात्रंदिवस ॥ ४ ॥ जीवन पाजी तान्हयास। पुरवीं माये माझी आस ॥ ५ ॥ दास ह्मणे वेगीं येई। चंद्र चकोरातें दावीं ॥ ३ ॥

॥ ४७ ॥ मागें कैसे भक्त तारिले। माझें बळ काय झालें ॥ १ ॥ काय अपराध माझे शिरीं। मज मोकलीलें[1] हरी ॥ २ ॥ शरण रिघा-लों मी तुज। कोठें राहिलीं पातकें ॥ ३ ॥ सांग सांग पंढरीनाथा भांडावया आलों आतां ॥ ४ ॥

॥ ४८ ॥ देव गर्जती कोल्हाळ। देव भक्तांचा दयाळ ॥ १ ॥ लाजविलें तें अनंता। मज पतीता कारितां ॥ २ ॥ दास ह्मणे मी लेकरूं। नको माते त्याग करूं ॥ ३ ॥

॥ ४९ ॥ आतां न करीं आळस। उणें येईल ब्रीदास ॥ १ ॥ नको करूं कानकंवाडे[2]। वायां जातील पवाडे ॥ २ ॥ काय उणें मज मशका। थोड्या साठीं भिऊं नका ॥ ३ ॥ पण आपुला सिद्धी नेई। आतां फार बोलूं काई ॥ ४ ॥ दास ह्मणे तारीं दीन। जैसें असेल भूषण ॥ ५ ॥

॥ ५० ॥ कांहीं बोल रे विठ्ठला। मौनवेष[3] कां धरीला ॥ १ ॥ काय मागतों गांठोडी। बोलेसना धरिली गुढी ॥ २ ॥ आशा वैभवाची नाहीं। भिऊं नको वद कांहीं ॥ ३ ॥ नलगे मज धनदारा। वेगें लोचन उघडा ॥ ४ ॥ दास ह्मणे वर पाहें। कृपा करूनी भेटावें ॥ ५ ॥

॥ ५१ ॥ तुझी लागलीसे आस। वाट पाहें रात्रंदिवस ॥ १ ॥

---

१ सोडिलें. २ कानाडोळा. ३ मौन.

मज धीर धरवेना । कधीं येसी नारायणा ॥ २ ॥ मातेवीण बा
बालक । न देखतां करी शोक ॥ ३ ॥ तैसें माझें मन देवा । पायीं
मिसळलें केशवा ॥ ४ ॥ दास ह्मणे ये झडकरी । नाहीं तरी ब्रीद
सोडीं ॥ ५ ॥

## अभंग समाप्त.



# अनुक्रमणिका.

# श्रीरामदासी नित्यनैमित्तिक.



॥ प्रातःकाळीं चतुर्थप्रहरीं उठोन, हस्तपादप्रक्षालन करून, भूपाळी ह्मणावी तीः-

॥ श्रीगणेशाय नमः ॥ प्रातःकाळीं प्रातःस्नान ॥ घडे केलिया स्मरण॥महादोषांचें दहन॥महिमा गहन पुराणीं ॥ धृ०॥गंगा यमुना सरस्वती ॥ कृष्णा वेण्या भागीरथी ॥ पूर्णफल्गु भोगावती ॥ रेवा गौतमी वैतरणी ॥ १ ॥ कुंदा वरदा माहेश्वरी ॥ तुंगभद्रा आणि कावेरी ॥ गणिका तृप्ती मल्लप्रहरी ॥ दुरितें हरी जान्हवी ॥ २॥ काळी कालिंदी किंकिणी ॥ कपिलायणी इंद्रायणी ॥ नलिनी अर्चिनी धर्मिणी ॥ ताम्रपर्णी नर्मदा ॥ ३ ॥ मणिकर्णिका भोगावती ॥ ककुद्मती हेमावती ॥ सीता प्रयाग मालती ॥ हरिद्रती गंडिका ॥ ४ ॥ भीमा वरदा मंदाकिनी ॥ महापगा पुनःपुनी ॥ वज्रा वैष्णवी कुमुदिनी ॥ अरुणा वरुणा नारदी ॥ ५ ॥ शरयू गायत्री समुद्रा ॥ कुरुक्षेत्र सुवर्णभद्रा ॥ दास ह्मणे पुण्यक्षेत्रा ॥ नानानद्या गोविंदीं ॥ ६ ॥

॥ भूपाळी रामाची २ ॥

राम आकाशीं पाताळीं ॥ राम नांदे भूमंडळीं ॥ राम योगियांचे मेळीं ॥ सर्वकाळीं तिष्ठत॥१॥ राम नित्य निरंतरीं ॥ राम सबाह्य अभ्यंतरीं ॥ राम विवेकाचे घरीं ॥ भक्तीवरी सांपडे ॥२॥ राम भावें ठायीं पडे ॥ राम भक्तीशी आतुडे[1] ॥ राम ऐक्यरूपीं जोडे ॥ मौन पडे श्रुतींसी ॥ ३ ॥ राम योग्यांचें मंडण ॥ राम भक्तांचें भूषण ॥ राम आनंदाचा घन ॥ करी रक्षण दासांचें ॥४॥

॥ नंतर यथाधिकार संप्रदायी साधकानें, पुढील लिहिलेलीं सगुण, निर्गुण ध्यानें, मानसपूजा, यांचा अंतरंग अभ्यास, अथवा श्रवण मनन निरूपण करावें ॥

---

१ प्राप्त होतो.

॥ श्रीरामसमर्थ ॥ सकळ जीवां जीवन ॥ सकळिकां समान॥ त्रैलोक्याचें महिमान ॥ उदका पाशीं ॥१॥ नदीचें उदक वाहत गेलें ॥ तें निरर्थक चालिलें ॥ जरी बांधोनि काढिलें ॥ नाना तिरीं कालवे ॥ २ ॥ उदक निगेनें वर्तविलें ॥ नाना जिनसीं पीक काढिलें ॥ पुढें उदकचि झालें ॥ पीक सुवर्ण ॥ ३ ॥ तैसें हें आपुलें वय ॥ विवेकेंविण व्यर्थ जाय ॥ विवेकी ते यथान्वय ॥ स्वहित साधिती ॥४॥ नाना उंच आम्रफळें॥अंजीर ऊंस द्राक्षें केळें॥ नाना पिकें यत्नजळें ॥ निर्माण झालीं ॥ ५ ॥ तैसें आयुष्य आपुलें ॥ विवेकें सार्थक केलें ॥ कां जें शोधूनि पाहिलें ॥ सारासार ॥ ६ ॥ गयाळीपणें मूर्खपणें ॥ संसारांत दिसे उणें ॥ विवेकी जनें या कारणें ॥ स्वहित करावें ॥ ७ ॥ इह लोक परलोक ॥ उभय लोकीं सार्थक ॥ शुद्ध ज्ञान शुद्ध विवेक ॥ यासि ह्मणावें ॥ ८ ॥ लोकीं संसार करावा ॥ नाना यत्नें आटोपावा ॥ लोकांमध्यें मिरवावा ॥ पुरुषार्थ आपुला ॥ ९ ॥ कन्यापुत्रयोग झाले ॥ समर्थ सोयरे पाहिले ॥ ब्राह्मण्य विधियुक्त जालें ॥ स्वाहा[1] स्वधा[2] ॥१०॥ लोक ह्मणती भलाभला ॥ यानें इहलोक साधिला ॥ पर लोकही आणिला ॥ पाहिजे मना ॥ ११ ॥ जेणें सकळ निर्माण केलें ॥ त्यासि पाहिजे ओळखिलें ॥ मुख्य देवास चुकले ॥ त्यांस परलोक कैंचा ॥१२॥मागील जन्म आठवेना॥ पुढील कायतें कळेना ॥ उगाच प्राणी अनमाना॥ मध्यें पडला ॥ १३ ॥ तो अनुमान कामा नये॥ अनुमानें कैंचा जय ॥ पिंडब्रह्मांड ग्रंथान्वयें ॥ विवेकें शोधावें ॥ १४॥ वेदशास्त्र पंचीकरण ॥ तेथें घालावें अंतःकरण ॥ बरें करावें विवरण ॥ प्रत्ययाचें ॥ १५ ॥ विधीनें सकळ निर्मिलें ॥ विधीस कोणीं निर्मिलें ॥ विष्णूनें सकळास पाळिलें ॥ विष्णूस पाळिता कोण ॥ १६ ॥ रुद्र सकळां संहारी ॥ त्यास कोण संहारी॥ ऐसा

---

१ देवकार्य. २ पितृकार्य.

विचार अंतरीं ॥ बरा शोधावा ॥ १७ ॥ कर्ता देव बहु ह्मणती ॥ त्याची कैची स्वरूपस्थिती ॥ सगुणनिर्गुण आदीं अंतीं ॥ कैसा ह्मणावा ॥१८॥ निर्गुणा नाहीं कर्तृत्वहेत ॥ सगुण तरी नाशवंत ॥ याकारणें सिद्धांत ॥ विवेकें पहावा ॥१९॥ पुनर्जन्म नाहीं चुकलें ॥ जन्मास येवोनि काय केलें ॥ पुढें लिगाड लांबलें ॥ जन्ममृत्यूचें ॥ २० ॥ अवचट नरदेह जोडला ॥ पूर्व पुण्यें प्राणियाला ॥ विचार पाहिजे केला ॥ उत्तम गती ॥ २१ ॥ मागें केलें व्यर्थ गेलें ॥ पुढें नाहीं अनुमानलें ॥ येणें करितां मूळ झालें ॥ जन्ममृत्यूचें ॥ २२ ॥ ऐसें झालें न पाहिजे ॥ कोणें एकें स्वहित कीजे ॥ परमेश्वरास पाविजे ॥ ह्मणजे बरें ॥ २३ ॥ देवाचे सृष्टींत रहावें ॥ देवें निर्मिलें तें पाहवें ॥ नाना वैभव भोगावें ॥ देवा करितां ॥२४॥ त्या देवास चुकावें ॥ तेणें सर्वस्वास मुकावें ॥ ऐसें न करावें तुकावें ॥ कर्तृत्व आपुलें ॥ २५ ॥ घूकटीं उदकाचे लवणें ॥ पृथ्वी अंतरिक्षीं धरणें ॥ हें मनुष्याचें करणें ॥ नव्हे सर्वथा ॥ २६ ॥ सामर्थ्य कळों येतें मना ॥ देव पाहतां दिसेना ॥ परंतु याची विवंचना ॥ पाहिली पाहिजे ॥२७

## सगुण ध्यान.

॥ श्रीरामसमर्थ ॥ आतां वंदीन कुळदैवता ॥ लीलाविग्रही भगवंता ॥ जो संकटीं सांभाळिता ॥ आहे निजदासा ॥ १ ॥ एकवचनी एकबाण ॥ एकपत्नी अभंगठाण ॥ अजिंक्य राक्षसां निर्वाण ॥ कर्ता समर्थ एकू ॥ २ ॥ धार्मिक पुण्यपरायण ॥ शांत लावण्य सुलक्षण ॥ जेणें त्र्यंबक परम कठीण ॥ भग्न केलें ॥ ३ ॥ जो लावण्याचा जनक ॥ जो सौंदर्याचा नायक ॥ जो मार्तंड कुळदीपक ॥ चातुर्यनिधि ॥४॥ ऐसा राम राजीवनयन ॥ साधुजनांचें भूषण ॥ त्या प्रभूचें ध्यान ॥ वर्णीन हळुहळू ॥ ५ ॥ टवटवीत रसाळ ॥ निमासुरें[1] वदन वेल्हाळ ॥ लावण्य साजिरें केवळ ॥

---

१ सुंदर.

आनंदाचें ओतिलें ॥ ६ ॥ सुरेख भ्रूलता वेंकट ॥ सरळ सतेज नासापुट ॥ नीट नेपाळलें ललाट ॥ तेथें त्रिवळी ॥ ७ ॥ केशर ऊर्ध्वपुंड्र ललाटीं ॥ वरी कस्तूरी दुबोटी ॥ सुरंग अक्षता त्रिपुटी ॥ शोभायमान ॥ ८ ॥ रत्नजडित मनोहरें ॥ कुंडलें मकराकारें ॥ श्रवण कोमळ भारें ॥ लंबित झाले ॥९॥ सुरंग लावण्य विचित्र॥ कोमळ तीक्ष्ण पद्मपत्र ॥ तैसे आकर्ण विशाळनेत्र ॥ अर्धोन्मीलित ॥१०॥ अनर्घ्य रत्नें शुद्ध हेमी ॥ रत्नखचीत फांकती रश्मी ॥ मघवा जैसा वर्षतां व्योमीं ॥ प्रकटे विद्युल्लता ॥११॥ तैसेंच किरीटी तेजाळ ॥ पीत रक्त फांकती किळे ॥ विलेपन साहित्यें भाळ॥ प्रकाशलें ॥ १२ ॥ अभ्यंग केला चंपकतैलें ॥ कुरळीं गुंफिलीं फुलें ॥ तेणें परिमळें लोधलें ॥ मानस मधुकरांचें ॥१३॥ तया कुसुमाचेनि वेधें ॥ रुंजी करिताती षट्पदें ॥ अंतराळीं झुंकारशब्दें॥ प्रीतीनें पांगूळती ॥१४॥ दिव्यांबराचा चेपून पट्टा ॥ मस्तकीं वेष्टिला लपेटा ॥ वरी नक्षत्रां ऐसा गोमटा ॥ घोंस मुक्ताफळांचा ॥१५॥ नाना सुमनांचिया माळा ॥ मुकुटा वेष्टित घातला पाळा ॥ विविध परिमळ आगळा ॥ नेतसे सुवायो ॥१६॥ सर्वकाळ आनंदवदन ॥ मंद हास्यें झमकती दशन ॥ कृपादृष्टी अवलोकन ॥ करी निजदासा ॥१७॥ प्रवाळ वल्ली परम कठीण ॥ सुरंगची परि पाषाण ॥ कोमल अधर दृष्टांत हीन ॥ बोलों चि नये ॥१८॥ कोटि मदन मयंक ॥ उपमे नये श्रीमुख ॥ पूर्णत्वाचें पूर्ण वीक ॥ लावण्यशोभा ॥१९॥ चिबुक साजिरी हनुवटी ॥ मुक्तामाळा डोलती कंठी ॥ सुडौल दोर्दंड बाहुवटीं ॥ रत्नकिळा फांकती ॥ २० ॥ शोभे विशाळ वक्षस्थळ ॥ उदरीं त्रिवळी सरळ ॥ तेथें नाभी जन्मभूळ ॥ चतुराननाचें ॥२१॥ रत्नखचित पदक गळां ॥ शोभती पुष्पांचिया माळा ॥ कटि प्रदेशीं मेखळा ॥ जघन सिंहाकृति॥२२॥

१ इन्द्र. २ तेज. ३ लोभावलें. ४ चंद्र.

पीतांबरू मालंगठी ॥ कास काशिली गोमटी ॥ क्षुद्रघंटांची दाटी ॥ गर्जती झणत्कारें ॥ २३ ॥ नानासुगंधपरिमळ ॥ सर्वांगीं उटी पातळ ॥ रुळे वैजयंतीमाळ ॥ आपादपर्यंत ॥ २४ ॥ करपल्लवीं रत्नभूषणें ॥ आजानुबाहु वीरकंकणें ॥ कीर्तिमुखें सुलक्षणें ॥ केयूरें दंडीं ॥२५॥ आपाद पर्यंत पीतांबरु ॥ न कळे जानुजंघांचा विचारु ॥ चरणा ब्रीदाचा तोडरू ॥ दैत्य पुतळे रुळती ॥२६॥ गुल्फ वर्तुळ घोटींव निळी ॥ मुर्डीव वांकीं खळाळी ॥ अंदुलिंग रत्नें झळाळीं ॥ प्रभा तयांची ॥ २७ ॥ पातळ पाउलें कोमळें ॥ पदपल्लवीं दशांगुळें ॥ नखतेजेंचि उजळलें ॥ ब्रह्मांड नेणों ॥ २८ ॥ कीं उगवल्या चंद्ररेखा ॥ तैसी शोभा दिसे नखा ॥ सुरंग वर्तुळ टांचा ॥ अरुणोदया सारिख्या ॥ २९ ॥ तळवे सुरंग सतेज ॥ ऊर्ध्वरेखा आणि ध्वज ॥ वज्र अंकुश तेजःपुंज ॥ पद्म झळाळी ॥ ३० ॥ ज्ञानमुद्रा सव्यहस्तीं ॥ पाऊल मांडीवरी एकक्षिती ॥ तेथें पावली उत्तमगती ॥ अहल्या शिळा ॥ ३१ ॥ ऐशी सर्वांगीं सुंदर ॥ सांवळी मूर्ति मनोहर ॥ राज वेष अतिसकुमार ॥ शोभे सिंहासनीं ॥ ३२ ॥ परिमळ द्रव्य उधळलें ॥ तेणें श्रीमुख रजवटलें ॥ सतेज किरिटींचें जाळें ॥ करी चित्त तेज मंद ॥ ३३ ॥ सकळ वनितांचें मंडण ॥ परमलावण्य सुलक्षण ॥ जे कां अवनिगर्भरत्न ॥ विश्वमाता ॥ ३४ ॥ ते जानकी जनकतनया ॥ वामांगीं शोभे मूळमाया ॥ दक्षिण निकट सुबाह्या ॥ उभा लक्ष्मणू ॥ ३५ ॥ भरत शत्रुघ्न लावण्यखाणी ॥ तैसाचि शोभे गदापाणी ॥ हास्यमुखें सुरळीत वाणी ॥ बोलती परस्परें ॥ ३६ ॥ पित्यापरीस अधिक गती ॥ जयावरी रघुनाथाची प्रीती ॥ पुढें सम्मुख मारुती ॥ उभा कर जोडूनी ॥ ३७ ॥ भगवद्दासाचें मंडण ॥ कपिकुळाचें भूषण ॥ सकळ वानरांचे प्राण ॥ राखिले जेणें ॥ ३८ ॥ परम प्रतापें

---

१ पायांचे घोटे.

आगळा ॥ दिसे जैसा पर्वतनिळा ॥ सिंधु उडोनि आवलीळा॥ जानकी शोधिली ॥ ३९ ॥ स्वयंभ सुवर्ण कासोटी ॥ उभा उदित जगजेठी ॥ आदरें सम्मुख दृष्टीं ॥ रघुनाथपदांबुजीं ॥ ४० ॥ रत्नजडित मनोहर ॥ दिव्य सिंहासन सुंदर ॥ वरी आरूढला पवित्र ॥ राजा अयोध्येचा ॥ ४१ ॥ मेघडंबरें छत्रें चामरें ॥ देवढीं ढळंती अपारें ॥ एका करीं शेषपात्रें ॥ सांनिध उभे ॥ ४२ ॥ एक सुगंध चर्चिती ॥ एक विंझणे जाणविती ॥ उदकपात्रें एका हस्तीं ॥ एक तांबूलधारी ॥ ४३ ॥ खचित पादुका एका करी ॥ एक सुरंगवेत्रधारी ॥ उभे राहिले उभयद्वारीं ॥ आज्ञा इच्छिती ॥ ४४ ॥ ऐसे अपार सेवकजन ॥ आपुलाले कामीं सावधान ॥ धूर्त तार्किक गुणसंपन्न ॥ कार्यकर्ते ॥ ४५ ॥ खचित मंडप विशाळ ॥ नीळ गोमेद पाच प्रवाळ॥नानारत्नें पुंजाळ॥फांकती राजांगणीं॥४६॥चांदवे बांधले विशेष॥मुक्ताफळांचे घोस॥जैसें तारागणीं आकाश॥लगडलें दिसे ॥४७॥ सुवर्णपोटरें स्वयंभ॥उभारिले मंडपस्तंभ॥रचना पाहतां सुलभ॥अमरावतीची॥४८॥महाविस्तीर्ण मंडप॥खणोखणीं रत्नदीप॥किरणें फांकती अमूप॥बालसूर्या ऐशीं॥४९ ॥तया मंडपाभीतरी ॥ दिव्यसिंहासनावरी ॥ बैसला शोभे कैवारी ॥ सुरवरांचा ॥ ५० ॥ वेष्टित ऋषींचा पाळा ॥ वेदाध्ययनघोष आगळा॥ संतसज्जनांचा मेळा ॥ ठायीं ठायीं ॥ ५१ ॥ गणगंधर्व विद्याधर ॥ सनकादिक नारद तुंबर ॥ भक्त मिळाले अपार ॥ जयजयकारीं गर्जती ॥५२॥ ब्रह्मचारी विरक्त तापसी ॥ ज्ञाते दिगंबर संन्याशी॥ सिद्ध योगीश्वर साधनाशी ॥ बैसले ठायीं ॥ ५३ ॥ बैसले पंडित पौराणिक ॥ बैसले कवीश्वर अनेक ॥ बैसले प्रेमळ सात्त्विक॥साधुजन ॥ ५४ ॥ बैसलीं ब्रह्मवृंदें निर्मळें ॥ स्नानसंध्या आचारशीळें ॥ धोत्रें पवित्रें सोज्वळें ॥ लंबायमान ॥ ५५ ॥ योगवटे टिळे माळा ॥

---

१ वारितात.

नाभीपर्यंत रुळती गळा ॥ भाविक सात्विक लीळा ॥ परम धार्मिक ॥५६॥ नाना उपकरणें देवतार्चनें ॥ चंबू गडवे दर्भासनें॥नामें मुद्रा गोपीचंदनें ॥ साहित्यशोभा ॥ ५७ ॥ एक देवतार्चनें करिती ॥ घंटा घणघणा वाजविती ॥ पुढें मांडून ध्यानमूर्ती ॥ ध्यानस्थ झाले ॥ ५८ ॥ एकीं अंतरीं गरुडध्वजा ॥ सांग मांडिली मानस पूजा ॥ एक लाविती सहजा ॥ अनुसंधान ॥ ५९ ॥ एका मुखीं नामोच्चार ॥ प्रदक्षिणा नमस्कार ॥ नित्य नेम निरंतर ॥ करिती एक ॥ ६० ॥ एक एकांतासी गेले ॥ तेथें ध्यानस्थ बैसले ॥ एक योगाभ्यासी भले ॥ अभ्यास करिती ॥ ६१ ॥ मुद्रा साधिती आसनें ॥ एक मंत्र अवर्तनें ॥ एक स्तोत्रें स्तुति स्तवनें ॥ अध्ययनें करिती ॥ ६२ ॥ एकीं सांगिलें अन्न ॥ एक करिती पयःपान ॥ एक ते पर्णें सेवून ॥ राहिले योगी ॥ ६३ ॥ पुरश्चरणीं एक तपी ॥ महासाधनें साक्षेपी ॥ एक ते लावण्यरूपी ॥ योगाभ्यासें ॥ ६४ ॥ एक निरूपणा बैसले ॥ ब्रह्मज्ञानी महाभले ॥ श्रोते वक्ते आनंदले ॥ आत्मबोधें ॥ ६५ ॥ अद्वैतनिरूपणें डुल्लती ॥ उपनिषदें वेदश्रुती ॥ पदें फोडूनि वाखाणिती ॥ महानुभाव ॥ ६६ ॥ एक ऐकती पुराणें ॥ सगुणमूर्तीचीं विंदानें ॥ एक गाती अभिन्नपणें ॥ गुण सर्वोत्तमाचे ॥ ६७ ॥ वेदशास्त्रें संपन्न ॥ बैसले करिती व्याख्यान ॥ श्रवण करितां श्रोते जन ॥ संतुष्ट होती ॥ ६८ ॥ एक साधु ब्रह्मनिष्ठ ॥ सर्वसाक्षत्वें वरिष्ठ ॥ एक ते मानसीं तुष्ट ॥ संदेह नाहीं ॥ ६९ ॥ अन्वय[1] आणि व्यतिरेकें[2] ॥ एक देही जाहले मुक्त ॥ एक मानिती अयुक्त ॥ सर्व चर्चा ॥ ७० ॥ एक तत्वविशोधन ॥ करी महाविचक्षण ॥ चतुष्टयदेहविलक्षण ॥ म्हणती आत्मा ॥ ७१ ॥ एक पिंडज्ञानबळें ॥ शोधिती अष्टदळकमळें ॥ एक ध्वनीचेनि मेळें ॥ मिळोनि जाती ॥ ७२ ॥ एक दृश्यातें म्हणती देव ॥ एकीं देवचि केला वाव ॥ एक

---

१ जें असतां जें असतें. २ जें नसतां जें नसतें

ह्मणती भाव ॥ भगवंतीं असावा॥७३॥ एक ह्मणती मिथ्या माया॥ एक ह्मणती पाहिजे क्रिया ॥ एक ह्मणती भक्ति केलिया ॥ पाविजे देव ॥ ७४ ॥ एक ह्मणती कर्म करावें ॥ एक ह्मणती वैराग्य धरावें॥ एक ह्मणती नाम घ्यावें ॥ सर्व काळ ॥ ७५ ॥ जे जे जेथें विश्वासले । ते ते तेथेंचि राहिले ॥ अनुभव वेगळाले ॥ सिद्धांत एक ॥ ७६ ॥ ऐसे अपार साधुजन ॥ केलें अष्टविधा भजन ॥ आत्मारामीं साव· धान ॥ भक्ति नवविध पावले ॥ ७७ ॥ नवमी आत्मनिवेदन ॥ सायु· ज्यमुक्तीचें साधन ॥ एके स्थळीं समाधान ॥ पावती सर्व ॥ ७८ ॥ असो ऐसा समुदाव ॥ महामंडपीं बैसले सर्व ॥ सिंहासनीं देवराव ॥ शोभत असे ॥ ७९ ॥ सुधापानें संतृप्त जाले ॥ तैसे सर्व मिळाले ॥ संव ते हरिदास आले ॥ सर्वोत्तमाचे ॥ ८० ॥ देवा पुढें सावडे भक्त॥ गाती नाचती लज्जारहित ॥ देहभाव विसरोनि चित्त ॥ सर्वोत्तमीं मिळाले ॥८१॥ कुशळ गायक किन्नर ॥ नृत्य करती अपार ॥ तेणें वेढिलें राजद्वार ॥ पुढें रीघ न फावे ॥ ८२ ॥ टाळ घोळ मृदंग ॥ ब्र- ह्मवीणे वाजती उपांग ॥ हरिदास मिळाले रंग ॥ तुंबळ लागले ॥ ८३ ॥ गर्जती मृदंग काहळें ॥ आनंदें गाती उसाळें ॥ क्षणोक्षणां धूसर उसळे ॥ रक्तस्वेत सुगंध ॥ ८४ ॥ साहित्य मृदंग टाळी ॥ स- र्वत्र वाजविती करताळी ॥ क्षणोक्षणां नामकल्लोळीं ॥ गर्जती सर्व ॥ ८५ ॥ रुळती सकळांचिया गळां ॥ जाई जुई चंपकमाळा ॥ नाना सुगंधपरिमळा ॥ कर्दम जाहला ॥८६ ॥ पताका गरुडटके अपार॥ तेणें अच्छादिलें अंबर ॥ मेघडंबरें मनोहर ॥ थडकती ठायीं ठायीं ॥ ८७ ॥ पूर्णचंद्राकार छत्रें ॥ आहाटलीं चित्र विचित्रें ॥ गरगरां फिरती अपारें ॥ नानावर्णें ॥८८॥ माही निशाणें तळपती ॥ दाढा वेकराळ झळकती ॥ डोल पहातां थरकती॥ रोमांच आंगीं॥८९॥ [1]बहु दाटती सूर्यपानें ॥ फटफट वाजती निशाणें ॥ वाद्यें गर्जती

---

१ शिंगें.

श्राणें॥दीर्घस्वरें॥९०॥टाळमृदंग शंख भेरी॥ वाद्यें वाजती अंबरीं॥
नानावाद्यांची भरोवरी॥ गर्जती डंकें॥९१॥ ध्वज फडकती प्रचं-
ड॥ वाद्यं वाजती उदंड॥ तेणें घोषें ब्रह्मांड॥ संपूर्ण झालें ॥९२॥
नाना रत्नांची फांकली प्रभा॥ तेणें डावरली सकळ सभा॥ लाव-
ण्य लाजली शोभा॥ देखोनि ते काळीं॥९३॥ झाली अत्यंत दा-
टणी॥ तेणें होतसे मंडपघसणी॥ उभे वारिती वेत्रपाणी॥सभा घ-
नवटली॥९४॥ सर्व ही टकमकां पाहती॥ पडली देहाची भ्रांती॥
अकळिकांच्या मनोवृत्ती॥ वेधल्या रामचंद्रीं॥९५॥ वदती वक्ते
अनुभवाचे॥ मस्तक डोलती श्रोत्यांचें॥तल्लीन सादर सर्वांगाचें॥
श्रोत्र केलें॥९६॥ दिव्य सिंहासनीं रामचंद्र॥ परमप्रतापी नरेंद्र॥
सन्मुख उभा भीम कपींद्र॥ वज्रदेही॥९७॥देवास आरती आरंभि-
ली॥ सकळ सभा गडबडली॥ असंभाव्य वाद्यें लागलीं॥ मर्यादे
वेगळीं॥९८॥ रत्नदीप हेमताटीं॥ नीरांजनें लक्षकोटी॥थाटें चा-
लली दाटी॥ असंभाव्य झाली॥९९॥ दीप लागले अपार॥ बं-
बाळ जळती कर्पूर॥ स्थळोस्थळीं मनोहर॥ रंगमाळा शोभती॥
॥१००॥ चंद्रज्योतीचे उमाळे॥ तेणें दिशाचक्र ढवळे॥ पूर्णचंद्र
पे वेळे॥ राहाटले जैसे॥१॥ धूसर उडवलें अपार॥ तेणें ढवळ-
े अंबर॥॥ मुखें तेजवटली थोर॥ उत्साह झाला॥२॥ सकळ
वाद्यें एकवेळा॥ नामघोषगजर आगळा॥आच्छादिलें भूमंडळा॥
भुसरें तेणें॥३॥ रत्नकिळा भूमंडळीं॥ मुक्तें झळकती अंतराळीं॥
सुरंग सभामंडळीं॥ उमटते झाले॥४॥ रामाचनि स्वामीपणें॥
ो ब्रह्मांड मानीं ठेंगणें॥ त्रैलोक्यही वाटे उणें॥ महिमा वर्णितां
५॥ राम सर्वांगें सुंदर॥ राम करुणेचा सागर॥ दीना अनाथां-
ा उद्धार॥ श्रीराम कर्ता॥६॥ राम जीवींचा जिव्हाळा॥ राम
ोंचा कोंवळा॥ राम जाणे अंतर्कळा॥ निजदासांची॥७॥ राम

---

१ प्रफुल्लित झाला. २ गर्दीनें डोकीं घांसणें.

पुण्यपरायण ॥ राम त्रैलोक्याचा प्राण ॥ रामें दास बिभीषण॥चिरंजीव केला ॥ ८ ॥ राक्षस केले देशधडी॥देव सोडिले तेहतीस कोडी ॥ राज्यीं स्थापिले आवडी ॥ शरणागत ॥९॥ राम सुरवरां कोवसा ॥ राम मंडन सूर्यवंशा॥राम जप भवानीशा ॥ सत्यचीति रामनामें ॥ १० ॥ ॥ नामें तरले पाषाण ॥ नामें पतित पावन ॥ नामें मुक्त विश्वजन ॥ शिवाचे उपदेशें ॥ ११॥ शुकमिसें रामवाणी ॥ह्मणतां पावन कुंटिणी ॥ अंतकाळीं सकळ प्राणी ॥ रामनामें उद्धरती ॥१२॥ हो कां ज्ञाते विरक्त भक्त ॥ हो कां साधु जीवन्मुक्त ॥ हो कां भाविक साबडे भक्त ॥ नामें विण वृथा ॥ १३ ॥ सकळां मध्यें थोर ॥ तो नाम जपे शंकर ॥ तेथें मानव किंकर ॥ बापुडें किती ॥ १४ ॥ नामें होय चित्तशुद्धी ॥ नामें तुटे देहबुद्धी ॥ नामें होय कार्यसिद्धी ॥ निदिध्यासें ॥ १५ ॥ नामें स्वहित फावे ॥ नामें निश्चया दृढावे ॥ नामस्मरणें शीघ्र पावे ॥ देवाधिदेव ॥ १६ ॥ ऐसें हें राम नाम ॥ परमगुह्य विश्रामधाम ॥ मंथूनि काढिलें वर्म ॥ शतकोटींचें ॥१७॥ सावध ऐका श्रोते जन ॥ परम गुह्य महागहन ॥ नाममात्रें होत दहन ॥ पापराशि॥१८॥यदर्थी जो संशय धरी॥तो महापापी दुराचारी ॥ त्यासी प्राप्त यमपुरी ॥ विकल्पें होय॥१९॥इति सगुण ध्यान समाप्त ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ शुभंभवतु ॥ श्रीरामसमर्थ॥

॥ निर्गुणध्यानप्रारंभः ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥ जेथूनि निर्माण विद्या ॥ तेथें विद्या ना अविद्या ॥ ऐक्यरूपें तया आद्या ॥ नमीन भावें ॥ १ ॥ जे निराकारीं जन्मलीं ॥ जन्ममूळा प्रवर्तली ॥ इच्छाद्रुमा धांवली ॥ उभयभागीं॥२॥जेथें भंगपणें हेत ॥ तें माया नसतां निवांत ॥ तया निवांताचा प्रांत ॥ सद्गुरुस्वामी ॥ ३ ॥ तया सर्वांचें नमन ॥ तैसे च संत सज्जन ॥ आतां आठवूं ध्यान ॥ सर्वोत्तमाचें ॥ ४ ॥ असंभासी

---

१ आधार. लाभे.

घडे संग ॥ आकाशीं उमटे तरंग ॥ तरी अभंगासी भंग ॥ वर्णू शके ॥ ५ ॥ अघटित ही साक्षेपें ॥ घडे स्वामीचे प्रतापें ॥ जैसा अयोध्येचे नृपें ॥ सिंधु पालाणिला ॥ ६ ॥ तैसी सद्गुरुकृपा ओल ॥ तेथें मुकेपणाचे बोल ॥ खुणे बुझतां सखोल ॥ अर्थ लाभे ॥ ७ ॥ तया लाभावेनि गुणें ॥ जालें ब्रह्मांड ठेंगणें ॥ सद्गुरुकृपास्फुरणें ॥ वाचा वदों लागे ॥ ८ ॥ सहजस्थिति न मोडे ॥ जोडलेंचि मागुतें जोडे ॥ रिघत ठायीं पवाडे ॥ निःशब्द शब्दु ॥ ९ ॥ तये विद्येचें रत्न ॥ न जोडे केलिया प्रयत्न ॥ तें श्रवणें जोडे यत्न ॥ केला पाहिजे ॥ १० ॥ जें पुरुष ना प्रकृति ॥ जें मूर्ति ना अमूर्ति ॥ जेथें श्रुति स्मृति ॥ निवांत जाल्या ॥ ११ ॥ दृश्य कुळातें पाळित ॥ ह्मणोनि नामें कुळदैवत ॥ दृश्या वेगळें स्वतंत्र ॥ आपण आहे ॥ १२ ॥ तो हा जाणिजे आत्माराम ॥ सगुण निर्गुण पूर्णकाम ॥ जयाच्या स्वरूपाचा नेम ॥ न कळे सर्वथा ॥ १३ ॥ जैसे कर्पूराचे भंभाळ॥नेमून सांगणें बाष्कळ ॥ ज्ञातेपणाची पुष्पावळ ॥ आत्माराम वर्णिती ॥ १४ ॥ परंतु याचे कृपेस्तव ॥ मीपणाचा पुसे ठाव ॥ न वदोन वक्तृत्वभाव॥सहजचि आहे ॥१५॥ बोलत असतां न बोलणें ॥ हे खूण जयासी बाणे ॥ तेचि श्रोते वक्ते शाहाणे ॥ स्वहितविषयीं ॥ १६ ॥ आतां वर्णीन रामराव ॥जो शंकराचा अंतर्भाव॥त्याच्या स्वरूपाकडे धांव॥घेतली मनें॥१७॥रत्नखचित पादुका॥जेथें खुंटती आशंका ॥ जया पासोनि विवेका ॥ पुढें रीघ नाहीं ॥ १८ ॥ पादुकांमध्यें विवेकबळ ॥ करी असंभाव्य तुंबळ ॥ जैसें उष्णा मध्यें जळ ॥ हेलावूं लागे ॥ १९ ॥ जैसें द्वैत आहे तों वरी ॥ विवेक नाना युक्ती करी ॥ अपार तर्क नाना परी ॥ आणून दावी ॥ २० ॥ मीनाचें चाळकपण ॥ जंव तें जळ आहे संपूर्ण ॥ जळ सांडितां आपण ॥ मृत्यु पावे ॥ २१ ॥ तैसी द्वैता पैली कडे ॥ विवेकाची हाव मोडे ॥

१ समजतां.

मीना सारिखें मुरडे ॥ अक्षोभ जळीं ॥ २२ ॥ पद प्राप्त झाल्या वरी ॥ विवेकाची कैशी उरी ॥ निबुंजोनियां माघारी ॥ वृत्ति मुरडे ॥ २३ ॥ निज पदीं विवेकासी ॥ मार्ग फुटेना जावयासी ॥ पदपादुकासंधीसी ॥ आनंद पावे ॥ २४ ॥ जेथें मीपण सोडिती ॥ सज्ञान पुढें पवाडती ॥ जाणीव सोडूनियां श्रुती ॥ गोप्य झाल्या ॥ २५ ॥ जेथें अत्यंत सांकडी ॥ मन संगती सोडी ॥ तर्क जाणीव बापुडी ॥ उभी च विरे ॥ २६ ॥ वेदें जाणोनि मौन धरिलें ॥ तें अनुभवा आलें ॥ अनुभवासि अनुभविलें ॥ अनुभवें विण ॥ २७ ॥ जो मार्ग परम कठीण ॥ न चले भोयाळें वीण ॥ स्वामिविरहित कोण ॥ पावों शके ॥२८॥ जेथें नांव रूप हें झडे ॥ आनंद आनंदीं बुडे ॥ जेथें निःशेष फुंज मोडे॥निज सुखाचा ॥ २९ ॥ जेथें विषयसुख आटे ॥ आनंद प्रकटोनि तुटे ॥ जैसा कर्पूरदीप झटे ॥ उजळाने मुरे ॥ ३० ॥ पदा ऐली कडील गोष्टी ॥ जेथें पडली विवेकदृष्टी ॥ विवेकबळें तर्क वेष्टी ॥ सीमा पादुकांची ॥ ३१ ॥ रामनिजपदीं दृष्टी पडतां ॥ कैंचा उरेल वर्णिता ॥ जयास वर्णावें तत्वता ॥ तो चि आपण ॥ ३२ ॥ निवांत विश्रांतिस्थळ॥ उभा विराला ब्रह्मगोळ ॥ निर्मळ स्वरूप निखळ ॥ कोंदाटलें ॥ ३३ ॥ अवघें तें चि उदंड ॥ वाटे बुडालें ब्रह्मांड ॥ अंधार तुटला निबिड ॥ रामरूप प्रकटलें ॥ ३४ ॥ वर्णितां रघुनाथचरण ॥ अद्भुत भासलें निरूपण ॥ वाटे परंतु परम हीण ॥ पदीं न साहे ॥ ३५ ॥ पदा पासोनि साकार ॥ सृष्टि झाली चराचर ॥ तें चि ध्यान मनोहर ॥ वर्णीन आतां ॥ ३६ ॥ निजपदीं नाम ठविलें ॥ तीं साजिरीं दोनी पाउलें ॥ जेथें मुनि रंगले ॥ अनुभवें ॥ ३७ ॥ मोक्षध्वज ऊर्ध्वरेखा ॥ ते सायुज्यमुक्ति देखा ॥ वज्र तें अंकुरसुखा॥ अंकुश शोभे ॥ ३८ ॥ निजसुखाची नवाळी ॥ तें पदीं पद्म झळाळी ॥ दिव्य चक्षूची न्याहळी ॥

१ कंटाळून. २ सज्ञान होती. ३ गर्व.

दिपोनि ठेली ॥ ३९ ॥ ज्ञानसूर्यबाळप्रभा ॥ ते टांचांची दिव्य शोभा ॥ गुल्फ नीळ तेणें नभा ॥ नीळिमा आली ॥ ४० ॥ पदीं पद महानुभाव ॥ ते पदाचे पदपल्लव ॥ साजिरे शोभती लाघव ॥ युक्तीचें राहिलें ॥ ४१ ॥ शून्यत्व नखाग्रें फेडिलीं ॥ सजीव सतेजें उरलीं ॥ पाहों जातां दिसे बिंबली ॥ स्वरूपस्थिति ॥ ४२ ॥ निजपदांपें निवृत्तिगंगा ॥ निघाली भवतापभंगा॥श्रवणें निववी जगा॥ सज्जनसंगें ॥४३॥ विशाळ ओघ प्रकटला ॥ तिहीं लोकीं प्रकटला॥ मुमुक्षूउपेगां आला ॥ ओंकार भगीरथ ॥ ४४ ॥ तये गंगेसी भावार्थी ॥ मननें स्नानें करिती ॥ ते सायुज्यता पावती ॥ निदिध्यासें ॥ ४५ ॥ तये गंगे तीरीं स्वानंदें ॥ मिळालीं ब्रह्मवृंदें ॥ स्नानें अद्वैत बोधें ॥ बुड्या देती ॥ ४६ ॥ अनंतजन्मांचा मळ ॥ क्रिया पालटे तत्काळ ॥ ऐसें पवित्र गंगाजळ ॥ कर्णद्वारें सेविती ॥ ४७॥ जया मत्पहीं स्नान घडे ॥ दिवसेंदिवस मळ झडे ॥ अभ्यंतरीं कैवल्यपद जोडे ॥ मननें करोनी ॥ ४८ ॥ वासनावस्त्र मलिन झालें ॥ प्रपंचसंगस्नेह लागलें ॥ तें असंगजळें धुतलें ॥ शुद्धता पावे ॥ ४९ ॥ ब्रह्मनिष्ठा ते चि वस्त्रें ॥ मत्पही क्षाळिती धोत्रें ॥ ह्मणोनि तीं परम पवित्रें ॥ सर्वकाळ ॥ ५० ॥ जरी झाला थोर ब्राह्मण ॥ केलें पाहिजे क्षाळण ॥ क्षाळण न करितां मलिन ॥ अमंगळ ॥ ५१ ॥ अहंतेचे डाग पडले ॥ बहुतांचे निघोनि गेले ॥ प्राणी शुद्धत्वें पावले॥ अक्षयपद ॥ ५२ ॥ एक स्नान करिती ॥ परिमळ ठेविती ॥ ऐशा स्नानें फलश्रुती ॥ होणार नाहीं ॥ ५३ ॥ जे संसारउष्णें पोळले ॥ ते गंगाजळें निवाले ॥ परम विश्रांति पावले ॥ सत्संगें शीतळ ॥ ५४ ॥ जे असंतप्त संसारीं ॥ ते मळीण बैसले भीतरीं॥हुडहुडी अंगावरी॥ महामोहाची ॥ ५५ ॥ भाविक गंगेंत पडले॥ ते वाहत चि उगमा गेले ॥ गंगे सहित प्रवेशले ॥ श्रीरामपदीं ॥५६ ॥ उगमाहूनि गंगा

१ पदापासून. २ उपयोगाला.

पडे ॥ तेथोनि धांवे उगमा कडे ॥ मागें जावोनि पडे ॥ जेथील तेथें ॥ ५७ ॥ गंगे पुढें आणि मागें ॥ अवघा उगम निजांगें ॥ उगमें चि व्यापिलें गंगे ॥ सबाह्य उगम ॥ ५८ ॥ जे जे उगमासि गेले ॥ ते उगम होवोनि राहिले ॥ सदा सर्वांगीं निवाले ॥ आनंदरूप ॥ ५९ ॥ गंगोदक कर्णी भरलें ॥ तें मुखें उचंबळलें ॥ पुन्हा उपेगा आलें ॥ भाविकांसी ॥ ६० ॥ महिमा गोदावरीचा ॥ मार्ग दाखवी मोक्षाचा ॥ श्रीरामपदांबुजाचा ॥ अगाध महिमा ॥ ६१ ॥ आतां असो ही खूण ॥ मागें राहिलें निरूपण ॥ ध्यान रामाचें श्रवण ॥ श्रोतीं करावें ॥ ६२ ॥ स्वरूपीं मुरडे वृत्ती ॥ तैशा वांकी खळाळिती ॥ मुरडल्या परी असती ॥ जेथील तेथें ॥ ६३ ॥ कामक्रोधादि निशाचर ॥ त्यांचा करोनियां संहार ॥ तो चि निजपदीं तोडर ॥ गर्जे प्रतापें ॥ ६४ ॥ जानू पर्यंत पितांबर ॥ न कळे जानुजंघाविचार ॥ जैसा आकार निराकार ॥ आच्छादिला ॥ ६५ ॥ बुद्धिताम्रपर्णीचीं जळें ॥ स्वरूपसागरीं मिळालें ॥ तया संगमीं मुक्ताफळें ॥ मुक्तपणें होती ॥ ६६ ॥ देहबुद्धीचे शिंपले ॥ ज्ञानदृष्टी विकासले ॥ जीवन पडतां बुडाले ॥ कठीणपणें ॥ ६७ ॥ तया शिंपल्या करितां ॥ आली कठिणता ॥ जीवन परी ऐक्यता ॥ तुटोनि गेली ॥ ६८ ॥ उकलोनि पाहिलें ॥ जीवन निःशेष गेलें ॥ ते पाषाणरूप झाले ॥ संगा गुणें ॥ ६९ ॥ जें दुर्लभ जगासी ॥ परंतु झाले एकदेशी ॥ ऐक्यरूपें जीवनासी ॥ मिळों नेणे ॥ ७० ॥ मुक्तपण आंगीं जडलें ॥ तेव्हां चि वेगळें पडलें ॥ अभिन्नत्व विघडलें ॥ वेगळेपणें ॥ ७१ ॥ सगुणपल्लवीं जडतां ॥ त्यासि होय सार्थकता ॥ सगुणीं जडलें नसतां ॥ व्यर्थ चि गेलें ॥ ७२ ॥ जें सगुणपल्लवीं जडे ॥ तें सर्वथा भिन्न न पडे ॥ ऐसीं मुक्तें अपाडें[1] ॥ तळपती पल्लवाग्रीं ॥ ७३ ॥ प्रबोधसिंह विवेकबळें ॥ भवगजांचीं गंडस्थळें ॥ विदारित

---

१ अमर्याद.

संसारसळें ॥ महाबळी ॥७४॥ तया सिंहाचें मुख्य मान ॥ तैसें शोभे सान जघन ॥ जेथें असे गुह्यस्थान ॥ जें बोलतां चि नये ॥ ७५ ॥ जें गुरूचें निज गुह्य ॥ कळल्या हि बोलों नये ॥ तेथील सुख जानकीगुह्य ॥ सज्जन विचारी ॥७६॥ असो ऐसें गुह्यस्थान ॥ आच्छादूनियां वसन ॥ वेष्टित शोभे जघन ॥ काशिला जेणें ॥ ७७ ॥ तयावरी कटिसूत्र मेखळा ॥ क्षुद्र घंटिका सोज्ज्वळा॥जैसा बोधसूर्याचा कळा ॥ फांकती रश्मा ॥ ७८ ॥ क्षुद्रदृष्टीचा वांटा ॥ ह्मणोनि नामें क्षुद्रघंटा ॥ त्या अधोमुखें द्रष्टा ॥ ह्मणोनी आहेती ॥ ७९ ॥ भ्रम हा निःशेष उडे॥ते चि शोभती पवाडे॥समाधानीं प्रीति जडे॥तैशा जडती किंकिण्या॥८०॥ निरावलंबी जी अवलंबिली ॥ नसोन इच्छा उभारिली ॥ ते चि नळिनी प्रकटली ॥ मूळमाया ॥ ८१ ॥ जें निर्मळ स्वानंद जळ ॥ आदिअंतीं एक चि निखळ ॥ तेथें इच्छारूप कमळ ॥ मकटलें बळें ॥ ८२ ॥ तया पासून कळा ॥ पूर्वी होता संकोचला ॥ तो गुणक्षोभें विकासला ॥ रहस्यरूपें ॥ ८३ ॥ तया अभ्यंतरीं पत्रें ॥ सुकुमारें चित्रें विचित्रें॥सुरंगरंगाचीं अपारें॥नानावर्णे ॥ ८४ ॥ तें चि साजिरें नाभिकमळ ॥ जें ब्रह्मदेवाचें जन्ममूळ॥तया कमळाचा नळ॥ त्याचा अंत न लागे ॥ ८५ ॥ विधि जन्मे नाभिकमळा ॥ मनीं आवेश आगळा ॥ पाहीन ह्मणे जन्ममूळा ॥ तर्कनळाचे बळें ॥ ८६ ॥ त्या मूळा शोधन करी ॥ तो न लागे दुरिचा दुरी ॥ निर्बुजोनियां माघारीं ॥ वृत्ति मुरडे ॥ ८७॥ तयेनि निघाला ॥ आपुले स्थानासी आला ॥ कांहीं न स्मरे बुडाला ॥ शून्यत्वडोहीं ॥ ८९ ॥ तेथें मन निर्बुजलें ॥ स्वामीचें स्तवन केलें ॥ सद्भाव देखोनि संभाळिलें ॥ सद्गुरुराजें ॥९०॥ मकटला स्वामिरावो॥ हंसरूपें देवदेवो ॥ ज्ञान देवोनियां ठावो ॥ फेडी अज्ञानाचा ॥९१॥ ह्मणोनि जन्ममूळाचा ठाव ॥ मीपणें घेईन हें वाव ॥ निर्वजला ब्र-

---

१ अधिक.

ह्मदेव॥इतर ते किती॥९२॥शोध घ्यावा हाव जेथें॥मीपण लपोनि बैसे तेथें॥मीपण योगियासी पंथें॥मार्ग न चले॥९३॥संगसोडी ना मीपण॥ह्मणोनि परमार्थ कठीण॥मीपण सोडितां खूण॥बाणे अनुभवाची॥९४॥जंव जंव कमळ वाढे॥तंव तंव कठिणता चढे॥कठिणपणें नातुडे॥जन्ममूळा॥९५॥जीवना पासोनि झालें॥जीवनासी अंतरलें॥जीवनीं परी स्पर्शिलें॥नाहीं जीवनासी॥९६॥या नांव स्वानंद जळ॥ते ऐलीकडे सकळ॥सांडूनियां गेला नळ॥भूमीच्या पाठीं॥९७॥जीवन आणि नलिनी॥मिळोनियां कमळिणी॥कमळणीचाळक धणी॥त्या स्वामित्व न लगे॥९८॥मूळमायेचें पिसें आलें घरपणाचे मिसें॥पिसेपणीं अपैसें॥पूर्णपण॥९९॥पूर्णा अपूर्णपणाचा कळंक॥अपूर्णपणें लाविती लोक॥अपूर्णा पूर्ण विवेक॥कमळकोशीं॥१००॥विवेकाचा परिमळ॥घेती संतषट्पदकुळ॥गुणगुणिती सकळ॥लोधले विवेका॥१॥परिमळ घेऊन निघाला॥तयास विवेक पावला॥विवेकेंसीं अडकला॥तयास बंधन॥२॥या परी नाभिकमळ॥उदरीं ब्रह्मांडगोळ॥मायोपाधि सकळ॥होत जात॥३॥सत् चित् आणि आनंद॥हे त्रिपुटी जीवें मंद॥ते चि सुखानंददोंद॥शोभे उत्तमाकृती॥४॥शिवशक्ती ऐक्य दिसे॥देखणें स्वयंभ असे॥विशाळ वक्षस्थळ तैसें॥शोभे दो अंगीं॥५॥वामांग चि मायाशक्ती॥दक्षिण ते पुरुषव्यक्ती॥दोनी मिळोनि आदिअंतीं॥एक ची अंग॥६॥विदेहीपणाचें कोदंड॥भग्न केलें महाप्रचंड॥ते चि मूर्तीव दोर्दंड॥ज्ञानशक्ति॥७॥तया कोदंडाचे बळें॥रजोगुण क्षत्रियमुळें॥छेदोनि ब्रह्मकुळें॥सुखी केलीं॥८॥ब्रह्मनिष्ठ ब्राह्मण केवळ॥वीधियुक्त, अचारशीळ॥विवेकसंयुक्त निर्मळ॥भ्रांती वेगळे॥९॥सत्वगुणाचे आधारें॥भजती हर्षे

१ न लागे.

थोरें ॥ तैसीं नसती पामरें ॥ रजोगुणी ॥ १० ॥ रजोगुणी क्षत्रिय झाले ॥ ब्राह्मण राज्यभ्रष्ट केले ॥ अवघे आपण चि झाले ॥ अधर्मी दुरात्मे ॥११॥ माझें करित धांवती ॥ सात्त्विक पळोनी जाती॥ सावकाश राज्य करिती ॥ रजोगुण क्षत्रिय ॥ १२ ॥ ह्मणोनि षष्ठावतार ॥ महाप्रतापी विचार॥ तेणें रजोगुणसंहार ॥ बळें केला ॥ १३ ॥ राज्य दिलें ब्राह्मणांसी ॥ आनंद जाला सात्त्विकांसी ॥ पुनःपुन्हा क्षत्रियांसी ॥ देशधडी केलें ॥ १४ ॥ जगीं क्षत्रिय महाक्रूर ॥ परम प्रतापी अनावर ॥ तयां निर्दाळूनि विचार ॥ आनंद मानी ॥ १५ ॥ तया विचाराचें ज्ञातेपण ॥ तें कोदंड महाकठीण ॥ अभंग जाणोनि पण ॥ विदेहें केला ॥ १६ ॥ सकळ पृथ्वीचे ठायीं॥ कोदंड भंगीसा नाहीं ॥ परम प्रतापी ते ही॥साशंक झाले ॥१७॥ रामीं शरण अनन्यभावें ॥ तेंहीं स्वयें राम चि व्हावें ॥ राम जालिया स्वभावें ॥ भंगे धनुष्य ॥ १८ ॥ परंतु हें महाप्रचंड ॥ भंगलें न जाय कोदंड ॥ कठीण ज्ञातेपणाचें बंड ॥ भंगणार नाहीं ॥ १९ ॥ ऐसें जें कां अनावर ॥ गुणीं लावून केलें चूर ॥ ते चि दोर्दंड अपार ॥ ज्ञानशक्ति जेथें ॥ २० ॥ तये शक्तीचे नि बळें॥ रणा आलीं महा ढिसाळें ॥ क्रूर तामसें विखाळें ॥ विक्राळवाणीं ॥ २१ ॥ गुणीं लावूनियां शर॥कुबुद्धिताटकाशिर ॥ तोडूनियां ऋषीश्वर॥सुखी केले ॥ २२ ॥ जे कुपात्रां माजी भूपण ॥ निर्दाळिले खर दूपण ॥ कपटरूपें ये हरिण ॥ तो ही पिटिला॥२३॥मकरध्वज महाबळी ॥ देवां आणि दानवां बळी ॥ जेणें घातिले पायां तळीं ॥ महानुभाव ॥ २४ ॥ अजिंकपणाचे माजें ॥ अभिळाविलें अनुजभाजे ॥ देहाभिमानफुंजें ॥ बंधु दवडिला ॥ २५ ॥ ऐसा जो परमप्रतापी ॥ वाळिया वितंडरूपी ॥ तो ही निर्दाळिला कपी ॥ दोर्दंडबळें ॥ २६ ॥ त्यांसी तया दोर्दंडशक्ती ॥ इतुकी मज कैंची मती ॥ आदि करोनि सुर-

1 त्यांनीं. 2 भुजदंड. 3 मत्तपणानें.

पती ॥ अमर मुक्त केले ॥ २७॥ निजशक्ति वानितां हरिखें ॥ सज्जन संतोषतां सुखें॥ते चि शोभती कीर्तिमुखें॥वेद वाखाणिती॥ २८॥ दोर्दंड वेष्टित बाहुवटे ॥ साहित्यप्रतापें गोमटे ॥ जेथें शत्रुकुळ आटे ॥ अहंकारादि ॥ २९ ॥ दुस्तर जे महाबळी ॥ त्यांची करोनि रवंदळी ॥ शोधूनि रणमंडळीं ॥ निर्मूळ केले ॥ ३० ॥ दुष्ट वीरांची संपली उठी ॥ तें चि वीरकंकणें गोमटीं ॥ रत्नजडित मणगटीं ॥ प्रतापकिरणें ॥ ३१ ॥ सुख पाविजे अभयकरें ॥ रत्नभूषणें मनोहरें ॥ नवविधभजनद्वारें ॥ फांकती किरणें ॥ ३२ ॥ जेथें आटती सर्व रंग ॥ तें चि साजिरें सर्वांग ॥ अतिसकुमार संग ॥ सुमनांचा न साहे ॥३३॥ सगुण निर्गुण न कळे ॥ शुद्धभावार्थें आकळे ॥ लावण्यरूप सांवळें॥ सुनीळ शोभा ॥ ३४ ॥ सत्वचंदनाचा गाळ ॥ लाविली उटी पातळ ॥ शांति वैजयंती माळ॥आपादपर्यंत॥३५॥ मूळतंतु ओंकार ॥ मातृकासुमनीं हार ॥ नानापुष्पांचे अपार ॥ रुळती गळां ॥ ३६ ॥ नित्यमुक्त मुक्ताफळें ॥ स्वप्रकाशें तीं सोज्वळें ॥ मुक्तपणाचे विटाळें ॥ स्पर्शलीं नाहींत ॥ ३७ ॥ ऐसी मुक्तमाळा साजिरी ॥ अखंड हृदया वरी ॥ अति आदरें धरी ॥ देवाधिदेव॥३८॥तया मुक्तांच्या निजवृत्ती ॥ किरणा सारिख्या फांकती ॥ ऐक्यरूपें मिळोनि जाती ॥ निजपदकीं ॥ ३९ ॥ आकाशींचें चंद्रमंडळ ॥ केवळ पूर्णपणें वर्तुळ ॥ परम लावण्य शीतळ ॥ अमृतमय जें ॥ ४० ॥ तया सारिखें वदन ॥ जें मंडळ कळाहीन ॥ तयासि अपूर्णपण ॥ कलंक लागला ॥ ४१ ॥ मागां वर्णिलें शरीर ॥ त्या शरीराचें निज सार ॥ तें चि वदन मनोहर ॥ आनंदमय ॥ ४२ ॥ कीं आनंदाचें ओतिलें ॥ कीं तें स्वरूप मुसावलें ॥ लावण्यासी लावण्य आलें ॥ जयाचेनी ॥ ४३ ॥ शब्द निघतां हास्यवदन ॥ शरणागतां आश्वासन ॥ तेणें झमकती दशन ॥ डाळिंबबीज

१ वर्णितां. २ नाश. ३ इच्छा. ४ मूळवर्ण.

ऐसे ॥४४॥ एकीं अनेका ऐक्य आलें ॥ ते तांबूलमिश्रित झाले ॥ एकपणें रंगोनि गेले ॥ अभिन्नत्वें ॥ ४५ ॥ अधर प्रवाळवल्ली ॥ मी ह्मणतां ऐक्या आली ॥ तेणें मिठी पडली ॥ निवांत शब्दीं ॥४६॥ अंत न कळे शब्दाचा ॥ तेथें उत्पन्न चारी वाचा ॥ वेदशास्त्रपुराणांचा ॥ विस्तार झाला ॥ ४७ ॥ निजशब्दांचें अंतर ॥ शब्दीं तयाचा विचार ॥ लब्ध होय निजसार ॥ स्वानुभवें ॥ ४८ ॥ वक्तृत्वें त्रिपुटी आटे ॥ तें चि श्रीमुख गोमटें ॥ हनुवटी चिबुक प्रकटे ॥ मंद मंद श्मश्रु ॥ ४९ ॥ समता भ्रुकुटीचा प्रकार ॥ सरळ नासिका मनोहर ॥ जेथें स्वयंमेव विहार ॥ विश्रांति घेत ॥ ५० ॥ मागें वर्णिलें पद्मपत्र ॥ तथील देखणें विचित्र ॥ लावण्य विशाळ नेत्र ॥ लक्षिले न वचती ॥ ५१ ॥ द्रष्टृपणाची त्रिपुटी ॥ लक्षअलक्षमूळ तुटी ॥ तेणें गुणें प्रकाशदाटी ॥ प्रकाशा विण ॥ ५२ ॥ चक्षूचें देखणें सरे ॥ ज्ञानदृष्टी पाहाणें निरे ॥ देखणेपणें विण उरे ॥ सर्वांगदेखणा ॥ ५३ ॥ अखंड चक्षु अर्धोन्मीलित ॥ सकळ देखण्याचा प्रांत ॥ जेथें अगोचरा सहित ॥ मुद्रा आटती ॥ ५४ ॥ श्रवण मनन निदिध्यास ॥ साक्षात्कारें जडे विश्वास ॥ परमानंद सावकाश ॥ होइजे स्वयें ॥ ५५ ॥ मुमुक्षु साधक सिद्ध झाले ॥ ते ही येणें चि मार्गें गेले ॥ निर्वळ सुखें सुखावले ॥ महानुभाव ॥ ५६ ॥ योगी वीतरागी उद्दाम ॥ चतुर्थाश्रम जो संन्यास ॥ दिगंबर नाना तापस ॥ येणें चि मार्गें ॥ ५७ ॥ जोगी जंगम आणि सोपी ॥ फकीर कलंदर नाना रूपीं ॥ येणें चि मार्गें स्वरूपीं ॥ पावती सकळ ॥ ५८ ॥ ऋषि मुनि आणि सुरवर ॥ आदि करूनियां हरिहर ॥ येणें चि मार्गें पैल पार ॥ पावती सकळ ॥ ५९ ॥ असो ऐका श्रवण पुढें ॥ श्रोतव्य त्रिपुटी आटे ॥ परम गुह्य प्रकटे ॥ अनिर्वाच्य ॥ ६० ॥ तें चि कुंडलें मनोहरें ॥ रत्नजडित मकरा-

१ जाती. २ अत्यंत. ३ विरक्त.

कारें ॥ तळपती श्रोत्र भारें ॥ लंबित झाले ॥ ६१ ॥ शुद्धस्वरूपीं शुद्ध ज्ञान ॥ आहे चि तेंचि विलेपन ॥ मृगमदमिश्रित चंदन ॥ नाना परिमळ ॥६२॥ मनोमृगातें मारूनी ॥ काढिली कस्तूरी उन्मनी ॥ द्वैतरूपें विलेपनीं ॥ ऐक्यता झाली ॥ ६३ ॥ शुद्धस्वानुभवाचीं फुलें ॥ तीं मस्तकीं चांचेलीं तेलें ॥ तें ही मस्तकीं जिरालें ॥ ऐक्यरूपें ॥ ६४ ॥ तेणें बळें चांचर कुरळ ॥ बाहेर आले प्रबळ ॥ जेथें बद्धपणाचा मळ ॥ निःशेष नाहीं ॥ ६५ ॥ अतिसूक्ष्मीं सूक्ष्मदृष्टी ॥ ते चि साजिरी वीरगुंठी ॥ पाहतां तर्ककळा मोठी ॥ मागें राहिली ॥ ६६ ॥ जेथें तर्कजाणीव गळाली ॥ ती च किरीटीं झळाली ॥ जेथोनि फांकती कपाळीं ॥ रम्य किळा[1] ॥ ६७ ॥ जें इतुक्यांचा शेवट ॥ तो चि मस्तकीं मुकुट ॥ जेथोंनि सर्व ही खटपट ॥ निवांत झाली ॥ ६८ ॥ ऐशी सर्वां भूतीं भूषित ॥ स्वयंभ मूर्ति आदि अंत ॥ सृष्टिरचना होत जात ॥ द्वारा तयाच्या ॥ ६९ ॥ राम लक्ष्मण सीता ॥ भरत शत्रुघ्न हनुमंता ॥ सकळिकां भक्तांसी ऐक्यता ॥ भेटी झाली ॥ ७० ॥ मागां जाहले आतां होती ॥ होऊनि नाहीं पुनरावृत्ति ॥ ऐसी अभंग ऐक्यस्थिति ॥ वर्तल्या सहित ॥ ७१ ॥ सकळ भक्त मिळाले ॥ हरिहरब्रह्मादि आले ॥ ऐक्यरूपें राम झाले ॥ रामें सहित ॥ ७२ ॥ जितुकें दृश्य साकार ॥ आहे अनुमेय अपार ॥ तें चि उधळलें धूसर ॥ रक्त श्वेत सुगंध ॥ ७३ ॥ पंचभूतीं कर्पूरगोळ ॥ ज्ञानरूपें झाला प्रबळ ॥ ओवाळूनियां सकळ ॥ निवांत झाले ॥ ७४ ॥ गेला कर्पूर जळोनी ॥ राहिल्या अनुहतध्वनी[2] ॥ ऐक्यरूपें समाधानीं ॥ सकळ राहिले ॥ ७५ ॥ चारदहांची कुरवंडी ॥ दास ओवाळूनि सांडी ॥ श्रोते वक्ते आवडी ॥ ओवाळिले ॥ ७६ ॥ इतिश्री॥निर्गुणध्यानसंपूर्ण ॥

---

१ तेजाचे किरण. २ सोऽहंशब्द.

अथ मानसपूजा.

॥ श्रीरामसमर्थ ॥ संगीतस्थळें पवित्रें ॥ तिकटया बोळंबे सूत्रें॥ निवती विस्तीर्ण स्वतंत्रें ॥ उपसाहित्याचीं ॥ १ ॥ तुळसीवनें वृंदावनें ॥ सुंदर सडे संमार्जनें ॥ ओटे रंगमाळा आसनें ॥ ठायीं ठायीं ॥ २ ॥ गवाक्षें दिंडया खिडक्या मोऱ्या ॥ बकदर्वार पाहिऱ्या ॥ सोपे माडया ओहऱ्या ॥ ठायीं ठायीं ॥ ३ ॥ ध्वज गोपुरें शिखरें ॥ भुयारें तळघरें विवरें ॥ मंडप राजांगणें गोपुरें ॥ दारवंटे ढाळजा ॥ ४ ॥ देवालयें रंगशिळा ॥ चित्रविचित्र दीपमाळा ॥ पोहिया पादुका निर्मळा ॥ आड बावी पुष्करिणी ॥५॥ विशाळ तळीं सरोवरें॥ मध्यें तळपती जळचरें ॥ ब्रह्मकमळें मनोहरें ॥ नानारंगें विकासती ॥ ६ ॥ गोमुखें पाट कालवे ॥ साधूनि बांधूनि आणावे ॥ स्थळोस्थळीं खेळवावे ॥ नळ टांकीं कारंजीं ॥ ७ ॥ पुष्पवाटिका वृक्षवनें ॥ नाना प्रकारचीं धनें ॥ पक्षी श्वापदें गोधनें ॥ ठायीं ठायीं ॥ ८ ॥ सभामंडप चित्रशाळा ॥ स्वयंपाकगृहें भोजनशाळा ॥ सामग्री गृहें धर्मशाळा ॥ मठ मठ्या नेटक्या ॥९॥ एकांतगृहें नाट्यशाळा ॥ देवगृहें होमशाळा ॥ नाना गृहें नाना शाळा ॥ नाना प्रकारीं ॥ १० ॥ ऐसीं स्थळें परोपरीं ॥ नाना युक्ती कळाकुसरी ॥ निष्कामबुद्धी जो करी ॥ धन्य तो साधु ॥ ११ ॥ इतिश्रीमानपूजा ॥ मनें पूजावे वैकुंठराजा ॥ साधकें अगत्य आत्मकाजा ॥ करीत जावीं ॥ १२ ॥

॥ श्रीरामसर्थ ॥ आतां पारिपत्य ऐकावे ॥ उत्तमगुणाचे आघवे ॥ जयांस देखतां मानवे ॥ विश्वलोक ॥ १ ॥ धीर उदार सुंदर ॥ दक्ष व्युत्पन्न चतुर ॥ सकळप्रयत्नीं तत्पर ॥ अत्यादरें ॥ २ ॥ दूरदृष्टी दीर्घप्रयत्नी ॥ समय प्रसंग जाणे चिन्हीं ॥ नासला फड नेटका वचनीं ॥ बोलोन करिती ॥ ३ ॥ जाणती दुसऱ्याचें अंतर॥ सावधानता निरंतर ॥ नेमस्त न्यायाचें उत्तर ॥ बाष्कळ नाहीं॥ ४॥

१ देवळ्या. २ कामगार लोक.

पवित्रवामनेंचे उदास ॥ केवळ भगवंताचे दास ॥ मारामारविचारें वास ॥ हृदयीं केला ॥ ५ ॥ अगाध अव्यग्र धारणा ॥ मिळोनि जाती राजकारणा ॥ कार्यभागाची विचारणा ॥ यथायोग्य योजिती ॥ ६ ॥ न्याय नीती मर्यादेचा ॥ स्नानसंध्या पवित्रतेचा ॥ सत्यवादी बहुत ओजा ॥ अन्याय क्षमित ॥ ७ ॥ चुकणें विसरणें असेना ॥ मत्सर पैशून्य दिसेना ॥ कोप क्षणिक असेना ॥ निरंतर ॥ ८ ॥ हरिकथानिरूपण ॥ तेथें प्रेमळ अंतःकरण ॥ पाहों जातां उत्तम लक्षण ॥ उत्तम असे ॥ ९ ॥ ऐशा प्रकारचे पारपत्य ॥ करूं जाणती सकळ कृत्य ॥ धन्यधन्य कृतकृत्य ॥ निष्कामतेनें ॥ १० ॥ ऐसे भले परमार्थी ॥ श्रवण मनन अर्थाअर्थी ॥ जे परलोकींच स्वार्थी ॥ परोपकारी ॥ ११ ॥ इति श्री० ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥ आतां ऐका स्वयंपाकिणी ॥ बहु नेटक्या सुगरिणी ॥ अचुक जयांची करणी ॥ नेमस्त दीक्षा ॥ १ ॥ शुचिष्मंत बाह्य निर्मळ ॥ साक्षेपणी बहु चंचळ ॥ नेमक निशंक केवळ ॥ उमा रमा ॥ २ ॥ ज्यांची भगवंतीं आवडी ॥ श्रीहरिभजनाची गोडी ॥ मना पासोनि आवडी ॥ कथाकीर्तनाची ॥ ३ ॥ शक्ति युक्ति बुद्धि विशेष ॥ नाहीं आळसाचा लेश ॥ कार्यभागाचा संतोष ॥ अतिशयेंसीं ॥ ४ ॥ कदा न आवडे अनर्गळ ॥ वस्त्रें पात्रें झळफळ ॥ नेमक करणें ढसाळ[1] ॥ यथातथ्य ॥ ५ ॥ गोड स्वादिष्ट रुचिकर ॥ एकहृदय तत्पर ॥ न्यूनपूर्णाचा विचार ॥ कदापि न घडे ॥ ६ ॥ रोगी अत्यंत खंगले ॥ तेणें अन्न भक्षिलें ॥ भोजनरुचीनें गेलें ॥ दुखणें तयाचें ॥ ७ ॥ तेथें उत्तम चि आघवें ॥ काय घ्यावें काय सांडावें ॥ जेवीत जेवित जेवावें ॥ ऐसें वाटे ॥ ८ ॥ उत्तम अन्नें निर्माण केलीं ॥ नेणों अमृतें घोळिलीं ॥ अगत्य पाहिजेत भक्षिलीं ॥ ब्रह्मादिकीं ॥ ९ ॥ सुवासें चि निववी प्राण ॥ तृप्त चक्षु आणि घ्राण ॥ काढून आणिलें

१ बहाडखोरपणा.

गोडपण ॥ कांहीं कळेना ॥ १० ॥ भव्य स्वयंपाक उत्तम ॥ भोजनकर्ते सर्वोत्तम ॥ दास ह्मणे भोक्ता राम ॥ जगदंतरीं ॥ ११ ॥ इति श्रीमानसपूजा० ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥ लोणचीं रायतीं वळवटें ॥ वडे पापड मेतकुटें ॥ मिरकुटें ॥ डांगरकुटें ॥ मिरेघाटें सांडगे ॥ १ ॥ नाना प्रकारच्या काचऱ्या ॥ सांडया कुरवडया उसऱ्या ॥ कोशिंबिरीच्या मामोग्ऱ्या ॥ नाना जिनसीं ॥ २ ॥ सूरण नेटके पचविले ॥ आंबे आवळे घातले ॥ आलें लिंबें आणिलें ॥ घोंस मिऱ्यांचे ॥ ३ ॥ कुड्या बेलें माईनमुळें ॥ भोकरें नेपत्तीं सारफळें ॥ कळकं कांकडी सेवग मुळें ॥ सेंदण्या वांगीं गाजरें ॥ ४ ॥ मेथी चाकवत पोकळा ॥ माठ शेपू बसळा ॥ चंवळी चंवळा वेळवेळा ॥ चिवळ घोळी चिमकुरा ॥ ५ ॥ वांगीं शेंगा पडवळीं ॥ दोडके कारलीं तोंडलीं ॥ केळीं भोपळे कोहाळीं ॥ गंगाफळें काशीफळें ॥ ६ ॥ कणकी सोजी सांजे सपिठें ॥ नाना डाळी धुतलीं पिठें ॥ रवे कण्या पिठी पिठें ॥ शुभ्रवर्णे ॥ ७ ॥ बारिक तांदुळ परिमळिक ॥ नाना जिनसींचे अनेक ॥ गूळ साखर राब पाक ॥ तूप तेल मध राब ॥ ८ ॥ दूध दहीं दाट साय ॥ ताक लोणीं कोण खाय ॥ नाना शिखरिणीचे उपाय ॥ आरंभिले ॥ ९ ॥ हिंग जिरें मिरें सुंठी ॥ कोथिंबीर आंवळकाठी ॥ पिकलीं लिंबें सदेटीं ॥ मेथ्या मोहऱ्या हळदी ॥ १० ॥ द्रोण पानें पत्रावळी ॥ ताटें दुरड्या दराळी ॥ सुपें हारे विचित्र पाळीं ॥ नाना उपसामग्री ॥ ११ ॥ इति श्री० ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥ रांजण मांदण डेरे घागरीं ॥ कुंडालें मडकीं तोवरी ॥ तवल्या दुधाणीं अडघरीं ॥ मोघे गाडगीं करोळे ॥ १ ॥ ऐसीं नाना जिनसीं मडकीं ॥ कामा न येतीं थोडकीं ॥ लहान थोर अनेकीं ॥ एक ची नांव ॥ २ ॥ हंडे चरव्या तपेलीं पाळीं ॥ काथवट्या ताह्मणें मुदाळीं ॥ तांबे पंचाळें वेळण्या पाळीं ॥ झाऱ्या चंब

पंचपात्र्या ॥ ३ ॥ धातुकळशा बहुगुणीं ॥ पूर्वी खेळविलें पाणीं ॥ गुंडग्या झांकण्या कासरणीं ॥ बहुविधा ॥ ४ ॥ विळ्या पळ्या पाटे वरोटे ॥ काहिला तवे मोठे मोठे ॥ थावर तेलतवे कढई मोठे ॥ सामोग्रीचे ॥ ५ ॥ चुली भाणस आवील ॥ तिसऱ्या थाळी ओतळ ॥ शुभ्रा काष्ठें बहुसाल ॥ पाट चाटू सोरणीं ॥ ६ ॥ पोळपाट आटणीं घाटणीं ॥ परळ वेळण्या दिवेलावणीं ॥ खंदील रोवणी दिवेलावणीं ॥ सरक्या वाती काकडे ॥ ७ ॥ स्वयंपाकगृहें बोलिलीं ॥ सडासामर्जनें केलीं ॥ सोंवळीं वाळू घातलीं ॥ आणिलीं अंग्रोदकें ॥ ८ ॥ इकडे सागुऱ्या सिद्ध केल्या ॥ तिकडे चुली पेटविल्या ॥ अंगें धुऊनी बैसल्या ॥ स्वयंपाकिणी ॥ ९ ॥ पात्रें धुवून पाहिलीं ॥ पुन्हा धुतलीं धुवविलीं ॥ उदकें गाळूनि घेतलीं ॥ सोंवळ्या मध्यें ॥ १० ॥ पुढें आरंभ स्वयंपाकाचा ॥ समुदाव स्वयंपाकिणींचा ॥ नैवेद्य मांडला देवाचा ॥ सावकाश ॥ ११ ॥ इतिश्री० ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥ इकडे स्वयंपाक चाली लाविले ॥ पारपत्य स्नान करोनि आले ॥ देवदर्शन घेवोनि समर्पिले ॥ खाद्यनैवेद्य ॥ १ ॥ तो चि प्रसाद घेवोनि आले ॥ पारपत्य फराळा बैसले ॥ कित्येक ब्राह्मण ही मिळाले ॥ निराश्रयी ॥ २ ॥ इकडे धर्मशाळा असती ॥ तेथें घातल्या पंगती ॥ न्यायनीतीनें वाढती ॥ दीर्घपात्रीं ॥ ३ ॥ लवणशाखा कोशिंबिरी ॥ सांडगे पापड मिरघाटें हारी ॥ मेतकुटें नेलचटें परोपरी ॥ नाना काचऱ्या ॥ ४ ॥ फेण्या फुग्या गुरवळ्या वडे ॥ घारगे गुळवे दहींवडे ॥ लाडू तिळवे मुगवडे ॥ कोडबोळीं अनारसे ॥ ५ ॥ उदंड दुधें आणविलीं ॥ तक्रें हाचिकरें करविलीं ॥ दाट दह्यें सिद्ध केलीं ॥ पात्रें भरूनी ॥ ६ ॥ ओळी द्रोणाच्या ठेविल्या ॥ नाना रसीं पूर्ण केल्या ॥ साई

१ गोवऱ्या. २ मार्गांत भूमीला उदक पात्राचा स्पर्श न होतां आणिलेलें उदक.

शर्करा घातल्या ॥ नाना सोज्या ॥ ७ ॥ थिजलीं आणि विघु-
र्लीं ॥ घृतें उदंड रिचविलीं ॥ उदकें भरोनि ठेविलीं ॥ निर्मळ
शीतळ सुवासें ॥ ८ ॥ सुंठ भाजिली हिंग तळिला ॥ कोथिंबिरी वा-
टूनि गोळा केला ॥ दधितक्रीं कालाविला ॥ लवणें सहित ॥ ९ ॥ बा-
रीक परिमळिक पोहेकुट्टा ॥ उत्तम लाह्यांचा सुंदर कुट्टा ॥ उत्तम
दाधि घालून चोखटा ॥ मुदा केल्या ॥ १० ॥ यथासाहित्य फलाहार
केले ॥ चूळ भरून विडे घेतले ॥ पुन्हा मागुते प्रवर्तले ॥ कार्यभा-
गासी ॥ ११ ॥ इतिश्री० ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥ सकळ शाका सिद्ध केल्या ॥ निसल्या धुतल्या
सांभाळिल्या ॥ पात्रीं भरोनी ठेविल्या ॥ चुली वरी ॥ १ ॥ पुरणाचे
हंडे चढविले ॥ कणीकढीग भिजविले ॥ सांजे उकडोनी सिद्ध
केले ॥ भक्षा कारणें ॥ २ ॥ काणिक धबधबा कांडिती ॥ शुभ्रलवण-
मिश्रित करिती ॥ कित्येक पुरण वाटिती ॥ चमत्कारें ॥ ३ ॥ तवे
तेलतवे चढविले ॥ एक तेलें एक तुपें भरिले ॥ तप्त होतां सणस-
णले ॥ असंभाव्य ॥ ४ ॥ एक भक्षें लाटिती ॥ एक वरणें घाटिती ॥
एक कणकी माळिती ॥ मांडे पुऱ्याच्या ॥ ५ ॥ मांडे रांजणा घातले ॥
तवे तेलतवे भरले ॥ कडकडूं ते लागले ॥ सणसणाटें ॥ ६ ॥ वडे ते-
लवऱ्या सांजवऱ्या ॥ घारगे मांडे गुळवऱ्या पुऱ्या ॥ पोळ्या पुरण-
पोळ्या ॥ झारोळ्या नाना परी ॥ ७ ॥ उखऱ्या रोट्या कानवले ॥
धिरडीं वेढण्या कानवले ॥ पात्या आइते खांडव्या केले ॥ दिवे दो-
कळे उंबरे ॥ ८ ॥ कण्या कोथिंबिरी घातल्या ॥ फोडण्या नेमस्त
दिधल्या ॥ शाका शिजल्या उतरल्या ॥ तेला तुपाच्या ॥ ९ ॥
नाना क्षिरी सिद्ध केल्या ॥ उदंड दुधें आळिल्या ॥ नाना शर्करा
आणिल्या ॥ शोधूनि पात्रीं ॥ १० ॥ शुभ्र ओदनें सुवासें ॥ सुगंध
उठला नानारसें ॥ रुचिर कथिका सावकाशें ॥ स्वयंपाक झाला
॥ ११ ॥ इतिश्रीमानपूजा० ॥

श्रीरामसमर्थ ॥ दुधें तुपें आणविलीं ॥ लोणचीं रायतीं काढिलीं ॥ मेतकुटें ॥ १ ॥ नाना काचऱ्या तळिल्या ॥ कोशिंबिरी सिद्ध केल्या ॥ नाना शिखरिणी झाल्या ॥ द्रोण पानें पत्रावळी ॥ २ ॥ ब्राह्मण स्नान करोनि आले ॥ एक देवार्चना बैसले ॥ एक ते करूं लागले ॥ वेदघोष ॥ ३ ॥ चित्रविचित्र सोवळीं ॥ सुरंग नेसले प्रावरणें केलीं ॥ कित्येकीं देवार्चनें मांडिलीं ॥ ठायीं ठायीं ॥ ४ ॥ एक ध्यानस्थ बैसले ॥ एकीं जप आरंभिले ॥ एक करिते झाले ॥ प्रदक्षिणा नमस्कार ॥ ५ ॥ पंचामृतें सांग पूजा ॥ ब्राह्मणीं आरंभिली ओजा ॥ राम त्रैलोक्याचा राजा ॥ अर्चिते झाले ॥ ६ ॥ नाना सुगंधिक तेलें ॥ मंगळस्नान आरंभिलें ॥ अंग पुसोनि नेसविलें ॥ पीत वस्त्र ॥ ७ ॥ नाना वस्त्रें अलंकार ॥ गंधाक्षता कुंकुम केशर ॥ उटी देवोनि माळा हार ॥ उदंड घातले ॥ ८ ॥ उदंड उधळिलीं धूमरें ॥ वाद्यें वाजती मनोहरें ॥ गर्जती जयजयकारें ॥ करताळी नामघोष ॥ ९ ॥ धूप आरती आरंभिली ॥ उदंड नीराजनें चालिलीं ॥ भक्तजनें सुखी केलीं ॥ दानपात्रें ॥ १० ॥ जितुकीं अन्नें सिद्ध केलीं ॥ तितुकीं देवापुढें ठेविलीं ॥ उदकें ठेवोनि सोडिलीं ॥ पट्टकुळ ॥ ११ ॥ इतिश्रीमानस० ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥ देव वासाचा भोक्ता ॥ सुवासें होय तृप्तता ॥ येरवीं त्या समर्था ॥ काय द्यावें ॥ १ ॥ विडे होते सिद्ध केले ॥ अवघे देवा पुढें ठेविले ॥ कित्येक ढीग झाले ॥ उत्तम फळांचे ॥ २ ॥ द्रव्य ओवाळूनि टाकिलें ॥ नाना प्रकारें दान केलें ॥ मंत्रपुष्प समर्पिलें ॥ भक्तजनीं ॥ ३ ॥ देवें केलें सुखासन ॥ आतां ब्राह्मणभोजन ॥ पारपत्य स्नान करोन ॥ सिद्ध होती ॥ ४ ॥ बैसविल्या ब्राह्मणांच्या ओळी ॥ द्रोण पानें पत्रावळी ॥ पात्रें प्रोक्षून सकळी ॥ वाढिते झाले ॥ ५ ॥ तिकडे वाढण चालतें ॥ इकडे होती गंधाक्षतें ॥ ब्राह्मणांचीं घेवो-

---

१ पडदे.

नि तीर्थें ॥ पुढें पूजन आरंभिलें ॥६॥ गंधाक्षता चालविती ॥ एक सुगंध चर्चिती ॥ एक धूसर टाकिती ॥ घालिती माळा ॥७॥ एक आरती धूपारती ॥ पूजा यथासांग करिती ॥ ब्राह्मणा सांग घालिती ॥ नमस्कार॥८॥ उत्तम पानें साग्र सरळीं ॥ लांब रुंद आणि कोंवळीं ॥ शाखा लवण मोठया ओळी ॥ तेथें दाटल्या ॥ ९ ॥ लवण मेथकुटें कोशिंबिरी ॥ डांगर रायत्यांच्या परी ॥ सांडगे कुरवडया हारी ॥ चटण्या असती ॥१०॥ ऐसीं सर्व भक्ष्यें केलीं॥ तितुकीं यथान्वयें वाढिलीं ॥ शुभ्र ओदनें शोभलीं ॥ मध्यभागीं ॥ ११ ॥ इतिश्रीमानस० ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥ वाढिलीं नाना परमान्नें ॥ सुवासें शोभती वरान्नें ॥ दूध दहीं द्रोणे ॥ भरूनि ठेविले ॥ १ ॥ नाना शिखरिणी वाढिल्या ॥ उदंड शर्करा घातिल्या ॥ ऊन कथिका आतिल्या ॥ आणि वडे ॥ २ ॥ रुचिकर वडे वाढिले ॥ तुपें द्रोण भरिले ॥ पुढें भक्त उभे राहिले ॥ संकल्प सांगती॥३॥मग संकल्प सोडिला॥तेणें मोठा आनंद झाला॥नामस्मरणें घोष केला॥भोजन आरंभिलें ॥४॥ आपोशनें केलीं समस्तीं ॥ मग घेती प्राणाहुती ॥ शिखा सोडोनी वामहस्तीं ॥ नेत्रस्पर्श करिती ॥ ५ ॥ उदंड अन्नें वाढोनि गेले ॥ आवडी सारिखे जेवूं लागले ॥ पुन्हः पुन्हा वाढिते झाले ॥ सद्यघृतें ॥ ६ ॥ भक्ष्यें मोडितां गुट्टल्या होती ॥ तुपा मध्यें बुडविती ॥ वरपवरजोनि जेविती ॥ कितीएक ॥ ७ ॥ आंबट तिखट खारट तुरटें ॥ शाखा सांबारीं नेलचटें ॥ तांडीं लाविती यथेष्टें ॥ यथान्वयें ॥ ८ ॥ पात्रा मध्यें वाढिती ॥ होतां सर्व चि वाढिती ॥ कित्येक आग्रह करिती ॥ परस्परें॥९॥उदकें शीतळ सुवासें ॥ घेऊं लागले सावकाशें॥ कितीएक पुन्हा भक्ष्यें ॥ जेऊं लागे॥१०॥किती जेविती परमान्नें॥

---

१ वरणं. २ लोणकढी-

किती टाकिती अन्नें ॥ पुन्हा घेती अन्नें ॥ उदंड वाढिती ॥ ११ ॥ इतिश्री० ॥ मानसपूजा० ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥ शिखरिणी वरपिती सरारां ॥ कढी वरपिती फरारां ॥ ढेकर देती डरारां ॥ सावकाशें ॥ १ ॥ एक ते गुचक्या देती॥उदकें मागुती मेविती ॥ हात टेकोनि जेविती॥ कित्येक ॥२॥ भोजनें कंठमर्याद झालीं ॥ मग दध्योदनें आणाविलीं ॥ तक्रें वोघारुनि घेतलीं द्रोणा मध्यें॥३॥गद्य पद्य प्रबंध श्लोक॥नामस्मरणें जेवितां लोक॥ब्राह्मणमुखें जगन्नायक॥संतुष्ट झाला ॥ ४ ॥ एकीं ठाव शुद्ध केले॥एक अर्ध अन्न जेविले॥एक ते विसरोनि गेले पदार्थ ठायींचे ॥५॥समस्तांचीं भोजनें झालीं॥उत्तरापोशनें घेतलीं ॥ सर्वेचि उदकें दिधलीं ॥ आंचवाया ॥ ६ ॥ तांबूलभाग बहुत॥पानें सुपारी चुना कात ॥ पत्री लवंग कर्दळीसुत[1] ॥ वेळा कंकोळ जायफळें ॥ ७ ॥ विडे दक्षिणा पावल्या ॥ मंत्राक्षता दिधल्या ॥ ब्राह्मणमंडळ्या चालल्या ॥ मंडपा मध्यें ॥८॥ नाना दानांचिया राशी॥ उदंड दिधल्या ब्राह्मणांसी ॥ पशु वस्त्रें द्रव्यासी ॥ नेम नाहीं ॥९॥ ऐशा उदंड पंक्ती झाल्या ॥ पारपत्य स्वयंपाकिणी जेविल्या॥मग पंक्ती आरंभिल्या ॥ इतर लोकांच्या ॥ १० ॥ सकळ लोक तृप्त झाले ॥ समस्तांसि विडे दिल्हे ॥ आस्तमानही झाले ॥ मंडपीं दीप लागती ॥ ११ ॥ इतिश्री० ॥ मानसपूजा० ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥ नाना बैठका सिद्ध केल्या॥नाना समया पाजळल्या॥नाना पदार्थी ठेविल्या॥ठायीं ठायीं॥१॥खांदिल रोवण्या लांबणदिवे॥दिवट्या हिलालांचे थवे॥देवद्वारीं चालिले अघवे ॥ सायंकाळीं ॥ २ ॥ पारपत्य मंडळी आली ॥ सायंकाळपूजा मांडिली॥ब्राह्मणांची दाटी झाली॥उदंड तेथें॥३॥पारपत्य वेत्रधारी॥ उभे राहिले उभयहारी ॥ नाना वाद्यें वाजंत्री॥वाजविती॥४॥जाई

---

१ दहींभात. २ कापूर.

या नांव दुसरी भक्ती ॥ ऐक तिसरीची स्थिती ॥ सर्वकाळ आदरें चित्तीं ॥ नाम असावें ॥ १३ ॥ चवथी पादसेवन ॥ पांचवी असे अर्चन ॥ सकळांचें करावें पूजन ॥ विधी प्रमाणें ॥ १४ ॥ सकळवंदन सहावी ॥ दास्य ही सातवी ॥ आतां ऐका आठवी ॥ भक्ति कैशी ॥ १५ ॥ सखा देव चि मानावा ॥ अखंड तो चि आठवावा ॥ भार आभार घालावा ॥ तया वरी ॥ १६ ॥ नववी ते अद्वैत जाण ॥ करावें आत्मनिवेदन ॥ विचार घेतां अभिन्न ॥ मुळीं च आहे ॥ १७ ॥ हें नवविध भजन ॥ सायुज्यमुक्तिसाधन ॥ तेणें करितां शुद्ध ज्ञान ॥ प्राण्यास होय ॥ १८ ॥ शुद्धज्ञानाचे बळें ॥ अंतरीं वैराग्य प्रबळे ॥ तेणें लिंगदेह मोकळें ॥ होय वासनेसीं ॥ १९ ॥ लागे स्वरूपानुसंधान ॥ नाठवे देहाभिमान ॥ विश्रांतीतें देखे मन ॥ तद्रूप होय ॥ २० ॥ आदिपुरुष एकला ॥ नाहीं द्वैताचा गलबला ॥ संगत्यागें अवलंबिला ॥ शुद्ध एकांत ॥ २१ ॥ तेथें मन पांगुळलें ॥ आपणास विसरलें ॥ आपणास भुलोन गेलें ॥ स्वरूपबोधें ॥ २२ ॥ मी कोण हें न कळे ॥ अवघा आत्मा प्रबळे ॥ तेणें बळें मन मावळे ॥ कर्पूरन्यायें[1] ॥ २३ ॥ तेथें शब्द कुंठित झाला ॥ अनुभव अनुभवीं निमाला ॥ आतां असो हा गलबला ॥ कोणीं करावा ॥ २४ ॥ वाटे एकांतासी जावें ॥ पुन्हा हें अनुभवावें ॥ उगें निवांत असावें ॥ कल्पकोटी ॥ २५ ॥ नको वक्तृत्वोपाधि ॥ पांगुळली स्वरूपीं बुद्धि ॥ लागली सहजसमाधि ॥ हेतुरहित ॥ २६ ॥ गुरु शिष्य एक झाले ॥ अनुभवबोधीं बुडाले ॥ त्याचे शुद्धीस जे गेले ॥ तयां ती च गति ॥ २७ ॥ तुटला संसारबंधु ॥ आटोनि गेला भवसिंधु ॥ बुडाला बोधीं प्रबोधु ॥ विवेकबळें ॥ २८ ॥ ज्ञानाग्नि प्रकट झाला ॥ मायाकर्पूर जळाला ॥ विवेकें अविवेक ग्रासिला ॥ तये ठायीं ॥ २९ ॥ झालें साधनाचें फळ ॥ चुकलें जन्माचें मूळ ॥ निष्कलंक आणि निर्मळ ॥ तो चि आत्मा

---

१ कापुराप्रमाणें.

॥ ३० ॥ दृढ बाणली आत्मस्थिति ॥ मिथ्यात्वें मुरडली वृत्ति ॥ सांगिजे वर्तनगति ॥ पुढील समासीं ॥ ३१ ॥ श्रीराम ॥ समास ॥ ४ ॥

॥ श्रीराम समर्थ ॥ आतां शिष्या सावधान ॥ मागील कथानुसंधान ॥ झालिया आत्मनिवेदन ॥ आली वृत्ति मिथ्यात्वें ॥ १ ॥ धन पाहोनी लोभी आले ॥ परी मन तेथें च बैसलें ॥ शरीरप्रकृती प्रवर्तले ॥ भ्रांता परी ॥ २ ॥ कार्य करी प्रपंचाचें ॥ ध्यान लागलें धनाचें ॥ अंतर गुंतलें तयाचें ॥ द्रव्याकडे ॥ ३ ॥ ऐसें उपरत झालें मन ॥ ध्यानीं आठवे धन ॥ पिसें लागलें स्वप्न ॥ तैसें चि देखे ॥ ४ ॥ तो ज्ञाता समाधानीं ॥ प्रारब्धयोगें वर्ते जनीं ॥ परी अनुसंधान मनीं ॥ वेगळें ची ॥ ५ ॥ वृत्ति गुंतली स्वानुभवें ॥ जनीं तें चि भासे अघवें ॥ सबाह्य व्यापिलें देवें ॥ ब्रह्मांड अवघें ॥ ६ ॥ वृत्ति मुळा कडे पाहे ॥ त्यास राम दिसताहे ॥ स्तब्ध होवोनियां राहे ॥ राम चि दिसे ॥ ७ ॥ मन मुरडे आले वाटे ॥ तंव मार्गीं राम भेटे ॥ मागें पुढें प्रकटे ॥ राम चि अवघा ॥ ८ ॥ दाही दिशा अवलोकितां ॥ राम चि भासे तत्वता ॥ वदन चुकवूं जातां ॥ सम्मुख राम ॥ ९ ॥ राम झालिया सम्मुख ॥ कल्पांतीं नव्हे विमुख ॥ नेत्र झाकितां अधिक ॥ राम चि दिसे ॥ १० ॥ मग विसरोनि पाहिलें ॥ तंव तें राम चि झालें ॥ जीव सर्वस्वें वेधिलें ॥ संपूर्ण रामें ॥ ११ ॥ मग आपणा पाहे ॥ तंव राम चि झाला आहे ॥ उभयसाक्षी जो राहे ॥ तो चि राम ॥ १२ ॥ रामें विण सर्वथा कांहीं ॥ अणुमात्र रितें नाहीं ॥ दृश्य द्रष्टा दर्शन तें ही ॥ राम चि भासे ॥ १३ ॥ प्रपंच सारिला मानसें ॥ दृढ लागलें रामपिसें ॥ देह वर्ते भ्रमिष्ट जैसें ॥ पिशाचवत ॥ १४ ॥ रामरूपीं वेधलें मन ॥ तेणें राहे कुलाभिमान ॥ पूर्वदशेचें लक्षण ॥ पालटोनि गेलें ॥ १५ ॥ धरूनि रामरूपीं आवडी ॥ प्रपंच गेला तडातोडी ॥ माया राहे बापुडी ॥ न चले कांहीं ॥ १६ ॥ प्रत्यक्ष जन प्रकटला ॥

दृश्य पदार्थ बोधिला॥असत च नाहींसा झाला॥सद्गुरुप्रतापें १७॥ ऐसें नाहीं हेंगेतेंगे ॥ ऐसें तैसें पुढें मागें ॥ पूर्व स्थिती बोलणें लागे॥ ऐसें या परी ॥ १८ ॥ स्वरूप बोलिलें नवजाय ॥ बोलिलिया वीण हाता नये ॥ ह्मणोनि शब्द उपाय ॥ रचिला देवें ॥ १९ ॥ शब्दाचे उदरीं अगाध ॥ सांठवला नीतिबोध ॥ अर्थ पाहतां स्वानंद ॥ तुंबळे बळें ॥ २० ॥ शब्दमथन शब्दें केलें ॥ अर्थनवनीत प्रकटलें॥ मथनकर्त्यासी भक्षिलें ॥ त्या नवनीतें ॥२१॥ प्रपंचतक्रा अंतरीं॥ नवनीत वास्तव्य करी ॥ तक्र आटोनि पात्र भरी ॥ नवतीत झालें ॥२२॥ अवघें नवनीत दाटलें ॥ तें बळें पात्र फुटलें॥नवनीतें संपूर्ण झालें ॥ ब्रह्मांड अवघें ॥ २३ ॥ तेथें ही दाटलें उदंड ॥ तेणें उतटलें ब्रह्मांड॥सकळ लोपोनि उदंड॥तें चि तें झालें ॥२४॥ नवनीत प्राप्त व्हावयासी ॥ जातां तयासि तें चि ग्रासी ॥ सकळ पदार्थमात्रासी ॥ नवनीतें सेविलें ॥२५॥ सेविलें आपणा आपण ॥ हे अनुभवाची खूण॥ग्रंथ झाला संपूर्ण ॥ पंचसमासी॥२६॥सद्गुरूसी जातां शरण ॥ शीघ्र तुटे जन्ममरण॥सर्व मनोरथ पूर्ण ॥ होती वचनमात्रें ॥ २७ ॥ देह नासे क्षणांतरीं॥जाणोनि सार्थक करी॥तो एक धन्य संसारीं॥ सत्संगें ची ॥२८॥ उपजला प्राणी तो नासे॥मार्ग आपणा तो मार्ग असे ॥ ह्मणोनि दृढ विश्वासें ॥ सद्गुरुपाय धरावे ॥ २९ ॥ चाल- वीत असतां आश्रम॥जे होइजे आत्माराम ॥ऐसा हा सत्समागम ॥ महिमा कोटिगुणें ॥ ३० ॥ श्रोतीं सावध होणें ॥ अंतकाळीं लागे जाणें॥येथील राहती सजणें ॥ आणि संपत्ति ॥३१॥ वहु ज`मांचे शेवटीं ॥ नरदेह पुण्यकोटी॥ ह्मणों भगवंता भेटी॥ होती सत्संगें ॥ ३२ ॥ ऐशी खूण सकळांस ॥ सांगोनि गेला रामदास॥ सत्संगें जगदीश ॥ नेमें भेटे ॥३३॥ अरुखें बोबडी वाणी ॥ भावें पूजिला

---

९ १ फाटलें. २ आर्ष.

कोदंडपाणी ॥ न्यून पूर्ण संतजनीं ॥ क्षमा केली पाहिजे ॥ ३४ ॥ समास ॥ ५ ॥ पंचसमासीग्रंथ संपूर्ण ॥

॥ श्रीराम समर्थ ॥ स्फुटसमासी ॥ अनीती अविवेकी अन्यायी ॥ अभक्त अधर्म लंडाई ॥ वेदशास्त्र करील कायी ॥ तया मूर्खासी ॥ १ ॥ कर्माच्या ठायीं अनादर ॥ नाहीं सगुणसाक्षात्कार ॥ ज्ञान पाहतां अंधार ॥ निश्चय नाहीं ॥ २ ॥ उग्या च गोष्टी ऐकिल्या ॥ मना आल्या त्या धारिल्या ॥ रत्नें सोडूनि एकवटिल्या ॥ गुंभा जैशा ॥ ३ ॥ फाल्गुनमासींचा खेळ ॥ जैसा अवघा बाष्कळ ॥ तेथें पाहोनि निर्मळ ॥ काय घ्यावें ॥ ४ ॥ प्रत्ययज्ञानें विण ॥ करी अनुमानाचा शीण ॥ शत्रु आपणासी आपण ॥ होऊनि राहे ॥ ५ ॥ त्यासी कोणें उमजावें ॥ मानेल तिकडे न्यावें ॥ आंधळें गुरूं स्वभावें ॥ धांवे चहूं कडे ॥ ६ ॥ जिकडे तिकडे ज्ञान झालें ॥ उदंड गोसावी उतले ॥ तयांचे संगती झाले ॥ बाळकृष्ण प्राणी ॥ ७ ॥ भ्रष्ट ओंगळ अनाचारी ॥ कुकर्मी अनुपकारी ॥ विचार नाहीं अविचारी ॥ जेथें तेथें ॥ ८ ॥ गर्भांधा कैंची परीक्षा ॥ दीक्षाहीनासी दीक्षा ॥ प्रमाण मानी प्रत्यक्षा ॥ विवेकहीन ॥ ९ ॥ कशा पासून काय झालें ॥ ब्रह्मांड कोणें निर्मिलें ॥ कांहीं न कळतां भुंकलें ॥ गाढव जैसें ॥ १० ॥ जें वेदशास्त्रीं मिळेना ॥ अध्यात्म कांहीं कळेना ॥ माजला बोका आकळेना ॥ रेडा जैसा ॥ ११ ॥ कोण दीक्षा आहे कैसी ॥ अविवेकस्थिति ऐशी ॥ न पहातां वसवसी ॥ श्वान जैसें ॥ १२ ॥ ऐसे प्रकारींचे जन ॥ चित्तीं अवघा अनुमान ॥ प्रतीती वीण ज्ञान ॥ उगें च बोले ॥ १३ ॥ लक्षण नेणे अवलक्षण ॥ भाग्य नेणे करंटपण ॥ ज्ञान नेणे अज्ञान ॥ परम अन्यायी ॥ १४ ॥ एक उपदेश घेती ॥ देवतार्चन टाकून देती ॥ धर्मनीति बुडविती ॥ महापापांडी ॥ १५ ॥ म्हणती आमुचा गुरु ॥ तयाचा आगाध विचारु ॥ तेथें अवघा एकं-

---

१ गोंवऱ्या.

कारु ॥ भेद नाहीं ॥ १६ ॥ एक ह्मणती गुरु आमुचा ॥ करी अंगीकार विष्ठेचा ॥ तया सारिखा दुजा कैंचा ॥ भूमंडळीं ॥ १७ ॥ एक ह्मणती एक चि तो ॥ अखंड ओक वर्पितो ॥ बरें वाईट पाहे तो ॥ गोसावी कैंचा ॥ १८ ॥ अंगीकार करी सौख्याचा ॥ तो गोसावी काशाचा ॥ पहा गोसावी आमुचा ॥ गोहार्डीत लोळे ॥ १९ ॥ वोक नरक आणि मूत ॥ निःशंक घटघटा घेत ॥ लोकां मध्यें मोठा महंत ॥ तया ह्मणावें ॥ २० ॥ वोंगळपणाची स्थिती ॥ स्वयें ओंगळ करिती ॥ शुचिष्मंत महापंडितीं ॥ मानिजेना ॥ २१ ॥ बरें जैसें जैसें मानलें ॥ तैसें तैसें घेतलें ॥ येथें आमुचें काय गेलें ॥ होय ना का ॥ २२ ॥ एक ह्मणती अर्गळा ॥ भूताळा आणि देवताळा ॥ जनामध्यें अग्यावेताळा ॥ चेतवूं जाणे ॥ २३ ॥ ह्मणती आमुचा गुरु ॥ जाणे चेटकाचा विचारु ॥ भूतें घालून संहारु ॥ करी द्वेषियाचा ॥ २४ ॥ ह्मणती आमुच्या घरीं ॥ मोठी विद्या पंचाक्षरी ॥ चेडे चेटकीं नाना परी ॥ लोकां मध्यें ॥ २५ ॥ अखंड राहे स्मशानीं ॥ सटवी मेसको मायराणी ॥ नाना कुजंत्रें येथूनी ॥ शिकोनि जावीं ॥ २६ ॥ एक ह्मणती गोसावी ॥ गारुड्यास वेड लावी ॥ त्याचे सर्प ची पळवी ॥ चहूं कडे ॥ २७ ॥ कुसळी विद्या दृष्टिबंधन ॥ तत्काळ सभामोहन ॥ उच्चाटन आणि खिळण ॥ मोहनी विद्या ॥ २८ ॥ आमुचे गोसावी महायोगी ॥ औषधें देती जगा लागीं ॥ नपुंसक वनिता भोगी ॥ चमत्कारें ॥ २९ ॥ आमुचे गोसावी साक्षेपें ॥ अखंड करिती सोनें रुपें ॥ अंजनसाधन त्यां पें ॥ काय उणें ॥ ३० ॥ मोठा वाडिवार गुरूचा ॥ विंचू उतरी ठायींचा ॥ तैसा चि उतार सर्पाचा ॥ ठायींचा होय ॥ ३१ ॥ जंबुकमुसकें खिळावीं ॥ चोरटीं करावीं वोणवीं ॥ अखंड भूतें राबवावीं ॥ नाना जिनसीं ॥ ३२ ॥ आमुचा गुरु गुप्त होतो ॥ दुजे दिवशीं उमटतो ॥ अचेतन चाळवितो ॥ मोठा

१ राक्षसी. २ कुत्सित.

ज्ञानी ॥ ३३ ॥ व्याघ्रा वरी निःशंक ॥ हातीं सर्पाचा चाबुक ॥ वांचले होते सहस्त्र एक ॥ सामर्थ्यबळें ॥ ३४ ॥ दांत पाडोनि निघाले ॥ पांढरे केश काळे झाले ॥ किती आले आणि गेले ॥ गोसाव्या देखतां ॥ ३५ ॥ धारबंद नजरबंद ॥ नाना घुटके कामबंद ॥ पारे मोहरे नाना बंद ॥ नाना प्रकारें ॥ ३६ ॥ अग्नी मध्यें परी जळेना ॥ लोकां मध्यें परी कळेना ॥ देखतां देखतां अस्माना ॥ वेंधून जाय ॥ ३७ ॥ जाणे दुसऱ्याचे जीवींचें ॥ वांझपण फेडिलें वांझेचें ॥ मन विघडी दंपत्याचें ॥ एक ही करी ॥ ३८ ॥ त्याचें मोठें नवल कीं गा ॥ मृत्तिकेच्या करी लवंगा ॥ ब्राह्मण समंध अंगा ॥ आणून दावी ॥ ३९ ॥ मातीची साखर केवळ ॥ ढेंकळाचा करी गूळ ॥ धोत्र्यांच्या बोंडांचीं केवळ ॥ बाळकें करी ॥ ४० ॥ श्वास कोंडी दिशा कोंडी ॥ पाडी तिडकेनें मुरकुंडी ॥ धडा माणसाची मान वांकडी ॥ करून मोडी ॥ ४१ ॥ ऐशा परींच्या करामती ॥ भोंपळे पोटांत चढविती ॥ मनुष्याचे पशु करिती ॥ निमेषमात्रें ॥ ४२ ॥ गुरु भविष्य सांगती ॥ रेडया करीं वेद ह्मणविती ॥ गधडया करवीं पुराणें सांगविती ॥ सामर्थ्यबळें ॥ ४३ ॥ कुतऱ्या करवीं रागोद्धार ॥ कोंबडया करवीं तत्त्वविचार ॥ खेचर आणि भूचर ॥ सकळ बाधी ॥ ४४ ॥ घुटका घटकेनें करावा ॥ फुटका कवडा वेचों न द्यावा ॥ उदंड बचनाग साधावा ॥ एकाएकीं ॥ ४५ ॥ वाळलीं काष्ठें हिरवाळलीं[1] ॥ आंधळीं डोळसें झालीं ॥ पांगुळें धांवों लागलीं ॥ चहूं कडे ॥ ४६ ॥ गर्भिणीस कन्या कीं पुत्र ॥ हें ठावुकें आहे यंत्र ॥ गोसाव्यांनीं विद्या मात्र ॥ अभ्यासिली ॥ ४७ ॥ भांडविद्या अभ्यासिली ॥ तस्करविद्या कळों आली ॥ विचारें पाहिली ॥ वसुंधरा ॥ ४८ ॥ आमुचे गुरु अधिक उणें ॥ डोईचें करी रांधनें ॥ लोकांचे नवस पुरवणें ॥ नाना प्रकारें ॥ ४९ ॥ मेले प्राणी उठविले ॥ साकरेचें मीठ

[1] हिरवीं ( सजीव ) केलीं.

केलें ॥ गटगटा अग्नीस गिळिलें ॥ काय सांगों ॥ ९० ॥ गोसावी समाधीस बैसला ॥ दुसरे वेळे उघडून पाहिला ॥ पूर्वेचा पश्चिमेस गेला ॥ अकस्मात ॥ ५१ ॥ लिंगाचे तुकडे तोडिती ॥ कोटि लिंगें एक चि करिती ॥ मोजवून दाळी चारिती ॥ पाषाणनंदी ॥ ५२ ॥ आसन घातलें जळावरी ॥ पाहतां तो पैल तीरीं ॥ आमुचा गुरु समुद्रावरी ॥ चालत जातो ॥ ५३ ॥ पुरुषाची करी वनिता ॥ वनितेचा पुरुष मागुता ॥ अन्न खाऊन तत्वता ॥ दिशा नाहीं ॥ ५४ ॥ नाना जिन्नसीं अन्न खाणें ॥ परी उदक नाहीं घेणें ॥ शापून भस्म चि करणें ॥ ऐसा गुरु ॥ ५५ ॥ अन्न उदंड चि खाणें ॥ किंवा उपवास करणें ॥ गोमुखतोंडें जेवणें ॥ यथासांग ॥ ५६ ॥ गुरु वाघासी भेटला ॥ वाघें च चरचरा चाटिला ॥ वस्त्रें बांधोनि आणिला ॥ घरास वाघ ॥ ५७ ॥ गोसावी वाघ होतो ॥ दुसऱ्या वाघासी मारितो ॥ भुंकभुंकों चि मरतो ॥ उतार नाहीं ॥ ५८ ॥ साधी बाळांतिणीची खापरी ॥ वोंहरें साधी नाना परीं ॥ तूप घे घागरीच्या घागरी ॥ गुरु आमुचा ॥ ५९ ॥ मेल्या माशा उठविती ॥ तुळसी देवा वरी पाडिती ॥ ऐशा नाना करामती ॥ भूमंडळीं ॥ ६० ॥ आमुच्या गुरूची मोठी महंती ॥ नाना अभक्ष्य भक्षिती ॥ लोकां देखतां फुलें करिती ॥ मद्यमांसाचीं ॥ ६१ ॥ एक गोसावी पृथ्वी वरी ॥ त्याची कोणी न पवे सरी ॥ जेथें बैसे तेथें वोंहरी ॥ सावकाश करी ॥ ६२ ॥ एक गोसावी महा भला ॥ पोरीं वालवंटीं पुरिला ॥ एक तो पडोनी च राहिला ॥ कित्येक दिवस ॥ ६३ ॥ एक गोसावी भाग्य देती ॥ एक गोसावी पुत्र देती ॥ गोसाव्यानें नवस चालती ॥ नाना प्रकारें ॥ ६४ ॥ जें जें मना मध्यें चिंतावें ॥ तें तें गोसाव्यांनीं जाणावें ॥ चुकलें ठेवणें काढून द्यावें ॥ नाना प्रकारें ॥ ६५ ॥ सुडक्या मध्यें लाह्या भाजिती ॥ थोड्या द्रव्याचें उदंड

---

१ वधूवरें. २ नाश.

करिती ॥ पराचीं खबुत्रें नाचविती ॥ नाना प्रकारें ॥ ६६ ॥ हरपलें सांपडून द्यावें ॥ चोरटें तत्काळ धरावें ॥ थोडें अन्न पुरवावें ॥ बहुत जनांसी ॥ ६७ ॥ ऐसें वर्तणें लोकीं ॥ येणें सार्थक नव्हे कीं ॥ अध्यात्मविद्याविवेकीं ॥ जाणिजे तें ॥ ६८ ॥ पिंडज्ञान तत्वज्ञान ॥ आत्मज्ञान ब्रह्मज्ञान ॥ पिंडब्रह्मांड सकळ शोधून ॥ राहिलें जें ॥ ॥ ६९ ॥ पदार्थज्ञानाचा बडिवार ॥ त्याहून थोर ईश्वर ॥ ऐसे प्राणी लहान थोर ॥ सकळ जाणती ॥ ७० ॥ इति श्रीजनस्वभावगोसावी ग्रंथ संपूर्ण ॥ (दशक ४ दासबोध)

या ग्रंथाचें श्रवण मनन निरूपण भोजनोत्तर करावें. नंतर सायंसंध्येचे पूर्वीं किंवा मग श्रीहनुमद्दर्शन घेऊन श्रीसमर्थकृत भीमरूपी स्तोत्र ह्मणत अकरा प्रदक्षिणा घालाव्या ॥

॥ भीमरूपीस्तोत्र–( अनुष्टुप्छंद )

॥ श्री ॥ भीमरूपी महारुद्रा वज्रहनुमान मारुती ॥ वानरी अंजनीसुता रामदूता प्रभंजना ॥ १ ॥ महाबली प्राणदाता सकळां ऊठवी बळें ॥ सौख्यकारी शोकहर्ता धूर्तवैष्णव गायका ॥ २ ॥ दीननाथा हरीरूपा सुंदरा जगदंतरा ॥ पातालदेवताहंता भव्यसिंदूरलेपना ॥ ३ ॥ लोकनाथा जगन्नाथा प्राणनाथा पुरातना ॥ पुण्यवंता पुण्यशीला पावना परितोषका ॥ ४ ॥ ध्वजांगें उचली बाहो आवेशें लोटला पुढें ॥ कालाग्नि कालरुद्राग्नि देखतां कांपती भयें ॥ ५ ॥ ब्रह्मांड माइलें नेणों आंवळे दंतपंक्तिनें ॥ नेत्राग्नी चालिल्या ज्वाळा भृकुटी त्राटिल्या बळें ॥ ६ ॥ पुच्छ तें मुर्डिलें माथां किरीटी कुंडलें वरी ॥ सुवर्ण कटि कांसोटी घंटा किंकिणि नागरा ॥ ७ ॥ ठकारें पर्वता ऐसा नेटका सडपातळू ॥ चपळांग पाहतां मोठें महाविद्युल्लते परी ॥ ८ ॥ कोटिच्या कोटि उड्डाणें झेंपावे उत्तरे कडे ॥ मंदरा सारिखा द्रोणू क्रोधें उत्पाटिला बळें ॥ ९ ॥ आ-

णिला मागुता नेला गेला आला मनोगती ॥ मनासि टाकिलें मागें गतीसी तुळणा नसे ॥ १० ॥ अणु पासून ब्रह्मांडा एवढा होत जातसे ॥ तयासि तुळणा कैंची ब्रह्मांडीं पाहतां नसे ॥ ११ ॥ ब्रह्मांडा भोंवते वेढे वज्रपुच्छें घालूं शके ॥ तयासि तुळणा कैंची मेरुमंदर धाकुटे ॥ १२ ॥ आरक्त देखिलें डोळां गिळिलें सूर्यमंडळा ॥ वाढतां वाढतां वाढे भेदिलें शून्य मंडळा ॥ १३ ॥ भूतप्रेतसमंधादि रोग व्याधि समस्त ही ॥ नासती तूटती चिंता आनंदें भीमदर्शनें ॥१४॥ हे धरा पंधरा श्लोकीं लाभली शोभली भली ॥दृढ देहो निसंदेहो संख्या चंद्रकळागुणें ॥ १५ ॥ रामदासीं अग्रगण्यू कपिकुळाशि मंडणू॥रामरूपी अंतरात्मा दर्शनें दोष नासती ॥१६॥ इति श्रीसद्गुरुरामदासविरचितं भीमरूपीस्तोत्रं संपूर्ण ॥

नंतर आरती ह्मणावी ती ॥ कोटीच्या कोटी गगनीं उडाला ॥ अचपळ चंचळ द्रोणाचळ घेवुनि आला ॥ आला गेला आला कामा बहुताला ॥ वानरकटका[1] चुटका लावुनियां गेला ॥ जय देव जय देव जय जय बलभीमा ॥ आरती ओवाळूं सुंदर गुणसीमा ॥ जय देव जय० ॥ १ ॥ उत्कट बळ तें तुंबळ खळबळली सेना ॥ चळवळ करितां त्याशीं तुळना दिसेना ॥ उदंड कीर्ती तेथें मन हें बैसेना ॥ दास ह्मणे न कळे मोठा कीं साना ॥ जय देव जय देव० ॥ २ ॥

नंतर अकरा नमस्कार घालावे ॥ दशावतारांचीं दहा नांवें व महारुद्रहनुमते नमः ॥ असें ह्मणून नंतर करुणाष्टकें ह्मणावीं तीं॥ जय जय रघवीर समर्थ ॥

अनुदिनिं अनुतापें तापलों रामराया ॥ परम दिनदयाळा नीरसीं मोहमाया ॥ अचपळ मन माझें नावरे आवरीतां ॥ तुज विण शिण होतो धांव रे धांव आतां॥१॥ भजनरहित रामा सर्व ही जन्म गेला॥स्वजनजनधनाचा व्यर्थ म्यां स्वार्थ केला॥रघुपति मतिमा-

---

१ सैन्याला.

झी आपलीसी करावी॥सकळ त्यजुनि भावें कास तुझी धरावी॥२॥ विषयजनितसूखें सूख होणार नाहीं ॥ तुज विण रघुनाथा वोखटें सर्व कांहीं॥रघुकुळटिळका रे हीत माझें करावें॥दुरित दुरि हरावें स्वस्वरूपीं भरावें॥३॥तनु मन धन माझें राघवा रूप तूझें॥तुज विण मज वाटे सर्व संसार ओझें॥प्रचलित न करावी सर्वथा बुद्धि माझी ॥ अचळ भजनलीला लागली आस तुझी ॥ ४ ॥ चपळपण मनाचें मोडितां मोडवेना ॥ सकळस्वजनमाया तोडितां तोडवेना ॥ घडि घडि विघडे हा निश्चयो अंतरींचा ॥ ह्मणवुनि करुणा हे बोलतों दीनवाचा ॥ ५ ॥ जळत हृदय माझें जन्म कोट्यानुकोटी ॥ मज वरि करुणेचा राघवा पूर लोटीं॥तळमळ निववीं रे राम कारुण्यसिंधू ॥ षडरिपुकुळ माझें तोडिं यांचा समंधू ॥ ६ ॥ तुज विण करुणा हे कोण जाणेल माझी॥शिणत शिणत पोटीं पाहिली वाट तुझी॥ झडकरि झड घालीं धांव पंचानना रे॥ तुज विण मज नेती जंबुकी वासना रे ॥ ७ ॥ सबळ जनक माझा राम लावण्यपेटी ॥ ह्मणवुनि मज पोटीं लागली आस मोठी ॥ दिवस गणित बोटीं[1] ठेवुनी प्राण कंठीं ॥ अवचट मज भेटी होत घालीन मीठी ॥८॥ जननिजनकमाया लेंकरूं काय जाणे ॥ पय न लगत मूखीं हाणितां वत्स नेणे ॥ जलधरकणआशा लागली चातकासी ॥ हिमकर अवलोकी पक्षिया भूमिवासी ॥ ९ ॥ तुज विण मज तैसें जाहलें रामराया ॥ विलग विषमकाळीं सांडिती सर्व माया॥सकळजनसखा तूं स्वामि आणिक नाहीं ॥ विषय वमन जैसें त्यागिलें सर्व कांहीं ॥ १० ॥ स्वजनजनधनाचा कोण संतोष आहे॥रघुपति विण आतां चित्त कोठें न राहे॥जिवलग जिव घेती प्रेत सांडून जाती॥विषय सकळ नेती मागुता जन्म देती॥११॥सकळ जन भवाचे आखिले वैभवाचे॥जिवलग मज कैंचें चालतें हेंचि साचें ॥ विलग विषमकाळीं सांडि-

[1] वाईट.

ती सर्व माळी ॥ रघुविर सुखदाता सोडवी अंतकाळीं ॥ १२ ॥
सुख सुख ह्मणतां हें दुःख ठाकोनि आलें ॥ भजन सकळ गेलें
चित्त दुश्चीत झालें ॥ भ्रमित मन कळेना हीत तें आकळेना ॥ परम
कठिन देहो देहबुद्धी गळेना ॥ १३ ॥ उरपति मज रामीं जाहली पूर्ण
कामीं ॥ सकळजनाविरामीं राम विश्रामधामीं ॥ घडि घडि मन आ-
तां रामरूपीं भरावें ॥ रघुकुळटिळका रे आपुलेंसें करावें ॥ १४ ॥
जळचर जळवासी नेणती त्या जळासी ॥ निशिदिनिं तुज पासीं
चूकलों गुणराशी ॥ भूमिधर¹निगमांसी वर्णवेना तयांसी ॥ सक-
ळभुवनवासी भेटि दे रामदासीं ॥ १५ ॥ जयजय रघुवीर समर्थ ॥

॥ द्वीतीय अष्टक ॥

असंख्यात ते भक्त होऊन गेले ॥ तिहीं साधनांचे बहू कष्ट केले ॥
नव्हे कार्यकर्ता भुमीभार झालों ॥ तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आ-
लों ॥ १ ॥ बहू दास ते तापसी तीर्थवासी ॥ गिरीकंदरीं भेटि नाहीं ज-
नासी ॥ स्थिती ऐकतां थोर विस्मीत झालों ॥ तुझा दा० ॥ २ ॥ सदा प्रे-
मळासी तया भेटलासी ॥ तुझ्या दर्शनें स्पर्शनें पुण्यराशी ॥ अहं-
ता मनीं शब्दज्ञानें बुडालों ॥ तुझा दा० ॥ ३ ॥ तुझ्या प्रीतिचे दास
निर्माण झाले ॥ असंख्यात ते कीर्ति बोलोनि गेले ॥ बहू धारणा थोर
चकीत झालों ॥ तुझा दा० ॥ ४ ॥ बहूसाल देवालयें हाटकांचीं² ॥ रसा-
ळा कळा लाघवें नाटकाचीं ॥ पुजा देखतां जाड जीवीं गळालों ॥
तुझा दा० ॥ ५ ॥ कितीकीं देहे त्यागिले तूजलागीं ॥ पुढें जाहले
संगतीचे विभागी ॥ देहेदुःख होतां च वेगीं पळालों ॥ तुझा दा० ॥
॥ ६ ॥ किती योगमूर्ती किती पुण्यमूर्ती ॥ किती धर्मसंस्थापना अ-
भशांती ॥ पस्तावलों कावलों तप्त झालों ॥ तुझा दा० ॥ ७ ॥ सदा स-
र्वदा राम सोडोनि कामीं ॥ समर्था तुझे दास आह्मी निकामी ॥ बहू
स्वार्थबुद्धीनु रे कष्टवीलों ॥ तुझा दा० ॥ ८ ॥ जयजयरघुवीर स० ॥

---

१ शेष व वेद यांस. २ स्वर्णाची.

नसे भक्ति ना ध्यान ना ज्ञान कांहीं ॥ नसे प्रेम हें राम विश्राम नाहीं ॥ असा दीन अज्ञान मी दास तूझा॥समर्था जनीं घेतला भार माझा ॥ १ ॥ रघूनायका जन्मजन्मांतरींचा॥अहंभाव छेदोनि टाकीं दिनाचा॥जनीं बोलती दास या राघवाचा ॥परी अंतरीं लेश नाहीं तयाचा ॥ ॥ २ ॥ रघूनायका दीन हातीं धरावें ॥ अहंभाव छेदोनियां उद्धरावें ॥ अगूणीत या लागिं गूणी करावें॥ समर्थें भवा सागरीं ऊतरावें ॥ ३ ॥ किती भार घालूं रघूनायकाला ॥ मजकारणें शीण होईल त्याला ॥ दिनानाथ हा संकटीं धाव घाली ॥ तयाचेनि हे सर्व काया निवाली ॥ ४ ॥ मला कायसा राम कैवल्यदाता॥ तयाचेनि हे फीटली सर्व चिंता ॥ समर्था तया काय उत्तीर्ण व्हावें॥ सदा सर्वदा नाम वाचे वदावें ॥ ५ ॥ दिनाचें उणें दीसतां लाज कोणा ॥ जनीं दास दीसे तुझा दैन्यवाणा ॥ शिरीं स्वामि तूं राम पूर्णप्रतापी॥ तुझा दास पाहें सदा शीघ्र कोपी ॥ ६ ॥ जयजयरघुवीर समर्थ ॥

उदासीन हे वृत्ति जीवीं धरावी॥अती आदरें सर्व सेवा करावी॥सदा प्रीति लागो तुझे गूण गातां॥रघूनायका मागणें हेंचि आतां॥१॥तुझें रूपडें लोचनीं म्यां पहावें।तुझे गूण गातां मनेंशीं रमावें॥उठो आवडी भक्तिपंथेंचि जातां॥रघुनाय० ॥२॥मनीं वासना भक्ति तूझी करावी ॥ कृपाळूपणें राघवें पूरवावी ॥ वसावें मज अंतरीं नाम घेतां॥रघूनाय०॥३॥सदा सर्वदा योग तूझा घडावा॥तुझे कारणीं देह माझा पडावा॥ उपेक्षूं नको गूणवंता अनंता ॥ रघूनाय० ॥ ४ ॥ नको द्रव्य दारा नको वेरझारा ॥ नको मानसीं ज्ञानगर्वें फुगारा ॥ सगूणीं मला लाविं रे भक्तिपंथा॥ रघूनाय० ॥५॥ भवें तापलों प्रीतिछाया करावी ॥ कृपासागरें सर्व चिंता हरावी ॥ मज संकटीं सोडवावें समर्था ॥ रघूनाय० ॥ ६ ॥ मनीं कामना कल्पना ते नसावी ॥ कुबुद्धी कुडी वासना नीरसावी[1]॥ नको संशयो

---

[1] दूर करावी.

तोडिं संसारवेथा ॥ रघूनाथ० ॥ ७ ॥ समर्था पुढें काय मागों क-ळेना ॥ दुराशा मनीं बैसली हे ढळेना ॥ फुटे संशयो नीरसीं सर्व चिंता ॥ रघूनाथ० ॥ ८ ॥ ब्रिदा कारणें दीन हातीं धरावें ॥ ह्मणे दास भक्तांसि रे उद्धरावें ॥ सुटे ब्रीद आह्मांसि सोडोनि जातां ॥ रघूनाथ० ॥ ९ ॥ जय जय रघुवीर समर्थ ॥ ५ ॥

## अनुष्टुप्छंद.

॥ युक्ति नाहीं बुद्धि नाहीं विद्या नाहीं विवंचितां ॥ नेणता भक्त मी तूझा बुद्धि दे रघुनायका ॥ १ ॥ बोलतां चालतां येना का-र्यभाग कळे चि ना ॥ बहु मी पीडिलों लोकीं बुद्धि दे रघुनायका ॥ २ ॥ तुझा मी टोणपा झालों कष्टलों बहुता परी ॥ सौख्य तें पा-हतां नाहीं बुद्धि दे रघुनायका ॥ ३ ॥ नेटकें लिहितां येना वाचितां चूकतों सदा ॥ अर्थ तो सांगतां येना बुद्धि दे रघुनायका ॥ ४ ॥ प्रसंग वेळ तर्केना सुचेना दीर्घ सूचना ॥ मैत्रिकी राखितां येना बुद्धि दे रघुनायका ॥ ५ ॥ संसार नेटका नाहीं उद्वेग वाटतो जिवीं ॥ परमार्थ हा कळे ना कीं बुद्धि दे रघुनायका ॥ ६ ॥ उदास वाटतें जीवीं आतां जावें कुणीकडे ॥ तूं भक्तवत्सला देवा बुद्धि दे रघु-नायका ॥ ७ ॥ कायावाचामनोभावें तुझा मी ह्मणवीतसें ॥ हे लाज तुजला माझी बुद्धि दे रघुनायका ॥ ८ ॥ मुक्त केल्या देवकोटी भू-भार फेडिला बळें ॥ भक्तासि आश्रयो मोठा बुद्धि दे रघुनायका ॥ ९ ॥ उदंड भक्त तुह्मांला आह्मांला कोण पूसतें ॥ ब्रीद[1] हें राखणें आधीं बुद्धि दे रघुनायका ॥ १० ॥ उदंड ऐकिली कीर्ती पतीतपा-वना प्रभो ॥ मी एक रंक निर्बुद्धी बुद्धि दे रघुनायका ॥ ११ ॥ आशा हे लागली मोठी दयाळूवा दया करीं ॥ आणखी न लगे कांहीं बुद्धि दे रघुनायका ॥ १२ ॥ रामदास ह्मणे माझा संसार तुज ला-

---

१ प्रतिज्ञा.

गला ॥ संशयो वाटतो पोटीं बुद्धि दे रघुनायका ॥ १३ ॥ जय जय रघुवीर समर्थ ॥ ६ ॥

॥ समाधान साधूजनाचे नि योगें ॥ परी मागुतें दुःख झालें वियोगें ॥ घडीनें घडी शीण अत्यंत वाटे ॥ उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ १ ॥ घरें सुंदरें सौख्य नाना परीचें ॥ परी कोण जाणेल तें अंतरींचें ॥ मनीं आठवीतां चि तो कंठ दाटे ॥ उदा० ॥ २ ॥ बळें लावितां चित्त कोठें जडेना ॥ समाधान तें कांहिं केल्या पडेना ॥ नव्हे धीर डोळां सदा नीर लोटे ॥ उदा० ॥ ३ ॥ अवस्था मनीं लागली काय सांगू ॥ गुणीं गुंतलों हेत कोणासि सांगू ॥ बहूसाल भेटावया प्राण फूटे ॥ उदा० ॥ ४ ॥ कृपाळूपणें भेट रे रामराया ॥ वियोगें तुझ्या सर्व व्याकूळ काया ॥ जनां माजि लौकीक हा ही न सूटे ॥ उदा० ॥ ५ ॥ अहा रे विधी हें असें काय केलें ॥ पराधीनता पाप माझें उदेलें ॥ बहूतां मधें तूकतां तूक तूटे ॥ उदा० ॥ ६ ॥ समर्थां मनीं सांडि माझी न सावी ॥ सदा सर्वदा भक्तचिंता असावी ॥ घडे ना तुझा योग हा प्राप्त कोठें ॥ उदा० ॥ ७ ॥ अखंडीत हे सांग सेवा घडावी ॥ न होतां तुझी भेट काया पडावी ॥ दिसेंदीस आयुष्य हें व्यर्थ लोटे ॥ उदा० ॥ ८ ॥ भजों काय सर्वां परी हीन देवा ॥ करूं काय रे सर्व माझा चि ठेवा ॥ ह्मणों काय मी कर्मरेखा न लोटे ॥ उदा० ॥ ९ ह्मणे दास मी वास पाहें दयाळा ॥ रघूनायका भक्तपाळा भुपाळा ॥ पहावें तुला हें जिवीं आर्त मोठें ॥ उदा० ॥ १० ॥ जय जय रघुवीर समर्थ ॥ ७ ॥

॥ उदासीन हा काळ जातो गमेना ॥ सदा सर्वदा थोर चिंता शमेना ॥ उठे मानसीं सर्व सोडोनि जावें ॥ रघूनायका काय कैसें करावें ॥ १ ॥ जनां बोलतां बोलतां वीट वाटे ॥ नसे अंतरीं सूख कोठें न कंठे ॥ घडीनें घडी चित्त कीती धरावें ॥ रघूनाय० ॥ २ ॥

---

१ चिन्ता. २ तुळितां. ३ नवल.

बहू पाहतां अंतरीं कोंड होतो ॥ शरीरास तो हेत सांडोनि जातो ॥ उपाधीस देखान वाटे सरावें ॥ रघूनाय० ॥ ३ ॥ अवस्था मनीं होय नाना परीची ॥ किती काय सांगूं गती अंतरींची ॥ विवेकें चि या मानसा आवरावें ॥ रघूनायका० ॥४॥ ह्मणे दास ऊदास झालों दयाळा ॥ जनीं व्यर्थ संसार हा वायचाळा ॥ तुझा मी तुला पूसतों प्रीय भावें ॥ रघू० ॥ ५ ॥ जय जय रघुवीर समर्थ ॥ ८ ॥

तुझिया वियोगें चि जिवित्व आलें॥शरीरयोगें बहु दुःख झालें॥ अज्ञानदारिद्र्य माझें सरे ना ॥ तुज विण रामा मज कंठवे ना॥१॥ परत्रीं जिणें दीन कंठूं किती रे ॥ उदास माझ्या मनिं वाटतें रे ॥ ललाटरेखा तरि पालटे ना ॥ तुजवी० ॥२॥ जडली उपाधी अभिमान साधी ॥ विवेक नाहीं बहुसाल बाधी॥तुझिया वियोगें पळ ही गमे ना ॥तुजवी०॥३॥ विश्रांति नाहीं अभिमान देहीं ॥ कुळाभिमानें पडलों प्रवाहीं॥स्व्हीत होतां मजला दिसे ना ॥ तुजवी०॥४॥ विषयी जनानें मज लाजवीलें ॥ प्रपंचसंगें आयुष्य गेलें ॥ समयीं बहु क्रोध शांती भरे ना ॥ तुजवी ० ॥ ५ ॥ संसारसंगें बहु पीडलों रे ॥ कारुण्यसिंधू मज सोडवीं रे ॥ कृपाकटाक्षें सांभाळिं दीना ॥ तुजवी० ॥ ६ ॥ सुदृढ झाली देहबुद्धि पाहीं ॥ वैराग्य कांहीं हें नांव नाहीं ॥ अपूर्णकामीं मन हें विटेना ॥ तुजवी ० ॥ ७ ॥ निरूपणीं हे सद्बुद्धि होती ॥ फळत्याग होतां सर्व चि जाती ॥ काय करूं रे क्रिया घडे ना ॥ तुजवीण० ॥ ८ ॥ जय जय दयाळा त्रयलोकपाळा ॥ भवसिंधुहारी मज तारिं हेळा ॥ स्वामी वियोगें पळ ही गमे ना ॥ तुजवी० ॥ ९ ॥ अह्मां अनाथां तूं एक दाता ॥ संसारचिंता चुकवीं समर्था ॥ दासा मनीं आठव वीसरे ना तुजवी० ॥१०॥ जय जय रघुवीर समर्थ ॥

---

१ चिन्ता.

॥ सवाया प्रारंभ ॥

॥ तुझा भाट मी वर्णितों रामराया ॥ सदा सर्वदा गाय बीदें सवाया ॥ महाराज दे अंगिचें वस्त्र आतां ॥ बहू जीर्ण झाली देहेबुद्धिकंथा ॥ १ ॥ रामदूत वायुसूत भीम भर्ग जुत्पती ॥ जो नरांत वानरांत भक्तिप्रेमवित्पत्ती ॥ दास दक्ष स्वामिपक्ष नीजकाजसारथी वीर जोर शीरजोर धकधिंग मारुती ॥ १ ॥ ह्मणावा जय जय राम ॥ सवाई मारुतीची ॥ जब हनुमंत जनकदुहिताशुद्ध लेनेकू गभर दौर दौर आये है ॥ तब कंठ गुरगुरगुरित नेत्र गरगरगरीत रोम थरथरथरीत पुच्छ झारे ॥ तब लंका घरघरघरीत बनमो दरदरदरीत सीताशोक हरत झरझरझरीत बन उफारे ॥ तब कंठ कुचकुचकुचीत इंद्रजीत चकचकचकीत रावण थकथकथकीत कर नगर ज्यारज्यार मखमखमखीत दास लियो जयतु राम मिले तब कपि भुभुःकारे ॥ ३ ॥ ह्मणावा जयजय राम ॥ १ ॥ जोहार ॥ परमसुंदर रूप शामळ ॥ इंद्रनील[१]कील कांति कोमळ ॥ भयनिवारण भक्तवत्सल ॥ वर पराक्रम कीर्ति विमल ॥ भुवनकंठक दैत्यमारक ॥ अमरमोचक दैन्यहारक ॥ दुरितनाशन पुण्यकारक ॥ हरित संकट दासतारक ॥ विकटविषमतालछेदक ॥ वरनरवरदैत्यभेदक ॥ दशमुखादिकशिरच्छेदक ॥ ऋषिजनमुनिचित्तवेधक ॥ अमरभूषण उत्तमोत्तम ॥ भुवनपालक हा रघूत्तम ॥ वीरवीरांतक हा विरोत्तम ॥ असुरांतक हा सुरोत्तम ॥ बहुतपीडक दैत्यभंजन ॥ ऋषिमुनिजनयोगिरंजन ॥ दुरितदानवदुष्टगंजन ॥ अतुलकीर्तिव्यक्तव्यंजन ॥ जय जय मार्तंडवंशावतंस ॥ जय जय कैवल्यधाम ॥ जय जय भरताग्रज ॥ जय जय सीतारमण ॥ जय जय सिंहासनाधीश्वर ॥ जय जय सुरराजविराजितपद ॥ नमस्ते नमस्ते ॥ सीताकांतस्मरण ॥ जय जयराम ॥ ४ ॥ नंतर श्रीची पंचोपचारें पूजा आणि कर्पूरआरती कारावी ॥

१. इन्द्रनील रत्नाची कान्ति.

## ॥ गणपतीची आरती ॥

॥ सुखकर्ता दुखहर्ता वार्ता विघ्नाची ॥ नुरवी पुरवी प्रेम कृपा-जयाची ॥ सर्वांगीं सुंदर उटि सेंदुराची ॥ कंठीं झळके माळ मुक्ता-फळांची ॥ जय देव जय देव जय मंगळमूर्ती ॥ दर्शनमात्रें मनका-मना पुरती ॥ जय देव जय देव० ॥ १ ॥ लंबोदर पीतांबर फणि-वरबंधना ॥ सरळशुंड वक्रतुंड त्रिनयना ॥ दास रामाचा वाट पाहे सदना ॥ संकटीं पावावें सुरववंदना ॥ जय दे० ॥ २ ॥

॥ आरती रामचंद्राची ॥ साफल्या निजवल्या कौसल्या माता॥ भूकन्या अनन्या मुनिमान्या सीता ॥खचर वनचर फणिवर भरता निजभ्राता ॥ दशरथनृपनायक धन्य तो पीता ॥ जय देव जय देव जय रघुकुळटिळका ॥ आरती ओवाळूं त्रिभुवननायका ॥ जय देव जय देव ॥ १ ॥ आचार्या गुरुवर्या कार्याचें फळ ॥ रविकुळमं-डण खंडन संसारमूळ ॥ सुरवर मुनिवर किन्नर ध्याती सकळ ॥ धन्य तो निजदास भक्त प्रेमळ ॥ जय दे० ॥ २ ॥

॥ आरती श्रीमारुतीची ॥ सत्राणें उड्डाणें हुंकारवदनीं ॥ करि डळमळ भूमंडळ सिंधूजळ गगनीं ॥ कडाडिलें ब्रह्मांड धोका त्रि-भुवनीं ॥ सुरवर नर नीशाचर त्यां जाल्या पळणी ॥ जय देव जय देव जय जय हनुमंता ॥ तुमचेनि प्रतापें न भियें कृतांता॥जय दे० ॥ १ ॥ दुमदुमिलें पाताळ उठला पडशब्द ॥ धगधगिला धरणीधर[1] मानिला खेद ॥ कडाडिले पर्वत उडुगणें[2] उच्छेद ॥ रामीरामदासा शक्तीचा शोध ॥ जय दे० ॥ २ ॥

॥ आरती गुरूची॥सुखसहिता दुखरहिता निर्मळ एकांता ॥क-लिमलदहना गहना स्वामी समर्था ॥ न कळे ब्रह्मादिका अंत अनं-ता॥तो तूं आह्मां सुलभ जय कृपावंता ॥ जय देव जय देव जय क-रुणाकरा ॥ आरती ओंवाळूं सद्गुरुमाहेरा॥ जय दे०॥१॥माये त्रिण

---

१. शेष. २ नक्षत्रमंडळ.

माहेर विश्रांतीठाव ॥ शब्दीं अर्थलाभ बोलणी वाव ॥ सद्गुरुप्रसादें सुलभ उपाव ॥ रामीरामदासा फळला सद्भाव ॥ जय० ॥२॥

॥ आरती श्रीरामसमर्थांची ॥ ब्रह्मा विष्णुहरादिक मानसीं ध्याती ॥ सुरवर किन्नर नारद तुंबर कीर्तनीं गाती ॥ आगम निगम शेष स्तवितां मंदली मती ॥ तो तूं पूर्णकामा मानवां प्राप्ती ॥ जय जय आरती श्रीगुरु स्वामी समर्था ॥ दयाळा स्वामी समर्था ॥ काया वाचा जिवें भावें ओंवाळिन आतां ॥ १ ॥ ऋषिवर मुनिवर किन्नर देवा तुझे स्थापिले ॥ षड्दर्शनी मत्त गुमानि पथ चालिले ॥ अपरंपारा परात्परा पार न कळे ॥ पतित प्राणी पदा लागुनि कल्याण झालें ॥ जय ज० ॥ २ ॥

अच्युतं केशवं रामनारायणं कृष्णदामोदरं वासुदेवं भजे ॥ श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं जानकीनायकं रामचंद्रं भजे ॥ १ ॥ हरे राम हरे राम राम राम हरे हरे ॥ हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ॥ १ ॥ पुंडलीकवरदा हरिविठ्ठल ॥ पार्वतीपते हर हर महादेव ॥ सीताकांतस्मरण जयजयराम ॥

॥ नंतर समर्थादिपरंपरेचा जयजयकार ॥ मंत्रपुष्प करून पदें ह्मणावीं तीं ॥

॥ वदन सुहास्य रसाळ हा राघव ॥ सर्वांगीं तनु सुनीळ हा राघव ॥ १ ॥ मृगनाभी[1] रेखिला टिळा हा रा० ॥ उभा कोदंडपाणी हा० ॥ सर्वांगीं सुमनमाळा हा० ॥ २ ॥ साजिरी वैजयंती हा० ॥ पायीं तोडर गर्जती हा० ॥ ३ ॥ सुंदर लावण्यखाणी हा० ॥ उभा कोदंडपाणी हा० ॥४॥ सकळ जीवांचें जीवन हा० ॥ रामदासासी प्रसन्न हा० ॥५॥ त्रिविधतापहारक हे गुरु पाय ॥ भवसिंधूसी तारक हे गुरुपाय ॥ १ ॥ स्वात्मसुखाचें बीज हे० ॥ ज्ञानाचें निज गुज हे गुरुपाय ॥ २ ॥ भक्तिपंथासी लाविती हे० ॥ नयनीं श्रीराम दा-

[1] कस्तूरी.

विती हे० ॥ ३ ॥ सहजशांतींचें आगर हे गु० ॥ पूर्णकृपेचे सागर हे० ॥ ४ ॥ रामदासाचें जीवन हे० ॥ सकळजीवांसी पावन हे गुरुपाय ॥ ५ ॥ सीताकांतस्मरण जय० ॥

॥ नंतर भोजनाचे पूर्वीं अथवा मग मनोबोधाचे नित्य तेरा श्लोक वाचावे ते ॥

॥ जय जय रघुवीर समर्थ॥ गणाधीश जो ईश सर्वां गुणांचा ॥ मुळारंभ आरंभ तो निर्गुणाचा ॥ नमूं शारदा मूळ चत्वारिवाचा ॥ गमू पंथ आनंत या राघवाचा ॥ १॥ मना सज्जना भक्तिपंथेंच जावें ॥ तरी श्रीहरी पाविजेतो स्वभावें ॥ जनीं निंद्य तें सर्व सोडून द्यावें ॥ जनीं वंद्य तें सर्वभावें करावें ॥ २ ॥ प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥ पुढें वैखरी राम आधीं वदावा ॥ सदाचार हा थोर सांडूं नये तो ॥ जगीं तो चि तो मानवीं धन्य होतो ॥ ३ ॥ मना वासना दुष्ट कामा नये रे ॥ मना सर्वथा पापबुद्धी नको रे ॥ मना तत्वता नीति सोडूं नको हो ॥ मना अंतरीं सारवीचार राहो ॥ ४॥ मना पापसंकल्प सोडोनि द्यावा ॥ मना सत्यसंकल्प जीवीं धरावा ॥ मना कल्पना ते नको वीषयाची॥ विकारें घडे हो जनीं सर्व छीछी॥ ५ ॥ नको रे मना क्रोध हा खेदकारी ॥ नको रे मना काम नानाविकारी ॥ नको रे मना लोभ हा अंगिकारूं॥नको रे मना मत्सरू दंभभारू ॥ ६॥ मना श्रेष्ठ धारिष्ट जीवीं धरावें ॥ मना बोलणें नीचं सोशीत जावें ॥ स्वयें सर्वदा नम्रवाचे वदावें ॥ मना सर्वलोकांसि रे नीववावें ॥ ७ ॥ देहे त्यागितां कीर्ति मागें उरावी ॥ मना सज्जना हे चि क्रीया धरावी॥मना चंदनाचे परी त्वां झिजावें॥ परी अंतरीं सज्जना नीववावें ॥ ८ ॥ नको रे मना द्रव्य तें पूढिलाचें ॥ अतिस्वार्थबुद्धीनु रे पाप साचें ॥ घडे भोगणें पाप तें कर्म

१ नित्य. २ स्वार्थबुद्धीनें.

खोटें ॥ न होतां मना सारिखें दुःख मोठें ॥ ९ ॥ सदा सर्वदा प्रीति रामीं धरावी ॥ दुखाची स्वयें सांड जीवीं करावी ॥ देहेदुःख तें सूख मानीत जावें ॥ विवेकें सदा स्वस्वरूपीं भरावें॥१०॥जनीं सर्वसूखी असा कोण आहे ॥ विचारीं मना तूं चि शोधोनि पाहें ॥ मना त्वां चि रे पूर्वसंचीत केलें ॥ तया सारिखें भोगणें प्राप्त झालें ॥११ ॥मना मानसीं दुःख आणूं नको रे ॥ मना सर्वथा शोक चिंता नको रे ॥ विवेकें देहेबुद्धि सोडोनि द्यावी ॥ विदेहीपणें मुक्ति भोगीत जावी ॥ १२ ॥ मना सांग पां रावणा काय झालें ॥ अकस्मात तें राज्य सर्वैं बुडालें ॥ ह्मणोनी कुडी वासना सांडि वेगीं ॥ बळें लागला काळ हा पाठिलागीं ॥ १३ ॥ जय जय रघुवीर समर्थ ॥ जिवा कर्मयोगें जनीं जन्म झाला ॥ परी शेवटीं काळ घेवोनि गेला ॥ महाथोर ते मृत्युपंथें चि गेले ॥ असंख्यात ते जन्मले आणि मेले ॥ १४ ॥ मना पाहतां सत्य हे मृत्युभूमी ॥ जिता बोलती सर्व ही जीव मी मी ॥ चिरंजीव हे सर्व ही मानिताती ॥ अकस्मात सोडोनियां सर्व जाती ॥ १५ ॥ मरे एक त्याचा दुजा शोक वाहे ॥ अकस्मात तो ही पुढें जात आहे ॥ पुरे ना जनीं लोभ रे क्षोभ त्यातें ॥ ह्मणोनी जनीं मागुता जन्म घेतें ॥ १६ ॥ मनीं मानव व्यर्थ चिंता वहातें ॥ अकस्मात होणार होवोनि जातें ॥ घडे भोगणें सर्व ही कर्मयोगें ॥ मतिमंद तो खेद मानी वियोगें ॥ १७ ॥ मना राघवें वीण आशा नको रे॥मना मानवाची नको कीर्ति तूं रे॥ जया वर्णिती वेद शास्त्रें पुराणें ॥ तया वर्णितां सर्व ही श्लाघ्यवाणें ॥ १८ ॥ मना सर्वथा सत्य सांडूं नको रे ।मना सर्वथा मिथ्य मांडूं नको रे ॥ मना सत्य तें सत्य वाचे वदावें ॥ मना मिथ्य तें मिथ्य सोडूनि द्यावें ॥ १९ ॥ बहू हिंपुटी होइजे माय पोटीं ॥ नको रे मना यातना ते चि मोठी ॥ निरोधें पचे कोंडिले गर्भवासीं ॥ अ-

१ सर्व. २ दुष्ट.

धोमूख रे दुःख त्या बाळकासी ॥ २० ॥ मना वासना चूकवीं येरझारा ॥ मना कामना सांडि रे द्रव्य दारा ॥ मना यातना थोर हे गर्भवासीं ॥ मना सज्जना भेटवीं राघवासी ॥ २१ ॥ मना सज्जना हीत माझें करावें॥ रघूनायका दृढ चित्तीं धरावें ॥ महाराज तो स्वामि वायूसुताचा ॥ जना उद्धरी नाथ लोकत्रयाचा ॥ २२ ॥ न बोलें मना राघवा वीण कांहीं॥ जनीं वाउगें बोलतां सूख नाहीं ॥ घडीनें घडी काळ आयुष्य नेतो ॥ देहांतीं तुला कोण सोडूं पहातो ॥ २३ ॥ रघूनायका वीण वायां शिणावें ॥ जनां सारिखें व्यर्थ कां ओसणावें ॥ सदा सर्वदा नाम वाचे वसों दे ॥ अहंता मनीं पापिणी ते नसों दे ॥ २४ ॥ मना वीट मानूं नको बोलण्याचा ॥ पुढें मागुता राम जोडेल कैंचा ॥ सुखाची घडी लोटतां सूख आहे ॥ पुढें सर्व जाईल कांहीं न राहे ॥ २५ ॥ देहेरक्षणा कारणें यत्न केला ॥ परी शेवटीं काळ घेवोनि गेला ॥ करीं रे मना भक्ति या राघवाची ॥ पुढें अंतरीं सोडि चिंता भवाची ॥ २६ ॥ जय जय० ॥ भवाच्या भयें काय भीतोसि लंडी ॥ धरीं रे मना धैर्य धाकाशि सांडीं ॥ रघूनायका सारिखा स्वामि शीरीं ॥ नुपेक्षी कदा कोपल्या दंडधारी ॥ २७ ॥ दिनानाथ हा राम कोदंडधारी ॥ पुढें देखतां काळ पोटीं थरारी[1] ॥ जनीं वाक्य नेमस्त हें सत्य मानीं ॥ नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥ २८ ॥ पदीं राघवाचे सदा ब्रीद गाजे ॥ बळें भक्तरीपूशिरीं कांबि वाजे ॥ पुरी वाहिली सर्व जेणें विमानीं ॥ नुपेक्षी क० ॥ ४९ ॥ समर्थाचिया सेवका वक्र पाहे ॥ असा सर्व भूमंडळीं कोण आहे ॥ जयाची लिळा वर्णिती लोक तीन्ही ॥ नुपेक्षी क० ॥ ॥ ३० ॥ महासंकटीं सोडिले देव जेणें ॥ प्रतापें बळें आगळा सर्वगूणें ॥ जयातें स्मरे शैलजा शूलपाणी ॥ नुपेक्षी क० ॥ ३१ ॥ अहल्या शिळा राघवें मुक्त केली ॥ पदीं लागतां दिव्य होवोनि गेली॥

१ थडथडावें. २ यम.

जया वर्णितां शीणली वेदवाणी ॥ नुपेक्षी क० ॥ ३२ ॥ वसे मेरु-मांदार हे सृष्टिलीळा ॥ शशी सूर्य तारागणें मेघमाळा ॥ चिरंजीव केले जनीं दास दोन्ही ॥ नुपेक्षी क० ॥ ३३ ॥ उपेक्षा कदा राम-रूपीं असेना ॥ जिवा मानवा निश्चयो तो वसेना ॥ शिरीं भार वाहे न बोले पुराणीं ॥ नुपेक्षी क० ॥ ३४ ॥ सदा सर्वदा देव सन्नीध आहे ॥ कृपाळूपणें अल्प धारिष्ट पाहें ॥ सुखानंद आनंद कैवल्यदानी ॥ नुपेक्षी क० ॥ ३५ ॥ असे हो जया अंतरीं भाव जैसा ॥ वसे हो तया अंतरीं देव तैसा ॥ अनन्यास रक्षीतसे चापपाणी ॥ नुपेक्षी क० ॥ ॥ ३६ ॥ सदा चक्रवाकासि मार्तंड जैसा ॥ उडी घालितो संकटीं स्वामि तैसा ॥ हरीभक्तिचा घाव घाली निशाणीं ॥ नुपेक्षी क० ॥ ३७ ॥ मना प्रार्थना तूजला एक आहे ॥ रघूराजअंकीत होवोनि राहें ॥ अवज्ञा कदा हो यदर्थीं न कीजे ॥ मना सज्जना राघवीं वस्ति कीजे ॥ ३८ ॥ जया वर्णिती वेदशास्त्रें पुराणें ॥ जयाचेनि योगें स-माधान बाणे ॥ तया लागिं हें सर्व चांचल्य दीजे ॥ मना सज्जना राघवीं वस्ति कीजे ॥ ३९ ॥ जय जय० ॥ मना पाविजे सर्व ही सूख जेथें ॥ अती आदरें ठेविजे लक्ष तेथें ॥ विवेकें कुडी कल्पना पालटीजे ॥ मना सज्जना राघवीं वस्ति कीजे ॥ ४० ॥ बहू हिंडतां सूख होणार नाहीं ॥ शिणावें परी नातुडे हीत कांहीं ॥ विचारें बरें अंतरीं बोध कीजे ॥ मना सज्ज० ॥ ४१ ॥ बहूतां परी हें चि आतां धरावें ॥ रघूनायका आपुलेंसें करावें ॥ दिनानाथ हें तोडरीं ब्रीद गाजे ॥ मना सज्ज० ॥ ४२ ॥ मना सज्जना एक जीवीं धरावें ॥ जनीं आपुलें हीत तूवां करावें ॥ रघूनायका वीण बोलूं नको हो ॥ सदा मानसीं हा निदिध्यास राहो ॥ ४३ ॥ मना रे जनीं मौनमुद्रा धरावी ॥ कथा आदरें राघवाची करावी ॥ नसे राम तें धाम सोडून द्यावें ॥ सुखा लागिं आरण्य सेवीत जावें ॥ ४४ ॥ जयाचेनि संगें स-

---

१ न मिळे.

माधान भंगे ॥ अहंता अकस्मात येवोनि लागे ॥ तये संगतीची जनीं कोण गोडी ॥ जये संगतीनें मती राम सोडी ॥ ४५ ॥ मना जे घडी राघवें वीण गेली ॥ जनीं ते तुवां आपुली हानि केली ॥ रघूनायका वीण तो शीण आहे ॥ जनीं दक्ष तो लक्ष लावूनि पाहे ॥४६॥ मनीं लोचनीं श्रीहरीतें चि पाहे ॥ जगीं जाणता भक्त होवोनि राहे ॥ गुणीं प्रीति लागे क्रमू साधनाचा ॥ जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥ ४७ ॥ सदा देवकाजीं झिजे देह ज्याचा ॥ सदा रामनामें वदे नित्य वाचा ॥ स्वधर्मे चि चाले सदा उत्तमाचा जगीं ध० ॥ ४८ ॥ सदा बोलण्या सारिखें चालताहे ॥ अनेकीं सदा एक देवासि पाहे ॥ सगूणीं भजे लेश नाहीं भ्रमाचा ॥ जगीं ध० ॥ ४९ ॥ नसे अंतरीं काम नाना विकारी ॥ उदासीन जो तापसी ब्रह्मचारी ॥ निवाला मनीं लेश नाहीं तमाचा ॥ जगीं ध० ॥ ॥ ५० ॥ मदें मत्सरें सांडिली स्वार्थबुद्धी ॥ प्रपंचीक नाहीं जयातें उपाधी ॥ सदा बोलणें नम्रवाचा सुवाचा ॥ जगीं ध० ॥५१॥ क्रमी वेळ जो तत्वचिंतानुवादें ॥ न लिंपे कदा दंभवादें विवादें ॥ करी सूख संवाद जो ऊगमाचा॥जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥५२॥ जय जय० ॥ सदा आर्जवी प्रीय जो सर्व लोकीं ॥ सदा सर्वदा सत्यवादी विवेकी ॥ न बोले कदा मिथ्यवाचा त्रिवाचा॥जगीं ध० ॥५३॥ सदा सेवि आरण्य तारुण्य काळीं ॥ मिळे ना कदा कल्पनेचेनि मेळीं ॥ चळे ना मनीं निश्चयो दृढ ज्याचा ॥ जगीं ध० ॥ ५४ ॥ नसे मानसीं नष्ट आशा दुराशा ॥ वसे अंतरीं प्रेमपाशापिपाशा ॥ ऋणी देव हा भक्तिभावें जयाचा ॥ जगीं ध० ॥ ५५ ॥ दिनाचा दयाळू मनाचा मवाळू ॥ स्नेहाळू कृपाळू जगीं दासपाळू ॥ तया अंतरीं क्रोध संताप कैंचा ॥ जगीं ध० ॥ ५६ ॥ जगीं होइजे धन्य या रामनामें ॥ क्रिया भक्ति ऊपासना नित्य नेमें ॥ उदासी-

---

२ मूळाचा. २ तृष्णा.

नता तत्वता सार आहे ॥ सदा सर्वदा मोकळी वृत्ति राहे ॥ ५७ ॥
नको वासना वीषयीं वृत्तिरूपें ॥ पदार्थीं जडे कामना पूर्वपापें ॥
सदा राम निष्काम चिंतीत जावा ॥ मना कल्पनालेश तो ही न-
सावा ॥ ५८ ॥ मना कल्पना कल्पितां कल्पकोटी ॥ नव्हे रे नव्हे
सर्वथा रामभेटी ॥ मनीं कामना राम नाहीं जयाला ॥ अती आदरें
प्रीति नाहीं तयाला ॥ ५९ ॥ मना राम कल्पतरू कामधेनू ॥ निधी
सार चिंतामणी काम वानूं ॥ जयाचेनि योगें घडे सर्व सत्ता ॥ तया
साम्यता कायसी कोण आतां ॥ ६० ॥ उभा कल्पवृक्षा तळीं दुःख
वाहे ॥ तया अंतरीं सर्वदा तें चि आहे ॥ जनीं सज्जनीं वाद[1] हा
वाढवावा ॥ पुन्हा मागुता शोक जीवीं धरावा ॥ ६१ ॥ निदिध्या-
स तो सर्व तूटोनि गेला ॥ बळें अंतरीं शोक संताप ठेला ॥ सुखानंद
आनंद भेदें बुडाला ॥ मनीं निश्चयो सर्व खेदें उडाला ॥ ६२ ॥ घरीं
कामधेनू पुढें ताक मागे ॥ हरीबोध सांडोनि वेवाद लागे ॥ करीं
सार चिंतामणी काचखंडें ॥ तया मागतां देत आहे उदंडें ॥ ६३ ॥
अती मूढ त्या दृढबुद्धी असेना ॥ अती काम त्या राम चित्तीं वसे-
ना ॥ अती लोभ त्या क्षोभ होईल जाणा ॥ अती वीषयी सर्वदा दै-
न्यवाणा ॥ ६४ ॥ नको दैन्यवाणें जिणें भक्तिऊणें ॥ अतिमूर्ख त्या
सर्वदा दुःख दूणें ॥ धरीं रे मना आदरें प्रीति रामीं ॥ नको वासना
हेमधामीं विरामीं ॥ ६५ ॥ जय जय० ॥ नव्हे सार संसार हा घोर
आहे ॥ मना सज्जना सत्य शोधोनि पाहें ॥ जनीं वीष खातां पुढें
सौख्य कैंचें ॥ करीं रे मना ध्यान या राघवाचें ॥ ६६ ॥ घनश्याम
हा राम लावण्यरूपी ॥ महाधीर गंभीर पूर्ण प्रतापी ॥ करी संक-
टीं सेवकाचा कुडावा[2] ॥ प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥ ६७ ॥
बळें आगळा राम कोदंडधारी ॥ महाकाळ विक्राळ तो ही थरारी ॥
पुढें मानवा किंकरा कोण केवा[3] ॥ प्रभाते मनीं राम चिंतीत जावा

१ विवाद. २ रक्षण. ३ पाड.

॥ ६८ ॥ सुखानंदकारी निवारी भयातें ॥ जनीं भक्तिभावें भजावें तयातें ॥ विवेकें त्यजावा अनाचार हेवा ॥ प्रभाते मनीं० ॥ ६९ ॥ सदा रामनामें वदा पूर्णकामें ॥ कदा बाधिजे बा पदा नित्य नेमें ॥ मदालस्य हा सर्व सोडोनि द्यावा ॥ प्रभाते मनीं० ॥ ७० ॥ जयाचेनि नामें महादोष जाती ॥ जयाचेनि नामें गती पाविजेती ॥ जयाचेनि नामें घडे पुण्यठेवा ॥ प्रभाते मनीं० ॥ ७१ ॥ न वेचे कदा ग्रंथिचा अर्थ कांहीं ॥ मुखें नाम उच्चारितां कष्ट नाहीं ॥ महाघोर संसार शत्रू जिणावा ॥ प्रभाते० ॥ ७२ ॥ देहेदंडनाचें महादुःख आहे ॥ महादुःख तें नाम घेतां न राहे ॥ सदाशीव चिंतीतसे देवदेवा ॥ प्रभाते मनीं० ॥ ७३ ॥ बहूता परी संकटें साधनाचीं ॥ व्रतें दान उद्यापनें तीं धनाचीं ॥ दिनाचा दयाळू मनीं आठवावा ॥ प्रभाते मनीं० ॥ ७४ ॥ समस्तामधें सार साचार आहे ॥ कळे ना तरी सर्व शोधूनि पाहें ॥ जिवीं संशयो वाउगा तो त्यजावा ॥ प्रभाते मनीं० ॥ ७४ ॥ नव्हे कर्म ना धर्म ना योग कांहीं ॥ नव्हे भोग ना त्याग ना सांग पाहीं ॥ ह्मणे दास विश्वास रामीं धरावा ॥ प्रभाते मनीं० ॥ ७६ ॥ करीं काम निष्काम या राघवाचें ॥ करीं रूप स्वरूप सर्वां जिवांचें ॥ करी छंद निर्द्वंद्व हे गूण गातां ॥ हरीकीर्तनीं वृत्ति विश्वास होतां ॥ ७७ ॥ अहो ज्या नरा रामविश्वास नाहीं ॥ तया पामरा बाधिजे सर्व कांहीं ॥ महाराज तो स्वामि कैवल्यदाता ॥ वृथा वाहणें देहसंसारचिंता ॥ ७८ ॥ जय जय० ॥ मना पावना भावना राघवाची ॥ धरीं अंतरीं सोडिं चिंता भवाची ॥ भवाची जिवा मानवा भूलि ठेली ॥ नसे वस्तुची धारणा व्यर्थ गेली ॥ ७९ ॥ धरा श्रीवरा त्या हरा अंतरातें ॥ तरा दुस्तरा त्या परा सागरातें ॥ सरा वीसरा त्या भरा दुर्भरातें ॥ करा नीकुरा त्या खरा मत्सरातें ॥ ८० ॥ मना मत्सरें नाम सोडूं नका हो ॥ अती आदरें हा निदि-

१ दान. २ चिन्तन. ३ पीडा.

ध्यास राहो ॥ समस्तां मधें नाम तें सार आहे ॥ दुजी तूळणा तूळि-
तां ही न साहे ॥ ८१ ॥ बहू नाम या रामनामीं तुळेना ॥ अभाग्या
नरा पामरा तें कळेना ॥ विषा औषधा घेतलें पार्वतीशें ॥ जिवा
मानवा किंकरा कोण पुसे ॥ ८२ ॥ जेणें जाळिला काम तो राम
ध्यातो ॥ उमेसीं अती आदरें गूण गातो ॥ बहु ज्ञान वैराग्य साम-
र्थ्य जेथें ॥ परीं अंतरीं रामविश्वास तेथें ॥ ८३ ॥ विठोनें शिरीं वा-
हिला देवराणा ॥ तया अंतरीं ध्यास रे त्यास नेणा ॥ निवाला स्वयें
तापसी चंद्रमौळी ॥ जिवा सोडवी राम हा अंतकाळीं ॥८४॥ भजा
राम विश्राम योगेश्वराचा ॥ जपू नेमिला नेम गौरीहराचा ॥ स्वयें
नीववी तापसी चंद्रमौळी ॥ तुह्मां सोडवी राम हा अंतकाळीं ॥८५॥
मुखीं राम विश्राम तेथें चि आहे ॥ सदानंद आनंद सेवोनि राहे ॥
तया वीण तो शीणसंदेहकारी ॥ निदिध्यास हें नाम शोकापहारी
॥८६॥ मुखीं राम त्या काम बाधूं शकेना ॥ गुणें इष्ट धारिष्ट त्याचें
चुकेना ॥ हरीभक्त तो सक्त कामासि मारी ॥ जगीं धन्य तो मारुती
ब्रह्मचारी ॥८७॥ बहू चांगलें नाम या राघवाचें ॥ अती साजिरें स्व-
ल्प सोपें फुकाचें ॥ करी मूळ निर्मूळ घेतां भवाचें ॥ जिवां मानवां हें
चि कैवल्य साचें ॥ ८८ ॥ जनीं भोजनीं नाम वाचे वदावें ॥ अती
आदरें गद्य घोषें ह्मणावें ॥ हरीचिंतनें अन्न जेवीत जावें ॥ तरी श्री-
हरी पाविजेतो स्वभावें ॥ ८९ ॥ नये रामवाणी तया थोर हानी ॥
जनीं व्यर्थ प्राणी तया नाम कानीं ॥ हरीनाम हें वेदशास्त्रीं पुराणीं ॥
बहू आगळी बोलिली व्यासवाणी ॥ ९० ॥ नको वीट मानूं रघूना-
यकाचा ॥ अती आदरें बोलिजे राम वाचा ॥ न वेंचे मुखीं सांपडे
रे फुकाचा ॥ करीं घोष त्या जानकीवल्लभाचा ॥९१॥ जयजय०॥
अती आदरें सर्वही नामघोषें ॥ गिरीकंदरीं जाइजे दूरदोशे ॥ हरू
तुष्टतू तोषला नामघोषें ॥ विशेषें हरा मानसीं रामपीसें ॥९२॥ ज-

१ संसार.

गीं पाहतां राम हा अन्नदाता ॥ तया लागली तत्वता सारचिंता ॥ तयाचें मुखीं नाम घेतां फुकाचें ॥ मना सांग पां रे तुझें काय वेंचे ॥९३॥ तिन्ही लोक जाळूं शके कोप येतां ॥ निवाला हरू तो मुखें नाम घेतां ॥ जपे आदरें पार्वती विश्वमाता ॥ ह्मणा रे ह्मणा तें चि हें नाम आतां ॥ ९४ ॥ अजामेळ पापी वदे पुत्रकामें ॥ तया मुक्ति नारायणाचेनि नामें ॥ शुका कारणें कुंटिणी रामवाणी ॥ मुखें बोलतां ख्याति झाली पुराणीं॥९५॥महाभक्त प्रऱ्हाद हा दैत्यकुळीं॥ जपे रामनामावळी नित्यकाळीं ॥ पिता पापरूपी तया देखवेना ॥ जनीं दैत्य तो नाम मुखें ह्मणे ना॥९६॥मुखीं राम नाहीं तया मुक्ति कैंची ॥ अहंतागुणें यातना ते फुकाची ॥ पुढें अंत येईल तो दैन्यवाणा ॥ ह्मणोनी ह्मणा रे ह्मणा देवराणा ॥९७॥ हरीनाम नेमस्त पाषाण तारी ॥ बहू तारिले मानवी देहधारी॥ तया रामनामीं सदा जो विकल्पी ॥ वदे ना कदा जीव तो पापरूपी ॥ ९८॥ जगीं धन्य वाराणसी पुण्यरासी ॥ तये माजि जातां गती पूर्वजांसी ॥ मुखीं रामनामावळी नित्यकाळीं॥जिवां हीत सांगे सदा चंद्रमौळी॥९९॥ यथासांग तें कर्म कांहीं घडेना॥घडे धर्म तो पुण्यगांठी पडेना॥दया पाहतां सर्वभूतीं असे ना ॥ फुकाचें मुखीं नाम तें ही वसेना॥१००॥ जया नावडे नाम त्या यम जाची ॥ विकल्पें उठे तर्क त्या नर्क ची ची॥ ह्मणोनी अती आदरें नाम घ्यावें ॥ मुखें बोलतां दोष जाती स्वभावें ॥ १ ॥ अती लीनता सर्व भावें स्वभावें ॥ जना सज्जना लागिं संतोषवावें ॥ देहे कारणीं सर्व लावीत जावें॥ सगूणीं अती आदरेंशीं भजावें ॥ २ ॥ हरीकीर्तनीं प्रीति रामीं धरावी ॥ देहेबुद्धि नीरूपणें वीसरावी॥परद्रव्य आणीक कांता परावी॥यदर्थीं स्वयें सांडि जीवीं करावी ॥ ३ ॥ क्रियेवीण नाना परी बोलिजेतें ॥ परी चित्त दुश्चित्त तें लाजवीतें ॥ मना कल्पना धीट सैराट धांवे ॥ तया

---

१ स्वच्छंदानें.

मानवा देव कैसेनि पावे ॥ ४ ॥ जयजय० ॥ विवेकें क्रिया आपुली पालटावी ॥ अती आदरें शुद्ध कीया धरावी ॥ जगीं बोलण्यासारिखें चाल बापा ॥ मना कल्पना सोडिं संसारतापा ॥५॥ बरी स्नानसंध्या करीं एकनिष्ठा ॥ विवेकें मना आवरीं स्थानभ्रष्टा॥ दया सर्वं भूतीं जया मानवाला ॥ सदा प्रेमळू भक्तिभावें निवाला ॥ ६ ॥ मना कोप आरोपणा ते नसावी॥मना बुद्धि हे साधुसंगीं वसावी ॥ मना दुष्ट चांडाळ तो संग त्यागीं ॥ मना होइं रे मोक्षभागीं विभागी ॥७॥ सदा सर्वदा सज्जनाचेनि योगें ॥ क्रिया पालटे भक्तिभावार्थ लागे ॥ क्रियेवीण वाचाळता ते निवारीं ॥ तुटे वाद संवाद तो हीतकारी ॥ ८ ॥ जनीं वाद वेवाद सोडोनि द्यावा ॥ जनीं सूखसंवाद सूखें करावा ॥ जनीं तोचि तो शोकसंतापहारी ॥ तुटे वाद संवाद तो हीतकारी ॥ ९ ॥ तुटे वाद संवाद त्यातें ह्मणावें ॥ विवेकें अहंभाव त्यातें जिणावें॥ अहंतागुणें वाद नाना विकारी॥तुटे वाद संवाद तो हीतकारी ॥ १० ॥ हिता कारणें बोलणें सत्य आहे ॥ हिता कारणें सर्व शोधोनि पाहें ॥ हिता कारणें बंड पाषाण वारी॥ तुटे वा० ॥ ११ ॥ जनीं सांगतां ऐकतां जन्म गेला ॥ परी वादवेवाद तैसाचि ठेला॥उठे संशयो वाद हा दंभहारी ॥ तुटे वा०॥१२॥ जनीं हीत पंडीत सांडीत गेले ॥ अहंतागुणें ब्रह्मराक्षस झाले ॥ तयाहूनि वित्पन्न तो कोण आहे ॥ मना सर्व जाणीव सोडोनि राहें ॥१३॥ फकाचे मुखीं बोलतां काय वेंचे ॥ दिसेंदीस अभ्यंतरीं गर्व सांचे ॥ क्रिये वीण वाचाळता व्यर्थ आहे ॥ विचारें तुझा तूंच शोधूनि पाहें ॥ १४ ॥ तुटे वाद संवाद तेथें करावा ॥ विवेकें अहंभाव तो पाल्टावा ॥ जनीं बोलण्या सारिखें आचरावें ॥ क्रिया पालटे भक्तिपंथें चि जावें ॥१५॥ बहू शापितां कष्टला अंबऋषी ॥ तयाचे स्वयें श्रीहरी जन्म सोशी ॥ दिल्हा क्षीरसिंधू तया ऊपमा-

१ जिंकावें. २ उपमन्यूला.

नीं॥ नुपेक्षी कदा देव भक्ताभिमानी॥१६॥धुरू लेंकरूं बापुडें दैन्य-
वाणें॥कृपा भाकितां दीधली भेटि जेणें ॥ चिरंजीव तारागणीं प्रेम-
खाणी ॥ नुपेक्षी कदा देव भक्ताभिमानी ॥ १७ ॥ जय जय० ॥ ग-
जेंद्रू महासंकटीं वांस पाहे ॥ तया कारणें श्रीहरी धांवताहे ॥
उडी घातली जाहला जीवदानी ॥ नुपेक्षी क० ॥ १८ ॥ अजामेळ
पापी तया अंत आला ॥ कृपाळूपणें तो जनीं मुक्त केला ॥ अनाथा-
सि आधार हा चक्रपाणी ॥ नुपेक्षी क० ॥ १९ ॥ विधी कारणें जा-
हला मत्स्य वेगीं ॥ धरी कूर्मरूपें धरा पृष्ठभागीं॥जना रक्षणा का-
रणें नीचयोनी ॥ नुपेक्षी क० ॥२०॥ महाभक्त प्ऱ्हाद हा कष्टवी-
ला ॥ ह्मणोनी तया कारणें सिंह झाला ॥ नये ज्वाळ वीशाळ सं-
न्नीध कोणी ॥ नुपेक्षी क० ॥ २१ ॥ कृपा भाकिता जाहला वज्र-
पाणी ॥ तया कारणें वामनू चक्रपाणी ॥ द्विजा कारणें भार्गवू चा-
पपाणी ॥ नुपेक्षी क० ॥ २२ ॥अहल्या सती लागि आरण्यपंथें ॥
कुडावा पुढें देव बंदीं तयांतें ॥ बळें सोडितां घाव घाली निशाणीं॥
नुपेक्षी क० ॥ २३ ॥ तये द्रौपदी कारणें लागवेगें॥ बळें धांवतू
सर्व सोडोनि मागें ॥ कली लागिं झाला असे बौद्ध मौनी ॥ नुपेक्षी
क० ॥२४॥ अनाथा दिना कारणें जन्मताहे ॥ कलंकी पुढें देव हो-
णार आहे ॥ जया वर्णितां शीणली वेदवाणी ॥ नुपेक्षी क०॥२५॥
जना कारणें देव लीलावतारी॥बहू तारिले मानवां देहधारी॥तया
नेणती ते जनीं पापरूपी॥दुरात्मे महा नष्ट चांडाळ पापी ॥ २६ ॥
जगीं धन्य तो राममूखें निवाला॥कथा ऐकतां सर्व तल्लीन झाला॥
देहेभावना रामबोधें उडाली॥मना वासना रामरूपीं बुडाली॥२७॥
मना वासना वासुदेवीं वसों दे ॥ मना कामना कामसंगीं नसों दे ॥
मना कल्पना वाउगी ते न कीजे ॥ मना सज्जना राघवीं वस्ति
कीजे ॥ २८ ॥ गती कारणें संगती सज्जनांची ॥ मती पालटे कू-

१ वाट. २ रक्षण. ३ तत्काळ.

मती दुर्जनांची ॥ रतीनायिकेचा पती नष्ट आहे॥ ह्मणोनी मनातीत होवोनि राहें ॥ २९ ॥ मना अल्प संकल्प तो ही नसावा ॥ मना सत्यसंकल्प जीवीं वसावा ॥ मना जल्पवीकल्प तो ही त्यजावा ॥ रमाकांत एकांतकाळीं भजावा ॥ १३ ॥ जयजय० ॥ भजाया जनीं पाहतां राम एकू ॥ करीं बाण एकू मुखीं शब्द एकू ॥ क्रिया पाहतां उद्धरे सर्व लोकू ॥ धरा जानकीनायकाचा विवेकू ॥ ३१ ॥ विचारोनि बोले विवंचोनि चाले ॥ तयाचेनि संतप्त ते ही निवाले ॥ बरें शोधिल्या वीण बोलूं नको हो ॥ सदा चालणें शुद्ध नेमस्त राहो ॥३२॥ हरीभक्त वीरक्त¹ विज्ञानराशी ॥ जेणें मानसीं स्थापिलें निश्चयासी ॥ तया दर्शनें स्पर्शनें पुण्य जोडे ॥ तया भाषणें नष्ट संदेह मोडे ॥ ३३ ॥ नसे गर्व अंगीं सदा वीतरागी ॥ क्षमा शांति भोगी दया दक्ष योगी ॥ नसे लोभ ना क्षोभ ना दैन्यवाणा ॥ इहीं लक्षणीं जाणिजे योगिराणा ॥३४॥ धरीं रे मना संगती सज्जनाची॥जेणें वृत्ति हे पालटे दुर्जनाची ॥ बळें भाव सद्वृत्ति सन्मार्ग लागे ॥ महाक्रूर हा काळ विक्राळ भंगे ॥३५॥ भयें व्यापिलें सर्व ब्रह्मांड आहे ॥ भयातीत तें संत आनंत पाहें ॥ जया पाहतां द्वैत कांहीं असेना ॥ भयें मानसीं सर्वथा ही वसेना ॥ ३६ ॥ जिवां श्रेष्ठ ते स्पष्ट सांगोनि गेले ॥ परी जीव अज्ञान तैसे चि ठेले ॥ देहेबुद्धिचा निश्चयो जो ढळेना ॥ जुनें ठेवणें मीपणें तें कळे ना ॥ ३७ ॥ भ्रमें नाढळे वित्त तें गुप्त झालें ॥ जिवा जन्मदारिद्र्य ठाकोनि आलें ॥ देहेबुद्धिचें कर्म खोटें गळे ना ॥ जुनें ठेवणें मीपणें तें कळे ना ॥ ३८ ॥ पुढें पाहतां सर्व ही कोंदलेंसे ॥ अभाग्या नरा दृश्य पाषाण भासे ॥ अभावें कदा पुण्य गांठीं पडे ना ॥ जुनें ठे० ॥ ३९ ॥ जयाचें तया चूकलें प्राप्त नाहीं॥ गुणा गोविलें जाहलें दुःख देहीं ॥ गुणा वेगळी वृत्ति ते ही वळे ना॥ जुनें ठे० ॥ ४० ॥ ह्मणे दास दासत्व त्याचें करावें ॥ जगीं जा-

---

१ विरक्त.

णता पाय त्याचे धरावे ॥ गुरू अंजनें वीण तें आकळे ना ॥ जुनें ठे० ॥ ४१ ॥ कळे ना कळे ना कळे ना कळे ना ॥ ढळे ना ढळे संशयो ही ढळे ना ॥ गळे ना गळे ना अहंता गळे ना ॥ बळें आकळे ना वळे ना वळे ना ॥ ४२ ॥ अविद्यागुणें मानवा ऊमजे ना ॥ भ्रमें चूकलें हीत तें पाविजे ना ॥ परीक्षे विणें बांधिलें दृढ नाणें ॥ परी सत्य मिथ्या असें कोण जाणे ॥ ४३ ॥ जय जय० ॥ जगीं पाहतां साच तें काय आहे ॥ अती आदरें सर्व शोधोनि पाहें ॥ पुढें पाहतां पाहतां देव जोडे ॥ भ्रमें भ्रांति अज्ञान हें सर्व मोडे ॥ ४४ ॥ सदा वीषयो चिंतितां जीव गेला ॥ अहंभाव अज्ञान जन्मास आला ॥ विवेकें सदा स्वस्वरूपीं भरावें ॥ जिवा ऊगमीं जन्म नाहीं स्वभावें ॥४५॥ दिसे लोचनीं तें नसे कल्प कोडी ॥ अकस्मात आकारलें माळ मोडी ॥ पुढें सर्व जाईल कांहीं न राहे ॥ मना संत आनंत शोधोनि पाहें ॥ ४६ ॥ तुटे ना फुटे ना चळे ना ढळे ना ॥ सदा संचलें मीपणें तें कळे ना ॥ तया एकरूपासि दूजें न साहे ॥ मना संत आनंत शोधोनि पाहें ॥ ४७ ॥ निराकार आकार ब्रह्मादिकांचा ॥ जया सांगतां शीणली वेदवाचा ॥ विवेकें तदाकार होवोनि राहें ॥ मना० ॥ ४८ ॥ जगीं पाहतां चर्मचक्षीं न लक्षे ॥ जगीं पाहतां ज्ञानचक्षीं निरक्षे ॥ जनीं पाहतां पाहणें जात आहे ॥ मना० ॥४९॥ नसे पीत ना श्वेत ना श्याम कांहीं ॥ नसे व्यक्त अव्यक्त ना नीळ नाहीं ॥ ह्मणे दास विश्वासतां मुक्ति लाहे ॥ मना० ॥ ५० ॥ खरें शोधितां शोधितां शोधिताहे ॥ मना बोधितां बोधितां बोधिताहे ॥ परी सर्व ही सज्जनाचेनि योगें ॥ बरा निश्चयो पाविजे स्वानुरागें ॥ ५१ ॥ मही निर्मिली देव तो ओळखावा ॥ जया पाहतां मोक्ष तत्काळ जीवा ॥ तया निर्गुणा लागिं गुणीं पहावें ॥ जगीं संग सोडोनि सूखें रहावें ॥ ५२ ॥ नव्हे कार्यकर्ता नव्हे

---

१ पाहिला जातो.

सृष्टिभर्ता ॥ परे हून पर्ता न लिंपे विवर्ता ॥ तया निर्विकल्पासि क-ल्पीत जावें ॥ जगीं संग सोडोनि सूखें रहावें ॥ ५३ ॥ बहूतां परी कूसरीतत्वझाडा ॥ परी अंतरीं पाहिजे तो निवाडा ॥ मना सार साचार तें वेगळें रे ॥ समस्तां मधें एक तें आगळें रे ॥ ५४ ॥ नव्हे पिंडज्ञानें नव्हे तत्वज्ञानें ॥ समाधान कांहीं नव्हे तानमानें ॥ नव्हे योगयागें नव्हे भोगत्यागें ॥ समाधान तें सज्जनाचेनि योगें ॥ ५५ ॥ महावाक्यतत्वादिकें पंचिकर्णें ॥ खुणें पाविजे संतसंगें विवर्णें ॥ द्वितीयेसि संकेत जो दाविजेतो ॥ तया सांडुनी चंद्रमा भाविजे तो ॥ ५६ ॥ जय जय रघुवीर समर्थ ॥ दिसे ना जनीं तें चि शोधोनि पाहें ॥ बरें पाहतां गूज तेथें चि आहे ॥ करीं घेउं जातां कदा आकळे ना ॥ जनीं सर्व कोंदाटलें तें कळे ना ॥ ५७ ॥ ह्मणे जाणता तो जनीं मूर्ख पाहें ॥ अतर्क्यासि तर्की असा कोण आहे ॥ जनीं मीपणें पाहतां पाहवे ना ॥ तया लक्षितां वेगळें राहवे ना ॥ ५८ ॥ बहू शास्त्र धुंडाळितां वाड आहे ॥ जनीं निश्चयो एक तो ही न साहे ॥ मती मांडती शास्त्रशोधें विरोधें ॥ गती खुंटती ज्ञान-बोधें प्रबोधें ॥ ५९ ॥ स्मृति न्याय मीमांसकें तर्क शास्त्रें ॥ श्रुती वेदवेदांतवाक्यें विचित्रें ॥ स्वयें शेष मौनावला स्थीर राहे ॥ मना संत आनंत शोधोनि पाहें ॥ ६० ॥ जेणें मक्षिका भक्षिली जाणि-वेची ॥ तया भोजनाची रुची प्राप्त कैंची ॥ अहंभाव ज्या मानसींचा विरेना ॥ तया ज्ञान हें अन्न पोटीं जिरे ना ॥ ६१ ॥ नको रे मना वाद हा खेदकारी ॥ नको रे मना भेद नाना विकारी ॥ नको रे मना शीकवूं पूढिलांसी ॥ अहंभाव जो राहिला तूज पाशीं ॥ ६२ ॥ अ-हंतागुणें सर्व ही दुःख होतें ॥ मुखें बोलिजे ज्ञान तें व्यर्थ जातें ॥ सुखें राहतां सर्व ही सूख आहे ॥ अहंता तुझी तूं च शोधूनि पाहें ॥ ६३ ॥ अहंतागुणें नीति सांडी विवेकी ॥ अनीतीबळें श्लाघ्यता सर्व

---

१ मिथ्या भ्रमाला. २ अधिक.

लोकीं ॥ परी सर्व ही अंतरीं साक्ष येते ॥ प्रमाणांतरें बुद्धि सांडोनि जाते ॥ ६४ ॥ देहेबुद्धिचा निश्चयो दृढ झाला ॥ देहातीत तें हीत सांडीत गेला ॥ देहेबुद्धि ते आत्मबुद्धी करावी ॥ सदा संगती सज्जनाची धरावी ॥ ६५ ॥ मनें कल्पिला वीषयो सोडवावा ॥ मनें देव निर्गूण तो आठवावा ॥ मना कल्पिती कल्पना ते सरावी ॥ सदा संगती सज्जनाची धरावी ॥ ६६ ॥ देहादीक प्रापंच हा चिंतियेला ॥ परीं अंतरीं लोभ निश्चीत ठेला ॥ हरीचिंतनें मुक्तिकांता वरावी ॥ सदा० ॥६७॥ बरा निश्चयो शाश्वताचा करावा ॥ ह्मणे दास संदेह तो वीसरावा ॥ घडीनें घडी सार्थकाची करावी ॥ सदा० ॥ ६८ ॥ अहंकार विस्तारला या देहाचा ॥ स्त्रिया पुत्रमित्रादिकें या मोहाचा ॥ बळें भ्रांति हे जन्मचिंता हरावी ॥ सदा० ॥ १६९ ॥ जय जय० ॥ करी वृत्ति जो संत तो संत जाणा ॥ दुराशागुणें जो नव्हे दैन्यवाणा ॥ उपाधी देहेबुद्धि ते वाढवीते ॥ परी सज्जना केंवि बाधूं शके ते ॥ ७० ॥ नसे अंत आनंत संता पुसावा ॥ अहंकार विस्तारला नीरसावा ॥ गुणें वीण निर्गूण तो आठवावा ॥ देहेबुद्धिचा आठंऊ[1] नाठवावा ॥ ७१ ॥ देहेबुद्धि हे ज्ञानबोधें त्यजावी ॥ विवेकें तया वस्तुची भेटि घ्यावी ॥ तदाकारि हे वृत्ति नाहीं स्वभावें ॥ ह्मणोनी सदा तें चि शोधीत जावें ॥७२॥ असे सार साचार तें चोरिलेंसे ॥ इहीं लोचनीं पाहतां दृश्य भासे ॥ निराभास निर्गूण तें आकळेना ॥ अहंतागुणें कल्पितां ही कळेना ॥ ७३ ॥ स्फुरे वीषयीं कल्पना ते अविद्या ॥ स्फुरे ब्रह्म रे जाण माया सुविद्या ॥ मुळीं कल्पना दो रुपें ते चि झाली ॥ विवेकें तरी स्वस्वरूपीं निमाली ॥ ७४ ॥ स्वरूपीं उदेला अहंकार राहो ॥ तेणें सर्व आच्छादिलें व्योम[2] पाहो ॥ दिशा पाहतां ते निशी वाटताहे ॥ विवेकें विचारें विवंचोनि पाहें ॥ ७५ ॥ जया चक्षुनें

---

१ स्मरण. २ आकाश.

लक्षितां लक्षवेना ॥ भवा भक्ष तो राक्षितां रक्षवेना ॥ क्षयातीत तो अक्षयीं मोक्ष देतो ॥ दयादक्ष तो साक्षिनें पक्ष घेतो ॥ ७६ ॥ विधी निर्मितां लीहितो सर्व भाळीं ॥ परी लीहितो कोण त्याचे कपाळीं ॥ हरू जाळितो लोक संहारकाळीं ॥ परी शेवटीं शंकरा कोण जाळी ॥ ७७ ॥ जगीं द्वादशादित्य ते रुद्र अक्रा ॥ असंख्यात संख्या करी कोण शक्रा ॥ जगीं देव धुंडाळितां आढळेना ॥ जगीं मुख्य तो कोण कैसा कळेना ॥ ७८ ॥ तुटे ना फुटे ना कदा देवराणा ॥ चळे ना ढळे ना कदा दैन्यवाणा ॥ कळे ना कळे ना कदा लोचनासी ॥ वसे ना दिसे ना जना मीपणासी ॥ ७९ ॥ जया मानला देव तो पूजिताहे ॥ परी देव शोधोनि कोणी न पाहे ॥ जनीं पाहतां देव कोट्यानुकोटी ॥ जया मानली भक्ति जे ते च मोठी ॥ ८० ॥ तिन्ही लोक जेथोनि निर्माण झाले ॥ तया देवरायासि कोणी न बोले ॥ जगीं थोरला देव तो चोरलासे॥ गुरू वीण तो सर्वथा ही न दीसे ॥८१॥गुरू पाहतां लक्ष कोट्यानुकोटी ॥ बहूसाल मंत्रावळी शक्ति मोठी ॥ मनीं कामना चेटकी घातमाता॥जगीं व्यर्थ रे तो नव्हे मोक्षदाता॥१८२॥जय०॥नव्हे चेटकू चाळकू द्रव्यभोंदु॥नव्हे मत्सरू निंदकू भक्तिमंदू ॥नव्हे उन्मतू वेसनीं संगबाधू ॥ जगीं ज्ञानिया तो चि साधू अगाधू॥८३॥ नव्हे वाउगी चाउटी काम पोटीं॥क्रिये वीण वाचाळता ते चि मोठी मुखें बोलिल्या सारखें चालताहे ॥ मना सद्गुरू तो चि शोधून पाहें ॥ ८४ ॥ जगीं भक्त ज्ञानी विवेकी विरागी ॥ कृपाळू मनस्वी क्षमावंत योगी ॥ प्रभू दक्ष वित्पन्न चातुर्य जाणे ॥ तयाचेनि योगें समाधान बाणे ॥ ८५ ॥ नव्हे तें चि झालें नसे तें चि आलें ॥ कळों लागलें सज्जनाचेनि बोलें ॥ अनिर्वाच्य तें वाच्य वाचे वदावें ॥ मना संत आनंत शोधोनि पाहें ॥ ८६ ॥ लपावें अती आदरें रा-

---

१ ठसे.

मरूपीं ॥ भयातीत निश्चिंत ये स्वस्वरूपीं ॥ कदा तें जनीं पाहतां ही दिसेना ॥ सदा ऐक्य तें भिन्नभावें वसेना ॥ ८७ ॥ सदा सर्वदा राम सन्नीध आहे ॥ मना सज्जना सत्य शोधोनि पाहें ॥ अं-खंडीत भेटे रघूराजयोगू ॥ मना सांडिरे मीपणाचा वियोगू ॥८८॥ मतें पिंडब्रह्मांड हें ऐक्य आहे ॥ परी सर्वही स्वस्वरूपीं न साहे ॥ मना भासलें सर्व कांहीं पहावें ॥ परी संग सोडूनि सूखी रहावें ॥ ८९ ॥ देहेभान हें ज्ञानशस्त्रें खुडावें ॥ विदेहीपणें भक्तिपंथेंचि जावें ॥ विवेकें बळें निंद्य सर्वं त्यजावें ॥ अती प्रीतिनें सज्जनातें भजावें ॥ ९० ॥ देहेबुद्धिचा निश्चयो ज्या ढळेना ॥ तया ज्ञान कल्पांतकाळीं कळे ना ॥ परब्रह्म तें मीपणें आकळेना ॥ मनीं शून्य अज्ञान हें मावळेना ॥ ९१ ॥ मना नाकळे नाढळे रूप ज्याचें ॥ दुजे वीण तें ध्यान सर्वोत्तमाचें ॥ तया वीण तो हीन दृष्टांत पाहें ॥ तिथें संग निःसंग दोन्ही न साहे ॥९२॥ नव्हे जाणतां नेणतां देवराणा ॥ नये वर्णितां वेदशास्त्रां पुराणां ॥ नसे दृश्य अदृश्य साक्षी तयाचा ॥ श्रुती नेणती नेणती अंत ज्याचा ॥९३॥ वसे हृदयीं देव तो कोण कैसा ॥ पुसे साधकू आदरें प्रश्न ऐसा ॥ देहे टाकितां देव कोठें रहातो ॥ पुन्हा मागुता ठाव कोठें पहातो ॥ ९४ ॥ वसे हृदयीं देव तो जाण ऐसा ॥ नभाचे परि व्यापकू जाण तैसा ॥ सदा संचला येत ना जात कांहीं ॥ तया वीण कोठें रिता ठाव नाहीं ॥ ९५ ॥ जय जय रघुवीर समर्थ ॥ नभीं वावरे जो अणू रेणु कांहीं ॥ रिता ठाव या राघवा वीण नाहीं ॥ तया पाहतां पाहतां तें चि झालें ॥ तिथें लक्ष आलक्ष सर्वे बुडालें ॥ ९६ ॥ नभा सारिखें रूप या राघवाचें ॥ मनीं चिंतितां मूळ तूटे भवाचें ॥ तया पाहतां देहबुद्धी उरे ना ॥ सदा सर्वदा आर्त पोटीं पुरे ना ॥ ९७ ॥ नभें व्यापिलें सर्व ब्रह्मांड आहे ॥ रघूनायका ऊपमा ते न साहे ॥ दुजे वीण जो तो चि तो

---



१ सर्व.

हा स्वभावें ॥ तया व्यापकू व्यर्थ कैसें ह्मणावें ॥ ९८ ॥ कळे आकळे रूप तें ज्ञान होतां ॥ तिथें आटली सर्वसाक्षी अवस्था ॥ मना उन्मनी शब्द कुंठीत राहे ॥ तिथें संग निःसंग दोन्ही न साहे ॥ ९९ ॥ अती जीर्ण विस्तीर्ण तें रूप आहे ॥ तिथें तर्क संपर्क दोन्ही न साहे ॥ अती गूढ तें दृढ तत्काळ सोपें ॥ दुजे वीण तें खूण स्वामिप्रतापें ॥ २०० ॥ कदा ओळखी माजि दूजें दिसे ना ॥ मना मानसीं द्वैत कांहीं असेना ॥ बहूता दिसां आपुली भेटि झाली ॥ विदेहीपणें सर्व काया निवाली ॥ १ ॥ मना गूज रे तुज हें प्राप्त झालें ॥ परी पाहिजे अंतरीं यत्न केले ॥ सदा श्रवणें पाविजे निश्चयासी ॥ धरीं सज्जनी संगती धन्य होसी ॥ २ ॥ मना सर्व ही संग सोडोनि द्यावा ॥ अती आदरें सज्जनाचा धरावा ॥ जयाचेनि संगें महादुःख भंगे ॥ जगीं साधनें वीण सन्मार्ग लागे ॥ ३ ॥ मना संग हा सर्वसंगाशि तोडी ॥ मना संग हा मोक्ष तत्काळ जोडी ॥ मना संग हा साधका शीघ्र सोडी ॥ मना संग हा द्वैत निःशेष मोडी ॥ ४ ॥ मनाची शतें ऐकतां दोष जाती ॥ मतीमंद ते साधना योग्य होती ॥ चढे ज्ञानवैराग्यसामर्थ्य अंगीं ॥ ह्मणे दास विश्वासतां मुक्ति भोगी ॥ २०५ ॥ जय जय रघुवीर समर्थ ॥ ॥ ॥ ॥

॥ नंतर दासबोधाचे दोन समास नित्य वाचावे, निरूपणपूर्वक चालू असल्यास नियम नलगे ॥ महारुद्रहनुमते श्रीसद्गुरुसीतारामाभ्यां नमः ॥ गणेशशारदाचैवसद्गुरु सज्जनस्तथा ॥ आराध्यदैवतंगुह्यंसर्वंमेरघुनंदनः ॥ १ ॥

॥ गणेश शारदा सद्गुरू ॥ संत सज्जन कुळेश्वरू ॥ सर्व ही माझा रघुवीरू ॥ सद्गुरुरूपें ॥ १ ॥ माझें आराध्यदैवत ॥ परम गुह्य गुह्यातीत[1] ॥ गुह्यपणाची मात ॥ न चले तेथें ॥ २ ॥

---

१ गुह्याच्या ही पलीकडे (अतिगुह्य).

॥ श्लोक ॥ योजातोमरुदंगजोक्षितितलेसंबोधयन्सज्जनान् ॥ ग्रंथंयोरचयन्सुपुण्यजनकंश्रीदासबोधाभिधम् ॥ यःकीर्त्यापठनेनसर्वविदुषांस्त्रांतापहारीसदा ॥ सोऽयंमुक्तिकरःक्षितौविजयते श्रीरामदासोगुरुः ॥ १ ॥ ॥ दासबोध वाचावा ॥ ॥ श्रीराम ॥

॥ आरती दासबोधाची ॥ वेदांतसंमतीचा काव्यसिंधू भरला ॥ श्रुतिशास्त्रग्रंथगीतासाक्षसंगमू केला ॥ महानुभावसंतजनीं अनुभव चाखिला ॥ अज्ञानजडजीवां मार्ग सुगम केला ॥ जयजया दासबोधा ॥ ग्रंथराजा प्रसिद्धा आरती ओंवाळीन ॥ विमळज्ञान बाळबोधा ॥ जयजया० ॥ १ ॥ नवविधभक्तिपंथें रामरूपानुभवी ॥ चातुर्यनिधि मोठा मायाचक्र उगवी ॥ हरिहरहृदयींचें गुह्य प्रकट दावी ॥ बद्ध चि सिद्ध झालें असंख्यात मानवी ॥ जयजया० ॥२॥ वीस ही दशकींचा अनुभव जो पाहे ॥ नित्यनेमें विवरीतां स्वयें ब्रह्म चि होये ॥ अपार पुण्य गांठीं तरी श्रवण लाहे ॥ कल्याण लेखकाचें भावगर्भ हृदयीं ॥ ज० ॥ ३ ॥ सीताकांतस्म० ॥

॥ नंतर पंचपदी करावी ॥ अथ सद्गुरूचें ध्यान ॥ ब्रह्मानंदंपरमसुखदंकेवलंज्ञानमूर्तिंद्वंद्वातीतंगगनसदृशंतत्त्वमस्यादिलक्ष्यम् ॥ एकंनित्यंविमलमचलंसर्वधीसाक्षिभूतंभावातीतंत्रिगुणरहितंसद्गुरुंतंनमामि ॥ १ ॥

॥नामावळी॥ विमळवाचा दे रे राम ॥ विमळ करणी दे रे राम॥ प्रसंगओळखी दे रे राम॥ धूर्त कळा मज दे रे०॥हितकारक तें दे रे राम ॥ जनसुखकारक० ॥ अंतरपारख०॥ बहुजनमैत्री०॥ विद्यावैभव०॥ उदासीनता०॥मागों नेणें तें०॥मज न कळे तें०॥तुझी आवडी०॥ दास ह्मणे मज० ॥ जयजय०॥२॥ संगीत गायन दे रे० ॥ आलापगोडी ०॥ धातमात मज० ॥ अनेकधाटी०॥ रसाळमुद्रा०॥ जाडकथा० ॥ हस्तकटाळी० ॥ नृत्यकळा० ॥ प्रबंधसरळी०॥ शा-

ळदमनोहर० ॥ सावधपण मज० ॥ बहु पाठांतर० ॥ दास ह्मणे मज० ॥ जयजय० ॥३॥ पावन भिक्षा दे रे राम॥दीनदया मज०॥ अभेदभक्ति० ॥ आत्मनिवेदन० ॥ तद्रूपता मज दे० ॥ अर्थारोहण दे० ॥ सज्जनसंगति० ॥ अलिप्तपण म० ॥ ब्रह्मानुभव दे० ॥ अनन्यसेवा० ॥ मज विण तूं मज दे० ॥ दास ह्मणे० ॥ जय जय रघुवीर समर्थ ॥ ॥ रामा हो जयरामा हो ॥ पतितपावन पूर्णकामा हो ॥ १ ॥ नाथा हो दीननाथा हो ॥ तुझिये चरणीं राहो माथा हो ॥ २ ॥ बंधु हो दीनबंधु हो ॥ रामदास ह्मणे कृपासिंधु ॥ ३ ॥

॥ अभंग ॥१॥ राम गावा राम ध्यावा ॥ राम जीवींचा विसावा ॥ १ ॥ कल्याणाचें जें कल्याण ॥ रघुरायाचें गुणगान ॥ २ ॥ मंगळाचें जें मंगळ ॥ राम कौसल्येचा बाळ ॥ ३ ॥ राम कैवल्याचा दानी ॥ रामदासा अभीमानी ॥ ४ ॥

॥ भजन ॥ रामदास गुरु माझे आई॥मजला ठाव द्यावा पायीं ॥१॥

॥ अभंग ॥ २ ॥ छत्रसुखासनीं अयोध्येचा राजा ॥ नांदतसे माझा मायबाप ॥ १ ॥ माझा मायबाप त्रैलोकीं समर्थ ॥ सर्व मनोरथ पूर्ण करी ॥ २ ॥ पूर्णप्रतापाचा कैवारी देवांचा ॥ नाथ अनाथांचा स्वामी माझा ॥ ३ ॥ स्वामी माझा राम योगीया विश्राम ॥ सांपडलें वर्म थोर भाग्यें॥४॥थोर भाग्य ज्याचें राम त्याचे कूळीं॥ संकटीं सांभाळी भावबळें ॥ ५ ॥ भावबळें जेणें धरीला अंतरीं ॥ तया क्षणभरी विसंबे ना ॥६॥ विसंबेना कदा आपूल्या दासांसी ॥ रामीरामदासीं कुळस्वामी ॥ ७ ॥

॥ भजन ॥ रघुपति राघव राजाराम॥पतितपावन सीताराम ॥

॥अभंग॥ ३ ॥ रत्नजडित सिंहासन ॥ वरी शोभे रघुनंदन ॥ १ ॥ वामांकीं ते सीताबाई ॥ जगज्जननी माझी आई ॥ २ ॥ पश्चाद्भागीं लक्ष्मण ॥ पुढें अंजनीनंदन ॥ ३ ॥ भरत शत्रुघ्न

भाई ॥ चौरें ढाळिति दोन्ही बाहीं ॥ ४ ॥ नळ नीळ जांबवंत ॥ अंगद सुग्रीव बिभीषण भक्त ॥ ५ ॥ देहबुद्धि नेणों कांहीं ॥ दास अंकित रामा पायीं ॥ ३ ॥

॥ अभंग ॥ ४ ॥ रविवार ॥ धन्य सूर्यवंश पुण्यपरायण ॥ सर्व ही सगुणसमुदाव ॥ १ ॥ समुदाव काय सांगूं श्रीरामाचा ॥ अंतरीं कामाचा लेश नाहीं ॥ २ ॥ लेश नाहीं तया बंधू भरतासी ॥ सर्व ही राज्यासी त्यागियेलें ॥ ३ ॥ त्यागियेलें अन्न केलें उपोषण ॥ धन्य लक्ष्मण ब्रह्मचारी ॥ ४ ॥ ब्रह्मचारी धन्य मारुती सेवक ॥ श्रीरामीं सार्थक जन्म केला ॥ ५ ॥ जन्म केला धन्य वाल्मीकऋषीनें ॥ धन्य तीं वचनें भविष्याचीं ॥६॥ भविष्य पाहतां धन्य बीभीषण ॥ राघवीं शरण सर्व भावें ॥ ७ ॥ सर्वभावें सर्व शरण वानर ॥ धन्य ते अवतार वीबूधांचे[1] ॥ ८ ॥ विबुधमंडन राम सर्वगुण ॥ अनन्य शरण रामदास ॥ ९ ॥

॥ भजन ॥ रामा रामा हो रामा ॥

॥ अभंग ॥ ५ ॥ दासाची संपत्ती राम सीतापती ॥ जिवाचा सांगाती राम एक ॥ १ ॥ राम एक माता राम एक पिता ॥ राम एक भ्राता सहोदर ॥ २ ॥ सहोदर विद्या वैभव कांचन ॥ सर्व हा स्वजन राम एक ॥ ३ ॥ राम एक स्वामी राम हा कैवारी ॥ लाभ या संसारीं राम एक ॥ ४ ॥ राम एक ज्ञान राम एक ध्यान ॥ राम समाधान रामदासीं ॥ ५ ॥

॥ भजन॥ तूं माय मी लेकरूं॥राघवा नको विसरूं रे नको वि०॥

॥ आरती रामाची ॥ किरीटकुंडलें माळा वीराजे ॥ झळझळ गंडस्थळ घननिळ तनु साजे ॥ घंटा किंकिणि अंबर अभिनव गति साजे ॥ अंदू वांकी तोडर नूपुर ब्रिद गाजे ॥ जय देव जय देव जय रघुवीरेशा ॥ आरती निर्जरवर ईशा जगदीशा ॥ जय० ॥१॥ रा-

---

1 देवांचे.

त्रिवलोचन मोचन सुरवरनरनारी ॥ परतरपर अभयंकर शंकरव रधारी ॥ भूषणमंडित ऊभा श्रीशंदकेवारी॥दासा मंडन खंडन भव-भय अपहारी ॥ २ ॥ जय देव० ॥

॥ आरती बहिरोबाची ॥ दक्षिणदेशा माजी भैरव तो देव ॥ क्षेत्रपाळ वंदी लोकत्रय भाव ॥ भक्तासी देखूनी चरणीं दे ठाव ॥ देवाचा तारक भैरवदेव ॥ जयदेव जयदेव जय भैरवदेवा ॥ सद्भावें आरती करितों मी देवा ॥ जय० ॥ १ ॥ वामांगीं जोगेश्वरि शोभे सुंदर ॥ कासे पीतांबर वाद्यांचा गजर ॥ भक्तासी देखोनि हरि कृपाकर ॥ रामदास चरणीं त्या मागे थार ॥ जय देव० ॥ २ ॥

॥ आरती खंडोबाची ॥ पंचानन हयवाहन सुरभूषणलीला ॥ खंडामंडित दंडितदानव अवलीळा ॥ मणिमल्ल मर्दूनी धूसर जो पिंवळा ॥ करिं कंकण बाशिंगें सुमनाच्या माळा ॥ जय देव जय देव जय जय मल्हारी ॥ वारीं दुर्जनवारी निंदक अपहारी॥जय०॥१॥ सुरवर संवर वर दे मज नाना देवा ॥ नाना नामें गाइन घडे तुझी सेवा ॥ अगणित गुण गावया वाटतसे हेवा ॥ फणिवर स्मरला जेथें नरपामरकेवा ॥ जय० ॥ २ ॥ रामस्मरणें शंकर हृदयीं नीवाला ॥ तो हा मदनांतक अवतार झाला॥या लागीं आवडीं भावें वर्णीला ॥ रामीरामदासा ॥ जिवलग भेटला ॥ जय० ॥ ३ ॥

॥ आरती कृष्णाजी ॥ करुणाकर गुणसागर गिरिवरधर देवें ॥ लीलानाटकवेष धरिला स्वभावें ॥ अगणितगुणलाघव हें कवणा ठावें ॥ व्रजनायक सुखदायक काय वर्णावें ॥ जय देव जय देव जय राधारमणा ॥ आरती वोवाळूं तुज नारायणा ॥ धृ० ॥ जय ॥ १ ॥ वृंदावन हरिभुवन नूतन तनु शोभे ॥ वक्रांगें श्रीरंगें यमुनातटिं शोभे ॥ मुनिजनमानसहारी जगजीवन ऊभे ॥ रविकुळटिळकदास पदरज त्या लाभे ॥ ज० ॥ २ ॥

---

१ देवांचा समूह करी.

॥ आरती केदराची ॥ जय देव जय देव जयति केदारा ॥ दासमंकट वारा भवभय अपहारा ॥ धृ० ॥ भागीरथिमुळ सीतळ हीमाचळवासी ॥ न लगत पळ दुर्जन खळ संहारी त्यासी ॥ तो हा हिमकेदार करवीरा पाशीं ॥ रत्नागिरीवरि शोभे कैवल्यराशी ॥ १ ॥ जयदेव० ॥ उत्तरेचा देव दक्षीणे आला ॥ दक्षिणकेदार नाम पावला ॥ रत्नासुर मर्दूनी भक्तां पावला ॥ दास ह्मणे थोर दैवें लाधला ॥ २ ॥ जयदेव० ॥

॥ सोमवार ॥ दंडडमरूमंडित पिनाकपाणी ॥ धृ० ॥ पांच मुखें पंधरा डोळे ॥ गळा साजूक सीसाळें ॥ दंड० ॥ १ ॥ हिमालयाचा जामात ॥ हातीं शोभे सरळ गात ॥ २ ॥ मस्तकिं[1] वाहे गंगाजळ ॥ कंटीं शोभे हळाहळ ॥ दंडड० ॥ ३ ॥ माथां मोठा जटाभार ॥ अंगीं फुंपती वीखार ॥ दंड० ॥ ४ ॥ रामीरामदास स्वामी ॥ चिंतीतसे अंतर्यामीं ॥ दंड० ॥ ५ ॥ शिव हर सांब शिव हर सांब ॥ शिव हर शंकर शिव शिव सांब ॥

॥ आरती सांबाची ॥ लवथवती विक्राळा ब्रह्मांडमाळा ॥ विषें कंठ काळा त्रिनेत्रीं ज्वाळा ॥ लावण्य सुंदर मस्तकीं बाळा ॥ तेथुनियां जळ निर्मळ वाहे झुळझूळा ॥ जय देव जय देव जय श्रीशंकरा ॥ आरती ओवाळूं तुज विश्वंभरा ॥ जय दे० ॥ १ ॥ कर्पुर गौर भोळा नयनीं वीशाळा ॥ अर्धांगीं पार्वती सुमनांच्या माळा ॥ भस्माचें उधळण शितिकंठ नीळा ॥ ऐसा शंकर शोभे उमा वेल्हाळा ॥ जय० ॥ २ ॥ व्याघ्रांबरफणिवरधर सुंदर मदनारी ॥ पंचानन मुनिजनमनमोहन सुखकारी ॥ शतकोटींचें बीज वाचे उच्चारी ॥ रविकुळटिळक रामदासा अंतरीं ॥ जयदे० ॥ ३ ॥

॥ मंगळवार ॥ अभंग ॥ सदा आनंदभरित ॥ रंग साहित्य संगीत ॥ १ ॥ जगन्माता जगदीश्वरी ॥ जगज्जननी जगदुद्धारी ॥ २ ॥ त्रि-

---

१ मस्तकें.

भुवनींच्या वनीता ॥ बाळ तारुण्य समस्ता॥३॥वसे आकाशीं पाताळीं ॥ सर्वकाळ तिन्ही काळीं ॥४॥ जिच्या वैभवाचे लोक ॥ हरीहर ब्रह्मादिक ॥ ५ ॥ सर्वदेहा हालवीते ॥ चालवीते बोलवीते ॥६॥ मूळमाया विस्तारली ॥ सिद्धसाधकांची बोली ॥ ७ ॥ भक्ति मुक्ति योगस्थिती ॥ आदिमुक्ती सहज स्थिती॥८॥मुळीं रामवरदायिनी॥ रामदास ध्यातो ध्यानीं ॥ ९ ॥

॥ पद ॥ सुंदररामा बाई हो ॥ सबरामरीत सर्वा ठायीं हो॥निगमा पार नाहीं ॥ तें म्यां वर्णावी ते काई हो ॥ सुंदर रामाबाई॥ध्रु०शरयूतिरवासिनी वेधक मुनिमानसमोहिनी हो ॥ सुखवरसंजीविनी कैसी शोभत पद्मासनीं हो॥उदार एकवचनीं दुर्लभ तापसजपसाधनीं हो ॥ दशरथनृपनंदिनी प्रकटे ऋषिवचना लागुनी हो॥ सुंदर० ॥१॥ निजमस्तकीं वीरजगुंठी त्रिपुंड्र रेखिला ललाटीं हो॥ सुरेख सदटा भृकुटी तेणें सतेज नासापुटी हो ॥ नव वानर गोमटी श्रवणीं कुंडलांची थाटी हो ॥ लावण्याची पेटी उपमे न पुरे मन्मथकोटी हो ॥ सुंदर० ॥ २ ॥ कटितटिं सोनसळा माजी सौदामिनिचा मेळा हो ॥ सुवास नाभीकमळा तेणें पडे मधुकरपाळा हो ॥ वामे धरणीबाळा वनिता मंडित त वेल्हाळा हो ॥ चरणस्पर्शें शिळा अहल्या उद्धरिली अवलीळा हो ॥ सुंदर० ॥ ३ ॥ विशाळवक्षस्थळीं विराजित उटी चंदन पातळी हो ॥ कंठीं एकावळी माजी कौस्तुभमणि झळफळी हो ॥ अधरीं प्रवाळपाळी मध्यें शोभे दंतावळी हो ॥ रसना रसकल्लोळीं वाचा बोलत असे मंजुळी हो॥सुंदर० ॥४॥ अजानुबाहू सरळ सुनीळ गगना हुनि कोमळ हो ॥ सुपाणि रम्यस्थळ देखुनि रवितेज उज्वळ हो॥मुद्रिका फांकती कीळ तेणें सतेज ग्रहमंडळ हो ॥ तारकामुकसह मेळे शोधित असुरा तरुचीं मुळें हो ॥ ५ ॥ चिद्रग-

१ विजेचा. २ समूह.

गनाचा गाभा तैसी सुनीळ अंगप्रभा हो ॥ देखुनि विद्युघनशोभा जैसी कांती चढली नभा हो ॥ रतिनायकवल्लभा देखुनि नागर सांडी दंभा हो ॥ प्रथमारंभस्तंभाभरणें भूषित शामळशोभा हो ॥ ॥ सुंदर० ॥ ६ ॥ भरत बिभीषण पृष्ठीं सहिता गुण मानित उत्कंटी हो ॥ जोडुनि करसंपुष्टी ध्यानीं मारुति मानस वेष्टी हो ॥ देखुनियां सुखपुष्टी झाली प्रेमरसाची वृष्टी हो ॥ सुखसंतुष्टें हर्षे परमेष्टी कोंदे कमळा सृष्टी हो ॥ ७ ॥ नवपंकजलोचनी विस्मित करुणामृत सिंचनी हो ॥ शिवसंकटमोचनी दुर्धररजनीचरभंजनी हो ॥ भवभयसंकोचनी भक्ता निर्भयपदसूचनी हो ॥ रघुकुळउल्हासिनी भोजें विलसत चंद्राननी हो ॥८॥ अव्यक्त पार जींचा विचार खुंटे साहा अठरांचा हो ॥ सुकाळस्वानंदाचा यात्रा अंतरला दुःखाचा हो ॥ जगदुद्धार मातेचा उत्तीर्ण नव्हे मी हे वाचा हो ॥ रामदासीं भेदतरंग तुटोनि गेला साचा हो ॥ ९ ॥

॥ पद ॥ चाल भुत्याची॥ब्रह्मीं माया उदो ॥ त्रिगुणकाया उतत्वच्छाया उदो ॥ चारी खाणी उदो ॥ १ ॥ चारी वाणी उदो ॥ अनंतयोगी उदो ॥ विद्याबुद्धी उदो ॥ नानाविधी उदो ॥ २ ॥ कारणसिद्धी उदो ॥ आगमनिगम उदो ॥ साधनसुगम उदो॥ज्ञानसंगम उदो ॥ ३ ॥ देवा भक्तां उदो ॥ योगीमुक्तां उदो ॥ अनंतसिद्धां उदो ॥ उदो दासा उदो ॥ ४ ॥

॥ आरती ॥ अजरामरपन्नगधर वैश्वानर भाळीं ॥ रसाळवदनें विशाळनयनांजन भाळीं ॥ शूळीं वेष्टित सुरवर किन्नर ते काळीं ॥ हाटक करुणाटक करुणाकल्लोळीं ॥ जय देवी जय देवी जय वेदमाते ॥ आरती ओवाळूं तुळजे गुणभरिते ॥ जय० ॥ १ ॥ हेमासन जगजीवन मनमोहन माता ॥ पवनाशन चतुरानन थकित गुण गातां ॥ अमृतसंजीविनी अंतरसुखसरिता ॥ दासा पालन करिता

१ शेष. २ नदी.

त्वरिता गुणभरिता ॥ ज० ॥ २ ॥ रामाबाई माझे आई ॥ करुणा तुला येऊं दे ॥

॥ बुधवार ॥ येथें उभा कां श्रीरामा ॥ मनमोहन मेघश्यामा ॥ ॥ धृ० ॥ काय केली सीताबाई ॥ येथें राही रखुमाई ॥ १ ॥ काय केली अयोध्यापुरी ॥ येथें वसविली पंढरी ॥ २ ॥ काय केली शरयूगंगा ॥ येथें आणिली चंद्रभागा ॥ ३ ॥ धनुष्यबाण काय केलें ॥ कर कटावरि ठेविलें ॥ ४ ॥ काय केलें वानरदळ ॥ येथें मिळविले गोपाळ ॥ ५ ॥ रामीरामदासीं भाव ॥ तैसा होय पंढरिराव ॥ ६ ॥

॥ अभंग ॥ राम कृपाकर विठ्ठल साकार ॥ दोघे निराकार एकरूपें ॥ ७ ॥ आमुचिये घरीं वस्ती निरंतरीं ॥ हृदयीं एकाकार राहियेलें ॥ २ ॥ रामदास ह्मणे धरा भक्तिभाव ॥ कृपाळू राघव पांडुरंग ॥ ८ ॥ जय जय पांडुरंग हरी ॥

॥ अभंग ॥ रामचरणाचा हा चि भावो ॥ भक्तां दावावया ठावो ॥ उभें राहाया अभिप्रावो ॥ भक्त खांद्या घ्यावया ॥ १ ॥ विठोबा हे अमुची जननी ॥ भीमातीरनिवासिनी ॥ भक्त पुंडलिका लागूनी ॥ वैकुंठीं हुनि पातली ॥ २ ॥ श्रीवत्सांची हे खूण ॥ तें भक्ताचें कृपादान ॥ आजानुबाहू या लागून ॥ भक्ता आलिंगन द्यावया ॥ ३ ॥ शोभे सुहास्यवदन ॥ नाभी नाभी हें वचन ॥ पूर्ण आकर्ण नयन ॥ साधुजन पहाया ॥ ४ ॥ मुकुटीं मयूरपत्रें त्रिवळी ॥ विटे नीट असे ठाकली ॥ रामदासाची माउली ॥ भक्ता लागीं उभी असे ॥ ५ ॥

॥ आरती ॥ निर्जरवर स्मरहरधर भीमातिरवासी ॥ पीतांबर जघनीं कर दुस्तर भव नाशी ॥ शरणागतवत्सल पालक भक्तांशी ॥ चाळक गोपीजनमनमोहन सुखराशी ॥ १ ॥ जय देव जय देव जय पांडुरंगा ॥ निरसीं मम संगा निःसंगा भवभंगा ॥ जय० ॥ अणिमा लघिमा गरिमा नेणाति तव महिमा ॥ नीलोत्पलदलविम-

१ अणूप्रमाणें सूक्ष्म होण्याचा गुण.

ला घननिल तनु शामा ॥ कंटकभंजन साधूरंजन विश्रामा ॥ राघवदास विगलितकामा निष्कामा ॥ जय० ॥ २ ॥

॥ गुरुवार ॥ अभंग ॥ आदिनारायण सद्गुरु आमुचा ॥ शिष्य झाला त्याचा महाविष्णु ॥ १ ॥ त्याचा जो शिष्य तो जाणावा हंस ॥ तेणें ब्रह्मयास उपदेशिलें ॥ २ ॥ ब्रह्मदेवें केला उपदेश वसिष्ठा ॥ तेथें धरा निष्ठा शुद्ध भावें ॥ ३ ॥ वसिष्ठ उपदेशी श्रीरामरायासी ॥ रामें रामदासीं उपदेशीलें ॥ ४ ॥

॥ अभंग ॥ २ ॥ उपदेश देवोनि दिधला मारुती ॥ स्वयें रघूपती नीरवीता ॥ १ ॥ निरवितां तणें झालों रामदास ॥ संसारीं[1] उदास ह्मणोनियां ॥ २ ॥ होवोनी आमुचे कुळीं कुळदैवत ॥ राम हनुमंत आत्मरूपी ॥ ३ ॥ आत्मरूपी झाला रामीरामदास ॥ केला उपदेश दीनोद्धारा ॥ ४ ॥

॥ अभंग ॥ ३ ॥ भाविका भजना गुरुपरंपरा ॥ सदा जप करा राममंत्र ॥ १ ॥ राममंत्र जाणा त्रयोदशाक्षरी ॥ सर्ववेदशास्त्रीं प्रकट ची ॥ २ ॥ प्रकट चि राममंत्र हा प्रसिद्ध ॥ तारीतसे बद्ध जडजीवां ॥ ३ ॥ जडजीवां तारी सकळ चराचरीं ॥ देह काशीपूरीं येणें मंत्रें ॥ ४ ॥ येणें मंत्रें जाणा बद्ध तो मुमुक्षु ॥ साधक प्रसिद्ध सिद्ध होय ॥ ५ ॥ सिद्ध होय राम तारक जपतां ॥ मुक्ति सायुज्यता रामदासीं ॥ ६ ॥

॥ भजन ॥ नारायण विधिवसिष्ठराम ॥ रामदास कल्याणधाम ॥

॥ पद ॥ श्रीगुरुचें चरणकंज हृदयीं स्मरावें ॥ धृ० ॥ निगमनिखिलसाधारण सुलभा हूनी सुलभ वहू ॥ इतर योगयागविषमपथि कां शिरावें ॥ १ ॥ नरतनुदृढनावेसी बुडवूनि अतिमूढपणें ॥ दुष्ट नष्ट कुकर शुकर तनु कां फिरावें ॥ २ ॥ रामदास विनवि तुज अज्ञान तरी समज उमज ॥ विषयविष सेवुनियां फुकट कां मरावें ॥ श्री० ॥ ३ ॥

---

१ संसारीं आसक्त.

॥ आरती समर्थांची ॥ ओंवाळा ओंवाळा सद्गुरुरामदास राणा॥ पंच हि प्राणाचा दीपक लाविला जाणा ॥ धृ० ॥ तिमिरअज्ञान योगें उजळल्या वाती ॥ ज्ञानयोग प्रकट झाला तेणें प्रकाशल्या ज्योती ॥ १ ॥ निर्गुण निरंज्योती सद्गुरु रामदास ॥ दर्शन मंगलप्रद कल्याणाचा कळस ॥ २ ॥ ओंवा०

॥ भजन ॥ जय जय गुरु महाराज गुरु ॥ जय जय परब्रह्म सद्गुरु ॥

॥ शुक्रवार ॥ अभंग ॥ कां हो राममाये दुरी धरियेलें ॥ कठिण कैसें झालें चित्त तुझें ॥ १ ॥ देउनि आलिंगन प्रीतीपडीभरें ॥ मुख पीतांबरें पुसशील ॥ २ ॥ घेऊनी कडीये धरूनी हनुवटी ॥ कई गुजगोष्टी सांगसील ॥ ३ ॥ रामदास ह्मणे केंव्हां संबोखीसी ॥ प्रेम पान्हा देशी जननीये ॥ ४ ॥

॥ भजन ॥ येई धांवत रामाबाई ॥ दासासी दर्शन देई ॥

॥ पद ॥ येई हो रामाबाई ॥ माझे येई हो रामाबाई ॥ धृ० ॥ अनंतरूपें व्यापें ॥ दानवदर्पें पूर्णप्रतापें तव नामें कळिकाळ कांपे ॥ १ ॥ तुझा छंद लागला गे माये निशिदिनिं या जीवासी ॥ तुज विण मी परदेसी ॥ २ ॥ रामीं रामदासीं आराम करणें हें चि तुला उचीत ॥ ह्मणे उपेक्षिसी काय आतां पुरला माझा अंत ॥ ३ ॥

॥ भजन ॥ जय जय सद्गुरु रामदास ॥ सज्जनगडीं करिसी वास॥

॥ पद ॥ लो लो लागला लो ॥ आदिशक्तिचा लागला लो ॥ अंतरिं लो बाहिर लो ॥ जिकडे तिकडे लागला लो ॥ १ ॥ अंडज लो जारज लो ॥ स्वेदज लो उद्भिज लो ॥ देवा लो दानवां लो ॥ सिद्धसाधका लागला लो ॥ २ ॥ दास ह्मणे तो चि जाणे ॥ सद्गुरुवचनीं सुख बाणे ॥ ३ ॥

॥ आरती वेंकटेशाची ॥ अघहारिणी पुष्करिणी अगणितगुणखाणी ॥ अगाध महिमा स्तवितां न बोलवे वाणी ॥ अखंडती-

१ समाधान करिसी.

थांवळी अचपळसुखदानी ॥ अभिनव रचना पहातां तन्मयता नयनीं ॥ जय देव जय देव जय वेंकटेशा ॥ आरती ओंवाळूं स्वामी जगदीशा ॥ जय० ॥ १ ॥ कुसुमालय देवालय आलय मोक्षाचें ॥ नानानाटकरचना हाटकवर्णाचें ॥ थकित मानस पहातां स्थळ भगवंताचें ॥ तुळना नाहीं तें हें भूवैकुंठ साचें ॥ २ ॥ ज० ॥ दिव्यांबरधर सुंदर तनु कोमल नीळा ॥ नानारत्नें नाना सुमनांच्या माळा ॥ नानाभूषणमंडित वामांगीं बाळा ॥ नानावाद्यें मिनला दासांचा मेळा ॥ ज० ॥ ३ ॥

॥ आरती कृष्णेची ॥ सुखभारिते गुणभारिते दुरितें नीवारी ॥ निःसंगा भवभंगा चिद्गंगा तारी ॥ श्रीकृष्णे अवतार जलवेपधारी ॥ जलमयदेहें निर्मल साक्षात हरी ॥ जय देवी जय देवी जय माये कृष्णे ॥ आलों तुझिया उदरा निरसीं मम तृष्णे ॥ जय० ॥ १ ॥ हरिहर सुंदर ओघ ऐक्यासी आले ॥ प्रेमानंदें बोधें मिळणी मीं झाले ॥ ऐशीया संगमीं मिसळोनी गेले ॥ रामदास त्यांचीं वंदी पाऊलें ॥ ज० ॥ २ ॥

॥ शनिवार ॥ अभंग ॥ बाप माझा ब्रह्मचारी ॥ माते समान अवघ्या नारी ॥ १ ॥ उपजतां बाळपणीं ॥ गिळूं पाहे वासरमणी ॥ २ ॥ अंगीं सिंदुराची उटी ॥ जया सोन्याची कासोटी ॥ ३ ॥ राम कृपेची साउली ॥ रामदासाची माउली ॥ ४ ॥

॥ भजन ॥ सीताशोकविनाशनचंद्रा ॥ जय बलभीमा महारुद्रा ॥

॥ पद मारुतीचें ॥ मारुती सरुपा बलभीमा हो ॥ धृ० ॥ अंजनीचें वचनांजन लेउनी ॥ दावविशी बलसीमा रे ॥ १ ॥ वज्रतनू बल भीमपराक्रम ॥ संगीतगायनसीमा रे ॥ मा० ॥ २ ॥ दास ह्मणे हो रक्षीं आह्मां ॥ त्रिभुवनपालनसीमा रे ॥ मा० ॥ ३ ॥

॥ भ० ॥ मारुतिराया बलभीमा ॥ शरण आलों मज द्या प्रेमा ॥

---

१ सुवर्ण.

॥ पद ॥ सामर्थ्याचा गाभा ॥ अहो भीम भयानक ऊभा ॥ पाहतां सुंदर शोभा ॥ लांचावे मन लोभा ॥ १ ॥ हुंकारे भुभुःकारे ॥ काळ ह्मणे अरे बारे ॥ विघ्न तगेना थारे ॥ धन्य हनुमंता रे ॥ २ ॥ दास ह्मणे विर गाढा ॥ घसरित घनसर दाढा ॥ अभिनव हा चि पवाडा ॥ दुसरा न दिसे जोडा ॥ ३ ॥

॥ पद ॥ कैपक्षी भीमराया ॥ निगमांतर विवराया ॥ ब्रह्मानंद वराया ॥ चंचळ मन अवराया ॥ १ ॥ संकटविघ्न हराया ॥ मार कुमार कराया ॥ गुरुपदरेणु धराया ॥ भाविकजन उद्धराया ॥ २ ॥ रघुपतिचा कैवारी ॥ संकट विघ्न निवारी ॥ भजनपूजन मंदवारीं ॥ कल्याणजनहितकारी ॥ ३ ॥

॥ भजन ॥ राम लक्षुमण जानकी ॥ जय बोलो हनुमानकी ॥

॥ आरती मारुतीची ॥ ॥ भीम भयानक रूप अद्भूत ॥ वज्रदेही दिसे जैसा पर्वत ॥ टोंकारुनि नेत्रें रोम थरथरीत ॥ स्थिरता नाहीं चंचळ झाला उदीत ॥ जय देव जयदेव जय महारुद्रा ॥ आरत भेटीचें दे जे कपींद्रा ॥ जय० ॥ १ ॥ हुंकारूनीं बळें गगनीं उसळला ॥ अकस्मात जानकीसी भेटला ॥ वन विध्वंसूनि अखया मारिला ॥ तत्क्षणें लंके वरि चौताळीला ॥ जय० ॥ २ ॥ अटोपेना वानर हटवादी धीट ॥ प्रज्वाळिला जाळूं पाहे त्रीकूट ॥ मिळोनी रजनीचर करती बोभाट ॥ धडाडीला वन्ही शिखा तांबट ॥ ३ ॥ कडकडीत ज्वाळा भडका विशाळ ॥ भुभुःकारें करूनी भुवंडी लांगूळ ॥ थोर हलकालोळ पळती सकळ ॥ वोढावला वाटे प्रळयकाळ ॥ ४ ॥ तृतीयभाग लंका होळी पैं केली ॥ जानकीची शुद्धी श्रीरामा नेली ॥ देखोनी आनंदें सेना गजबजली ॥ रामीरामदासा निजभेटी झाली ॥ जय० ॥ ५ ॥

ह्या आरत्या भजनाच्या अंतीं अमर धुपारती नंतर ह्मणाव्या॥

---

१ शंपूट.

॥अभंग॥ मुकुट किरीट कुंडलें॥ तेज रत्नांचें फांकलें॥ १॥ ऐसा राम माझे मनीं सदा आठवे चिंतनीं॥ २॥ किर्तीमुखें बाहुवटें दंडीं शोभती गोमटे॥ ३॥ जडितरत्नाचीं भूषणें॥ दशांगुळीं विरकंकणें॥ ४॥ कासे शोभे सोनसळा॥ कटीं सुवर्णमेखळा ॥ ५॥ पायीं नूपुरांचे मेळे॥ वांकी गर्जती खळाळें॥ ६॥ राम सर्वांगीं सुंदर॥ चरणीं ब्रीदांचा तोडर॥ ७॥ सुगंधपरिमळ धूसर॥ झेंपावती मधूकरें॥ ८॥ गळां पुष्पांचिया माळा॥ वामे शोभे भूमीबाळा ॥ ९॥ स्वयंभ सुवर्णाची कास॥ पुढें उभा रामदास॥ १०॥

॥अभंग ज्ञानपर॥ एक देव आहे खरा॥ माथां नांथिला पसारा ॥ १॥ हेंचि विचारें जाणावें॥ ज्ञान तयासी ह्मणावें ॥ २॥ साच ह्मणों तरि हें नासे॥ मिथ्या ह्मणों तरि हें दीसे॥ ३॥ पाहों जातां आकारलें॥ मुळीं कांहीं नाहीं झालें॥ ४॥ कैसा देहीं देहातीत॥ कैसें अनंत अनंत॥ ५॥ रामदासाचें बोलणें॥ स्वप्नामाजि जाईजेणें॥ ६॥

॥ अभंग॥ पूर्वीं पाहतां मी कोण॥ धुडूं आपणा आपण॥ १॥ स्वयें आपुला उगव॥ जाणे तो चि माहानुभाव॥ २॥ कोण कर्म आचरला॥ कैसा संसाराशी आला॥ ३॥ आले वाटे जो मुरडे॥ देव तयास सांपडे॥ ४॥ आली वाट ती कवण॥ मायेचें जें अधिष्ठान ॥ ५॥ रामदासाची ऊपमा॥ ग्राम नाहीं कैंची सीमा॥ ६॥

॥ अभंग॥ ३॥ गेला संदेहाचा मळ॥ तेणें निःसंग निर्मळ ॥ १॥ बाह्य गंगाजळस्नान॥ चित्तशुद्धि ब्रह्मज्ञान॥ २॥ सर्वकाळ कर्मनिष्ठ॥ सर्वसाक्षित्वें वरिष्ठ॥ ३॥ रामदासीं स्नानसंध्या॥ सूत करी माता वंध्या॥ ४॥

॥ अभंग॥ ४॥ सृष्टी दृष्टीसी नाणावी॥ आत्मप्रचीत जाणावी॥ १ द्रष्टया विरहीत देखणें॥ दृश्य नुरे दृश्यपणें॥ २॥

१ मिथ्या.

सृष्टी वेगळा निवांत ॥ देव भक्तांचा एकांत ॥ ३ ॥ राम अनुभवा आला ॥ दासा विवाद खुंटला ॥ ४ ॥

अभंग ॥ ५ ॥ आत्मारामा विण रीतें ॥ स्थान नाहीं अणसरतें ॥ १ ॥ पाहतां मन बुद्धि लोचन ॥ रामें वीण नसे आन ॥ २ ॥ संधी नाहीं तीर्थगमना ॥ रामें व्यापिलें भुवना ॥ ३ ॥ रामदासीं तीर्था भेटी ॥ तीर्थ रामें हूनी उठी ॥ ४ ॥

॥ अभंग ॥६॥ रूप रामाचें पाहतां ॥ मग कैंची रे भिन्नता ॥१॥ द्रष्टा दृश्यासीं वेगळा ॥ राम जावींचा जिव्हाळा ॥ २ ॥ वेगळीक पाहतां कांहीं ॥ हें तो मुळी च रे नाहीं ॥ ३ ॥ रामदासीं राम होणें ॥ तेथें कैंचें रे देखणें ॥ ४ ॥

॥ अभंग ॥ ७ ॥ देव जवळी अंतरीं ॥ भेटि नाहीं जन्मवरी ॥ १ ॥ मूर्ती त्रैलोकीं संचली ॥ दृष्टी विश्वाची चुकली ॥२॥ भाग्यें आले संतजन ॥ झालें देवाचें दर्शन ॥ ३ ॥रामदासीं योग झाला ॥ देहीं देव प्रकटला ॥ ४ ॥

॥ अभंग ॥ ८ ॥ कल्पनेचा देव कल्पनेची पूजा ॥ तेथें कोणी दूजा आढळेना ॥ १ ॥ आढळेना देव आढळेना भक्त-कल्पने रहित काय आहे ॥ २ ॥ आहे तैसें आहे कल्पना न साहे ॥ दास ह्मणे पाहें अनुभव ॥ ३ ॥

॥ अभंग ॥ ९ ॥ करीं घेतां नये टाकितां न जाये ॥ ऐसें रूप आहे राघवाचें ॥ १ ॥ राघवाचें रूप पाहतां न दीसे ॥ डोळां भरलेंसें सर्वकाळ ॥ २ ॥ सर्वकाळ भेटी कदा नाहीं तूटी ॥ रामदासीं लूटी स्वरूपाची ॥ ३ ॥

॥ अभंग ॥ १० ॥ स्वानुभवाचे पालवें ॥ शून्य गाळिलें आघवें ॥ १ ॥ सघनीं हरिलें गगन ॥ सहज गगन सघन ॥२॥ शुद्धरूप स्वप्रकाश ॥ अवकाशा वीण आकाश ॥ ३ ॥ रामीं-

१ पदरानें.

रामदास ह्मणे ॥ स्वानुभवाचीये खुणे ॥ ४ ॥

॥ अभंग ॥ ११ ॥ संतलक्षण ॥ पांचां लक्षणीं पुरता ॥ धन्य धन्य तो च ज्ञाता ॥ १ ॥ विवेकवैराग्य सोडीना ॥ कर्ममर्यादा सांडीना ॥ २ ॥ बाह्य बोले शब्दज्ञान ॥ अंतर्यामीं समाधान ॥ ३ ॥ रामीरामदास कवी ॥ न्यायनीतीनें शीकवी ॥ ४ ॥

॥अभंग ॥ १२ ॥ अंतर्यामीं समाधान ॥ बाह्य सगुणभजन ॥१॥ धन्य धन्य तें चि ज्ञान ॥ अंतर्यामीं समाधान ॥२॥ निरूपणें अंतरत्याग ॥ बाह्य संपादी वैराग्य ॥ ३ ॥ रामीरामदास ह्मणे ॥ ज्ञान स्वधर्म रक्षणें ॥ ४ ॥

॥ अभंग ॥ १३ ॥ जीवन्मुक्त प्राणी होवोनियां गेले ॥ तेणें पंथें चाले तो चि धन्य ॥ १ ॥ जाणावा तो ज्ञानी पूर्ण समाधानी ॥ निःसंदेह मनीं सर्वकाळ ॥ २ ॥ मिथ्या देहभान प्रारब्धा अधीन ॥ राहे पूर्णपणें समाधानीं ॥ ३ ॥ आवडीनें करी कर्म उपासना ॥ सर्वकाळ मना ध्यानारूढ ॥ ४ ॥ पदार्थाची हानी होतां नये कानीं ॥ जयाची करणी बोला ऐसी ॥ ५ ॥ धन्य ते चि दास संसारीं उदास ॥ तया रामदास नमस्कारी ॥ ६ ॥

॥ अभंग ॥ १४ ॥ भाव धरी संतां पायीं ॥ तेणें देव पडे ठायीं ॥१॥ नाना देवांचें भजन ॥ तेणें नव्हे समाधान ॥ २ ॥ सकळदेवां मध्यें सार ॥ आहे अनंत अपार ॥ ३ ॥ रामीरामदास ह्मणे ॥ अवघे देव केले जेणें ॥ ४ ॥

॥ अभंग ॥ १५ ॥ शरण जावें संतजना ॥ सत्य मानावें निर्गुणा ॥ १ ॥ नानामतीं काय चाड ॥ करणें सत्याचा निवाड ॥ २ ॥ ज्ञानें भक्तीसी जाणावें ॥ भक्त तयासी ह्मणावें ॥ ३ ॥ रामीरामदास मागे ॥ सर्वकाळ संतसंगें ॥ ४ ॥

॥ अभंग ॥ १६ ॥ सगुणा करितां निर्गुण पाविजे ॥ भक्ति विणें

१ निर्णय.

दुजें सार नाहीं ॥ १ ॥ साराचें हें सार ज्ञानाचा निर्धार ॥ पाविजे साचार भक्तियोगें ॥ २ ॥ वेदशास्त्रीं अर्थ शोधोनि पाहिला ॥ त्यांहीं निर्धारिला भक्तिभाव ॥ ३ ॥ रामीरामदासीं भक्ति च मानली ॥ मनें वस्ति केली रामपायीं ॥ ४ ॥

॥ वैराग्यपर अभंग ॥ अंतीं ॥ एकलें चि जावें ॥ तरी राघवीं भजावें ॥ १ ॥ माता पिता बंधु जन ॥ कन्या पुत्र हीं सोडून ॥ २ ॥ जन्मवरी केला भार ॥ सर्वां साडोनि जोजार ॥ ३ ॥ ह्मणे रामीरामदास ॥ सर्व सोडोनियां आस ॥ ४ ॥

॥ अभंग ॥ २ ॥ काम क्रोध खवळले ॥ मद मत्सर मातले ॥ १ ॥ त्यांचे अधीन ची होणें ॥ ऐसें केलें नारायणें ॥ २ ॥ लोभ दंभ आनावर ॥ झाला गर्व अहंकार ॥ ३ ॥ दास म्हणे सांगों किती ॥ पडली ऐशीयांची संगती ॥ ४ ॥

॥ अभंग ॥ ३ ॥ देवें जन्मासि घातलें ॥ नाना सुख दाखविलें ॥ १ ॥ त्यासि कैसें विसरावें ॥ पुढें कैसेनि तरावें ॥ २ ॥ कुळ समूळ सांभाळीलें ॥ नाना प्रकारीं पाळिलें ॥ ३ ॥ दास म्हणे देवा वीण ॥ दुजा सांभाळी तो कोण ॥ ४ ॥

॥ अभंग ॥ ४ ॥ पुढें होणार कळे ना ॥ समाधान आकळे ना ॥ १ ॥ मना सावधान व्हावें ॥ भजन देवाचें करावें ॥ २ ॥ ऋणानुबंधाचें कारण ॥ कोठें येईल मरण ॥ ३ ॥ रामीरामदास म्हणे ॥ भजनें अमर चि होणें ॥ ४ ॥

॥ अभंगसंग्रह ॥

॥ करुणापर अभंग ॥ कष्टी झाला जीव केली आठवण ॥ पावलें किरणं मारुतीचें ॥ १ ॥ संसारसागरीं आकांत वाटला ॥ भुभुःकार केला मारुतीनें ॥ २ ॥ मज नाहीं कोणी मारुती वांचूनी ॥ चिंतितां निर्वाणीं उडी[1] घाली ॥ ३ ॥ माझें जिणें माझ्या मारुतीला-

१ उड्डान (उडी.)

गलें ॥ तेणें माझें केलें समाधान ॥ ४ उल्हासलें मन पाहातां स्वरूप ॥ दास ह्मणे रूप राघोबाचें ॥ ५ ॥

॥ अभंग ॥ २ ॥ ठकराचें ठाण करीं चापबाण ॥ माझें ब्रह्मज्ञान ऐसें असे ॥ १ ॥ मुखीं रामनाम जीवीं मेघश्याम ॥ होताहे विश्राम आठवीतां ॥२॥ रामरूपीं देहो झाला निःसंदेहो ॥ माझे मनीं राहो हा चि भावो ॥३॥ रामदास ह्मणे रामरूपा वरी ॥ भावें भक्ती चारी वोवाळीन ॥ ४ ॥

॥ अभंग ॥ ३ ॥ ध्यान लागलें रामाचें ॥ दुःख हर्पलें जन्माचें ॥ १ ॥ रामपदांबुजां वरी ॥ वृत्ति गुंते च मधुकरी ॥२॥ रामवदनमयंकीं ॥ चक्षुचकोर झाले सुखी ॥ ३ ॥ तनू मेघश्याम मेळे ॥ चित्तचातक नीवाले ॥ ४ ॥ कीर्तिगंधतरुवरीं ॥ कुजे कोकिळा वैखरी ॥ ५ ॥ रामीरामदासस्वामी ॥ चिंतिताहे अंतर्यामी ॥ ६ ॥

॥ अभंग ॥ ४ ॥ रामा तुझ्या स्वामीपणें ॥ मानीं ब्रह्मांड हें ठेंगणें ॥ तुजवीण कोण जाणे ॥ अंतर आमुचें ॥ १ ॥ तुज विण मज माया ॥ नाहीं नाहीं रामराया ॥ आह्मां अनाथां कायसा ॥ उपेक्षिसी ॥ २ ॥ तुज समुदाय दासांचा ॥ परी आह्मां स्वामी कैंचा ॥ तुज साठीं जिवलगांचा ॥ संग सोडिला ॥ ३ ॥ सगुण रघुनाथ मुद्दल ॥ माझें हें चि भांडवल ॥ दासा धरूनि पैलपार ॥ टाकि या भवाचें ॥ ४ ॥

॥ अभंग ॥ ५ ॥ पतीतपावना ॥ जानकीजीवना ॥ अरविंदनयना ॥ रामराया ॥ १ ॥ आका गांवा गेली ॥ मज व्यथा झाली ॥ कृपाळा राहिली ॥ नवमी तुझी ॥ २ ॥ आका गांवा जातां ॥ निरविलें समर्था ॥ भाक रघुनाथा ॥ साच करीं ॥ ३ ॥ नवमीचा उत्साव ॥ होऊं द्या बरवा ॥ मग देह राघवा ॥ जाऊ राहू ॥ ४ ॥ ऐकोनि करुणा ॥ आयोध्येचा राणा ॥ मूर्तीच्या नयना ॥ अश्रु आले ॥५॥

१. चंद्रीं. २ कमळनयन.

ऐकोनि वचन ॥ जानकीजीवन ॥ कृपेचें पावन ॥ त्रेणे वरी ॥ १ ॥

॥ पदसंग्रह ॥ धांव धांव गा सीतापती रामराया ॥ तुज वेगळी नाहीं गती ॥ नानाशास्त्रें मौनावती॥नाम तारक वेद बोलती ॥१॥ निदान पाहासी किती रामराया ॥ दयाळा निदान पाहासी कीती ॥धृ०॥ जळीं पाषाण तारिले जड ॥ मी काय तुज त्यां हूनि जड ॥ आतां पुरवीं जिविंचें कोड ॥ मनीं घेतला विषयीं मोड॥२॥ तुझ्या भेटीचें आरत मोठें ॥ मज न गमे कांहीं केल्या कोठें ॥ तुज वांचोनि सर्व हि खोटें ॥ दिन बालक तुझें धाकुटें ॥ ३ ॥ वृत्ति जडली पायां पाशीं ॥ जेंवि गुळाशि गुंतली माशी॥दृहिं असोनि गुप्त कां होशी ॥ दास उदास देहभावासी ॥ ४ ॥

॥ धांवा ॥ धांव रे रामराया किती अंत पाहाशी॥प्राणांत मांडिलासे नये करुणा कैसी ॥ धांव रे रामराया ॥ धृ० ॥ १ ॥ पाहीन धणि वरी चरण झाडीन केशीं ॥ नयन शीणले बा आतां केधवां येशी ॥ धांव रे रामराया ॥ २ ॥ मीपण अहंकारें अंगीं भरला ताठा ॥ विषयकर्दमांत लाज नाहीं लोळतां ॥ चिळस उपजली ऐसें झालें बा आतां ॥ धांव रे० ॥ ३ ॥ मारुतिस्कंधभागीं शीघ्र बैसोनि यावें ॥ राघवें वैद्यराजें कृपाऔषध द्यावें ॥ दयेचे पद्महस्त माझे शिरिं ठेवावे ॥ धांवरे० ॥ ४ ॥ या भवीं रामदास थोर पावतो व्यथा ॥ कौतुक पाहातोसी काय जानकीकांता ॥ दयाळा दीनबंधु भक्तवत्सल आतां ॥ धांव रे० ॥ ५ ॥

॥ भजनाचा उपसंहार ॥

॥ समर्थनिर्याणाचे अभंग ॥ १ ॥ आज्ञे प्रमाणें परमार्थ ॥ केला जाण म्यां यथार्थ ॥ १ ॥ आतां देहाचा कंटाळा ॥ आला असे जी दयाळा ॥ २ ॥ आतां एक चि मागणें ॥ कृपा करूनियां देणें ॥ ३ ॥ ज्याची दर्शनाची आशा ॥ त्याची पुरवावी इच्छा ॥ ४ ॥ ऐक स-

---

१ परलोकीं गमनाचे वेळचे.

स्वया वचन ॥ त्याशीं देईन दर्शन ॥ ५ ॥ तेरा अक्षरी मंत्राचा॥जप करील जो साचा ॥ ६ ॥ गणना होतां तेरा कोटी ॥ त्याशी भेटेन जगजेठी ॥ ७ ॥ भय न धरावें मनीं ॥ बहु बोलिलों ह्मणूनी ॥ ८ ॥ न लगे आसनीं बैसावें ॥ न लगे अन्न ही त्यागावें ॥९॥ येतां जातां धंदा करितां ॥ जपसंख्यामात्र होतां ॥ १० ॥ तेरा कोटी गणना ते ची ॥ पापें निरसती जन्मांतरींचीं ॥ ११ ॥ त्याशी देईन दर्शन ॥ तत्काळ चि मुक्त होणें ॥ १२ ॥ ऐसा वर होतां जाण ॥ दास झाला सुखसंपन्न ॥ १३ ॥

॥ अभंग ॥ २ ॥ उतावेळ चित्त भेटीची आरत ॥ पुरवीं मनोरथ मायबाप ॥ १ ॥ रात्रंदिस मज लागला से सोस ॥ भेटी द्यावी असे उच्चाट हा ॥ २ ॥ पराधीन जीणें नको करूं रामा ॥ नेई निजधामा आपूलीया ॥ ३ ॥ तुज वींण रामा मज कोण आहे ॥ विचारूनि पाहें मायबापा ॥ ४ ॥ रामीरामदास बहू निर्बुजलों ॥ मीतूंपणा ठेला बोळवूनी ॥ ५ ॥

॥ अभंग ॥३॥ माझा देह तुज देखत पडावा॥ आवडी हे जिवा फार होती ॥१॥ फार होतां परी पूरली पाहातां ॥ चारी देह आतां हारपले ॥ २ ॥ हारपले माझे सत्य चारी देह ॥ आतां निःसंदेह देहातीत ॥ ३ ॥ निःसंदेह झालों देवा देखतांची ॥ चिंतीते आतां चि सिद्ध झालें ॥ ४ ॥ सिद्ध झालें माझें मनींचें कल्पिलें ॥ दास ह्मणे आलें प्रत्ययाशी ॥ ५ ॥

॥ अभंग ॥ ४ ॥ जन्मोनियां तूज भजो या च बुद्धी ॥ प्राणत्यागसंधी सांभाळिशी ॥ १ ॥ उचींत न चूकें आचिंत्य श्रीरामा ॥ स्वस्वरूपीं आह्मां ठाव देई ॥ २ ॥ जन्म वरी तुज धरीलें हृदयीं ॥ आतां या समयीं पावें तंव ॥ ३ ॥ निष्कामता तूज सेवायाची आशा ॥ अंतीं रामदासा सांभाळावें ॥ ४ ॥

---

१ कंटाळलों.

असें ह्मणून देहविसर्जन करून श्रीराममूर्तीत मुखद्वारा प्रवेश केला ॥ नंतर दहन झाल्यावर तिसरे दिवशीं भस्म काढिलें तेव्हां त्रयोदशाक्षरमंत्रांकित शिला निघाली; ते वेळेस शिष्यमंडळी शोक करीत असतां गुप्तरूपें अभंग बोलिले ॥

॥ माझी काया गेली खरें ॥ परी मी आहें जगदाकारें ॥ ऐका स्वहीतउत्तरें ॥ सांगतों मी ॥ १ ॥ नका करूं खटपट ॥ पहा माझा ग्रंथ नीट ॥ तेणें सायुज्याची वाट ॥ सोई पडे ॥ २ ॥ रामीरामदास ह्मणे ॥ सदा स्वरूपानुसंधानें ॥ श्रीरामाचें ध्यानें ॥ निरंतर ॥ ३ ॥

॥ अभंग ॥ अपराधी अपराधी ॥ आह्मां नाहीं दृढबुद्धी ॥ १ ॥ माझे अन्याय अगणीत ॥ कोण करील गणीत ॥ २ ॥ मज सर्वस्वें पाळावें ॥ प्रतीतीनें सांभाळावें ॥ ३ ॥ माझी वाईट करणी ॥ रामदास लोटांगणीं ॥ ४ ॥

॥ भजन ॥ सज्जनगडनिवासी माझे रामदासमाये रामदासमाये ॥ २ ॥

॥ नंतर सर्वांनीं मिळून प्रदक्षिणा यथाशक्ति करून भजन ह्मणावें तें ॥ जय जय राम राम राम ॥ सीताराम राम राम ॥ नंतर॥

॥ आरती ॥ नानादेहीं देव एक विराजे ॥ नानानाटकलीला सुंदर रूप साजे ॥ नानातीर्थीं क्षेत्रीं अभिनव गति माजे ॥ अगाध महिमा पिंडब्रह्मांडीं गाजे ॥ ध्रु० ॥ १ ॥ जय देव जय देव आत्मया रामा ॥ निगमागम शोधितां न कळे गुणसीमा ॥ जय० ॥ १ ॥ बहुरूपी बहुगुणी बहुता काळाचा ॥ हरिहरब्रह्मादिक देव सकळांचा युगानुयुगीं आत्माराम आमुचा ॥ दास ह्मणे महिमा न बोलवे वाचा ॥ २ ॥ जय० ॥ कायेन वाचा मनसें० पासून जयजयकार केल्या नंतर ॥ महारुद्रहनुमानकी जय ॥ ह्मणून बसून प्रार्थनेचे श्लोक ह्मणावे ते ॥ दुःखानळें[1] बी संतप्त देहीं ॥ तुज वीण रामा वि-

---

१ दुःखरूप अग्नीनें.

भ्रांति नाहीं ॥ अधार तूझा बहु मी विदेशी ॥ श्रीरामराया कधिं भेट देशी ॥ १ ॥ प्रारब्ध खोटें अभिमान आला ॥ स्वामीसमर्थासि वियोग झाला ॥ तेणें बहू खेद वाटे जिवासी ॥ श्रीराम० ॥ २ ॥ तुझिया वियोगें बहु वेदना रे ॥ विवेक नाहीं आह्मां दिनां रे ॥ पडिला समंधू या दुर्जनांसीं ॥ श्रीरामराया कधिं भेट देशी ॥ ३ ॥ संसारचिंता मज वाटती रे ॥ रामा प्रपंचीं मन जातसे रे ॥ संसर्ग आहे इतरा जनासी ॥ श्रीरामराया कधिं भेट देशी ॥ ४ ॥ हिना हूनि मी हीन जैसें भिकारी ॥ दिना हूनि मी दीन नानाविकारी ॥ पतीतासि रे आणि हातीं धरावें ॥ समर्था तुझें काय उत्तीर्ण व्हावें ॥ १ ॥ समर्थें दिलें सौख्य नानापरीचें ॥ सदा सर्वदा जाणसी अंतरींचें ॥ लळे पाळिले त्वां कृपाळुस्वभावें ॥ समर्था तुझें काय उत्तीर्ण व्हावें ॥ २ ॥ जनीं भक्ति नाहीं मनीं भाव नाहीं ॥ मला युक्ति ना बुद्धि कांहीं च नाहीं ॥ कृपाळूपणें राज्य रंकासि द्यावें ॥ समर्था तुझें काय उत्तीर्ण व्हावें ॥ ३ ॥ बहूसाल अन्याय कोट्यानुकोटी ॥ रघूनायकें घातले सर्व पोटीं ॥ किती काय गुणासि म्यां आठवावें ॥ समर्था० ॥ ३ ॥ दिनानाथ हें ब्रीद त्वां साच केलें ॥ ह्मणे दास भक्तांसि रे उद्धरीलें ॥ सुखें सांडणें या देहाचें करावें ॥ समर्था० ॥ ४ ॥ अनाथ मी हीन दीन दारिद्री भजन नेणें काहीं ॥ तुज वीण मज या जगीं पाहातां कोणी च नाहीं ॥ १ ॥ ज्ञान कळे ना ध्यान कळे ना मन वळे ना देवा ॥ विद्या नाहीं वैभव नाहीं ऐसा पूर्वील ठेवा ॥ २ ॥ युक्ति असे ना बुद्धि असे ना शांति वसे ना अंगीं ॥ रामदास ह्मणे दयाळा ऐसा मी भवरोगी[1] ॥ ३ ॥ ओ० ॥ हनुमंत आमुची कुळवल्ली ॥ राममंडपीं वेला गेली ॥ श्रीरामभक्तीनें फळली ॥ रामदास बोले ॥ १ ॥ आमुचे कुळीं हनुमंत ॥ हनुमंत आमुचें दैवत ॥ तया वीण आमुचा परमार्थ ॥ सिद्धीतें न पावे कीं

---

१ संसाररूप रोगानें ग्रस्त.

॥ २ ॥ साह्य आह्मांसी हनुमंत ॥ अराध्यदैवत श्रीरघुनाथ ॥ गुरु श्रीराम समर्थ ॥ उणें काय दासासी ॥ ३ ॥ दाता एक रघुनंदन ॥ वरकड लंडी देई कोण ॥ हें त्यागोन आह्मी जन ॥ कोणा प्रती मागावें ॥ ४ ॥ ह्मणोनि आह्मी रामदास ॥ रामचरणीं विश्वास ॥ कोसळोनि पडो हें आकाश ॥ आणिकाची वास न पाहूं ॥ ५ ॥ स्वरूप संप्रदाय अयोध्या मठ ॥ जानकीदेवी रघुनाथ दैवत ॥ मारुतिउपासना नेमस्त ॥ वाढविला परमार्थ रामदासी ॥ ६ ॥

॥ अभंग ॥ ध्यान करूं जातां मन हारपलें ॥ सगूण तें झालें गुणातीत ॥ १ ॥ जेथें पाहें तेथें राघोबाचें ठाण ॥ करीं चापबाण शोभतसे ॥ २ ॥ राम माझे मनीं राम माझे ध्यानीं ॥ शोभे सिंहासनीं राम माझा ॥ ३ ॥ रामदास ह्मणे विश्रांती मागणें ॥ जिवींचें सांगणें हीतगूज ॥ ४ ॥ जय जय रघुवीर समर्थ ॥

बाळा मुग्धा यौवना प्रौढा सुंदरी ॥ आर्त्या घेवोनियां करीं अल्या त्या नारी ॥ १ ॥ श्यामसुंदररामा चरणकमळीं ॥ वोवाळूं आरती कनकथंगाळीं ॥ २ ॥ चौघी ह्मणती शेजे चला मंदीरा ॥ नवत्या इच्छिती सेवा श्यामसुंदरा ॥ ३ ॥ दास ह्मणे सुमनशेजे चला श्रीहरी ॥ क्षण एक विश्रांती घ्या हो अंतरीं ॥ ४ ॥ सकळां तांबूल पुष्पमाळा ॥ भक्तांचा सोहळा पुरवीला ॥ १ ॥ ध्रु० ॥ स्वामी चला हो निजमंदिरा ॥ सुखशेजेसी रघुवीरा ॥ २ ॥ भक्तासि पालक ब्रह्मांड नायक ॥ श्रीरघूटीळक स्तविती दास ॥ १ ॥ सीताजनकात्मजा अहो रघुराजा ॥ तिष्ठतसे तुझा मार्ग लक्षी ॥ २ ॥ झाली वाढ राती अहो रघुपती ॥ मार्ग सोडविती बंदीजन ॥ ३ ॥ उठले जगजीवन सिंहासनीं हून ॥ वेगीं लिंबलोण उतरिलें ॥ ४ ॥

॥ विडा ॥ विडा घ्या हो रामराया ॥ महाराजराजया ॥ धृ० ॥ रत्नजडित पानदान ॥ आली जानकी घेवोन ॥ विडा देती करो-

१ वाट.

नियां ॥ दीनबंधू रामराया ॥ विडा घ्या० ॥ १ ॥ सुगंध गंगेरी पानें ॥ मुक्तमोतियाचा चूना ॥ सुपारी कातगोळ्या ॥ भक्तिभावें मेळविल्या ॥ विडा घ्या० ॥ २ ॥ जायपत्री जायफळ ॥ विडा जाहाला सुफळ ॥ सीता रामा लागीं देत ॥ केशरकस्तूरीयुक्त ॥ विडा घ्या० ॥ ३ ॥ सीताराम विडा घेतां ॥ ऐक्यभावें एकात्मता ॥ रंगली ऐक्यरंगीं ॥ रामदास पायां लागीं ॥ विडा घ्या० ॥ ४ ॥

॥ शेजारती ॥ परमात्मा श्रीराम महंमाया जानकी ॥ विश्रांती पावली गजर न कीजे सेवकीं ॥ १ ॥ आर्ती आरत ऐक्यभावें ओवाळूं ॥ प्रकाश स्वयं ज्योती निजतेजें बंबाळूं ॥ २ ॥ धृ० ॥ स्नेह ना भाजन नाहीं वाती पावक ॥ सवाह्यांतरीं अवघा निर्घोट दीपक ॥ ३ ॥ ऐक्याचे सुमनशेजे आत्मा रघुपती ॥ राजा रामरघुपती ॥ वाचा परुपली शब्द न बोलवे पुढतीं ॥ ४ ॥ राम आणि दास चैतन्य पहूडले रामीं ॥ हें हो बोलावया दुजा नुरे धामीं ॥ ५ ॥ ॥ रामा रामा रामा रामा रघुनंदना रघुनंदना ॥ रामा रामा रामा रामा कुळभूषणा ॥ १ ॥ रामा रामा रामा रामा जानकीपते जानकीपते ॥ रामा रामा रामा रामा विमळमते ॥ २ ॥ रामा रामा रामा रामा दीनवत्सला भक्तवत्सला ॥ रामदास ह्मणे तुझी अगम्य लीला ॥ ३ ॥ रामा रामा रामा रामा रामा रामा हो रामाहो ॥ तारीं तारीं तारीं तारीं तारीं आह्मां हो ॥ १ ॥ तोडीं तोडीं तोडीं तोडीं भवपाश हा भवपाश ॥ अनन्यशरण रामीं रामदास ॥ १ ॥

राम राम राम राम जप सीताभिराम सीताभिराम राम राम राम जपसीताभिराम ॥ राम राम राम जपसीताभिराम ॥ १ ॥ ॥श्लोक॥ कृपाळूपणें भेटि दे रामराया ॥ वियोगें तुझ्या सर्व व्याकूळ काया ॥ जना माजि लौकीक हा ही न सूटे ॥ उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ १ ॥ सदा सर्व० ॥ २ ॥ सदा चक्रवाकासि० ॥ ३ ॥ भवाच्या भयें काय० ॥ ४ ॥ स्वधामासि जातां महाराजराजा ॥ हनू-

मंत तो ठेविला याचि काजा ॥ सदा सर्वदा राम दासासि पावे॥खळें गांजिल्या ध्यान सोडोनि धांवें ॥ ५ ॥ राम राम राम राम सीताराम ॥ नंतर ज० ॥

॥ श्रीरामनवमीची उत्साहपद्धति ॥

पूर्वदिवशीं सर्व तयारी करावी॥ २॥पाहांटेस भुपाळ्या झाल्यावर दार उघडावें, तिलकधारण, काकडआरती, तेरा हुद्यां सहित॥ काकडआरती झल्या वर सुवासिनीं कडून पंचारती करणें ॥ हुद्यांचा तपशीलः—मोरचेलें २, चवऱ्या २, रुमाल २, धनुष्यें २, दिवट्या २, काठ्या २, अबदागिरी २, छत्र १ या प्रमाणें मध्यान्हकालीं, सायंकालीं, व कथेचे अंतीं ॥ ३ पूजेचे आरंभीं ध्वज लावावा व उत्साहमूर्ति मारुतीची आणावी व गांवांत नऊ दिवस अक्षत देणें नैवेद्याचें सामान दररोज रुजू करणें. रांगाळी गालिच्या काढणें ॥ ४ नित्यपूजा, रामायणसंहिता वाचणें, आरती, छबिना, गांवच्या मारुतीस नेणें व प्रदक्षिणा तेरा. त्या करते वेळीं आरत्या तेरा ह्मणाव्या त्या १ गणपतीची, २ वेदमातेची, ३ सद्गुरुची, ४ श्रीरामाची, ५ मारुतीची, ६ शंकराची, ७ राधारमणाची, ८ नारायणाची, ९ विठोबाची, १० कृष्णेची, ११ विश्वंभरितेची, १२ वेंकटेशाची, १३ मारुतीची; या प्रमाणें आरत्या करणें. नंतर तीर्थ व पुराण व संतपूजा, महा नैवेद्य, ब्राह्मणभोजन. ॥ ५—सायंकालीं करुणाष्टकें, पंचपदी, सवाया, आरती, छबीना, कौल, मनाचे श्लोक २१, व दासबोध दशक चवथा यांतील एकसमास क्रमानें वाचणें. कीर्तन झाल्यानंतर प्रसाद वाटणें, व पुढें मानाचे विडे प्रत्येक दिवशीं वाटणें ॥ ६ ॥ जन्म दिवशीं पुराण, पुराण झाल्या नंतर कीर्तनाचा जन्म करावा. ॥७॥ दशमीस आरतीच्या पूर्वीं भिक्षा करावी. ॥ ८ ॥ एकादशीस सूर्योदयीं रथोत्साह नंतर ललीत, राज्याभिषेक वर्णन-

करणें, तीर्थ प्रसाद उभेराहून घ्यावा. ॥ ९ ॥ माघवद्य नवमीस या प्रमाणेंच. पुराण सुंदरकांड, रथ दशमीस ॥ १०॥ हनुमानजयंतीस सूर्योदयीं जन्म, व पूजा नैवेद्य गूळ फुटाणे यांचा व महानैवेद्य दहीवडे यांचा.

॥ श्रीरामसमर्थ ॥ ॥ कौल ॥ श्लोक ॥ दिली भेटी भर्ताशी उत्साह गाजे ॥ रघूराज राज्याभिषेकीं विराजे ॥ पहा या सुखें लोक भूपाळ आले ॥ रघूराजआज्ञे महीपाळ गेले ॥ १ ॥ नमस्कार केला सुरेंद्रें महेंद्रा ॥ प्रभूनें अनुज्ञा दिली देव इंद्रा॥पुजा मान पावोनि संतुष्ट झाले॥सर्व देव तेतीस कोटी मिळाले ॥ २ ॥तया रावणाचे भयें लोक गेले ॥ सुवर्णाचळाचे दरीं वास केले॥पर्थीं देखिलें दैन्यवाणें प्रजांशी ॥ उभा राहिला इंद्र सांगे तयांशी ॥ ३॥ प्रजा ही पळाल्या जयाच्या भयानें॥तया रावणा मारिलें रावरानें॥सुरांच्या बळें फोडिल्या वंदिशाळा ॥ गुढी रामराज्यीं जना सौख्यवेळा ॥ ४ ॥ पर्टी बैसला राम कल्याणराजा ॥ दुराही फिरे रे गरीबा न वाजा ॥ अरे लोकहो जाहली एकछत्री॥रघूराज राजा विराजे धरत्रीं॥५॥जनाची पिडा पाप संताप गेला॥प्रभू राम हा भाग्य सूर्यो[1] उदेला॥खडाणा[2] गेऊ जाहाल्या कामधेनू॥वनीं वेलि कल्पतरू काय वानूं ॥६॥ खडे सर्व चिंतामणी ते चि गोटे ॥ मला देखतां थोर आश्चर्य वाटे ॥ प्रजा हो तुह्मीं शीघ्र आतां चि जावें ॥ समस्तांशि कल्याण राजा पहावें ॥ ७ ॥ तुह्मीं भोगिले कष्ट आरण्यवासीं ॥ तयाचीं फळें प्राप्त झालीं त्वरेशीं ॥ आपेक्षे हुनी आगळें सर्व जें जें ॥ सुखें रामराज्यीं जना सामरा जें ॥ ८ ॥ महोत्साह उत्साह पाहोनि आलों ॥ अयोध्यापुरा हूनि आतां निघालों ॥ समस्तां जनां थोर आनंद झाला ॥ सुरीं मानवीं जयजयोकार केला ॥ ९ ॥ अरे लोक हो क्लेश सांडूनि द्या रे॥ रघूराजपादां बुजीं जा पहा रे ॥ स्थळा आपुल्या इंद्र सां-

१ मेरूचें, २ लाथाळ, ३ गाई.

गोनि गेला ॥ गुरें वासुरें लोक सैरा निघाला॥१०॥प्रजा कष्टल्या चालिल्या शीण सांगों ॥ अयोध्याधिशा राघवा कौल मागों ॥ गुरें वासरें लेकरें गर्द झाला ॥ अयोध्यासमीपें बहू लोक आला ॥११॥ रघूनाथजी सांगती दूतवार्ता ॥ प्रजा लोक बाहेर आले समर्था ॥ रघूनायकें सर्व ही आणवीले ॥ सभामडपीं ते असंभाव्य नेले ॥१२॥ प्रभू देखिला जयजयोकार केला॥नमस्कारसाष्टांग घालूं निघाला॥ कृपासागरें पाहिलें त्या प्रजांशी ॥ उठा रे उठा राम बोले तयांशी ॥ १३ ॥ रघूराज सिंहासनीं सौख्यदाता ॥ प्रजा कौल मागावया त्या उदीता ॥ प्रभू बोलिला रे अपेक्षीत मागा ॥ नका हेत ठेवूं समस्तांशि सांगा ॥ १४ ॥ बहू कष्टलों पावलों जी सुदेशा ॥ प्रजा बोलती कौल दे राघवेशा ॥ भुमीनें कदा पीक सांडूं नये रे ॥ वदे राम लक्ष्मणा हें लिही रे ॥ १५ ॥ मना सारिखी मेघवृष्टी असावी ॥ जया पाहिजे ते प्रसंगीं पडावी ॥ समर्था प्रभू रोगराई नको रे ॥ वदे राम लक्ष्मणा हें लिही रे ॥ १६ ॥ पिकें देखतां सर्व चिंता निवाली असावी गृहीं संगृहीं पेंव पाली ॥ बिजें बीज कोणाशि मागूं नये रे॥ वदे राम ल० ॥ १८ ॥ मनाची अपेक्षा गुरें बैल गाडे ॥ घरीं दूभती कामधेनू च पाडे ॥ रघूनाथजी भाग्य येथेष्ट दे रे ॥ वदे राम लक्ष्० ॥ १८ ॥ मना सारिखीं पुत्र कन्याकलत्रें ॥ अभीवृद्धि वाढो पवित्रें विचित्रें ॥ सखी पारखीं सोयिरीं प्रीति दे रे ॥ वदे राम लक्ष्मणा० ॥ १९ ॥ कुरूपी विरूपी कदा ही नसावे ॥ नको वृद्ध काया तरूणी असावें ॥ दिनानाथजी सर्व सौख्यास दे रे ॥ वदे राम लक्ष्मणा० ॥२०॥ नको दुःख आह्मां नको शोक आह्मां॥तुझें राज्य तों मृत्यु नकोचि आह्मां ॥ रघूनाथजी शक्ति ऊदंड दे रे ॥ वदे राम लक्ष्० ॥ २१ ॥ ग्रह सर्वरासी सुभांईक व्हावे ॥ सखे मित्र तैसे चि ते ही असावे ॥ दिनानाथ जी विघ्नवार्ता नको रे ॥ वदे राम लक्ष्मणा०

अनुकूल.

॥ २२॥ सदा वासना धर्मपंथीं असावी ॥ दयाशीळ चातुर्यता श्रेष्ठ द्यावी ॥ समर्था प्रभू पापबुद्धी नको रे ॥ वदे राम ल० ॥ २३॥ प्रितीनें प्रजा पाळि रे रामराया ॥ नको दैन्यवाणें करीं दिव्य काया ॥ शरीरीं कदा रोगराई नको रे ॥ वदे राम लक्ष्मू० ॥ २४ ॥ कुडें खोडि कापट्य[1] कांहीं नसावें ॥ सबाह्य शुचिष्मंत तैसें असावें ॥ तुझ्या दर्शना आडकाठी नको रे ॥ वदे राम लक्ष्मू० ॥ २५ ॥ प्रभो क्लेश घेऊनि विश्रांति द्यावी ॥ देहे तों वरी भक्ति तूझी घडावी॥विणी स्वामिणी कौल ऐसाचि दे रे॥वदे राम लक्ष्मणा हें लिही रे ॥ २६ ॥ ॥ कौल समाप्त ॥ ॥ ॥ ॥ ॥

॥ श्रीराम समर्थ ॥ नवविधभक्तीचे अभंग ॥ श्रवणपर अभंग ॥ १ ॥ रामनाम कथा गंगा ॥ श्रवणें पावन करी जगा ॥१॥ तिशीं प्रेमपूर आला ॥ शंकरहृदयीं सामावला ॥ २॥ रामदासाची माउली ॥ आळशा वरी गंगा आली ॥ ३ ॥ कीर्तनपर अभंग ॥ २॥ धन्य धन्य तें नगर ॥ जेथें कथा निरंतर ॥ १ ॥ गुण गाती भगवंताचे ॥ ते चि मानावे देवाचे ॥ २ ॥ स्वयें बोले जगजीवन ॥ थोर कलियूगीं कीर्तन ॥ ३ ॥ रामदास ह्मणे भले ॥ हरिभक्ती उद्धरले ॥ ४ ॥ स्मरणपर अभंग ॥ ३ ॥ रात्रंदिस मन राघवीं असावें ॥ चिंतन नसावें काचनाचें ॥ १ ॥ काचनाचें ध्यान परस्त्रीचिंतन ॥ जन्मासी कारण हींच दोन्ही ॥ २ ॥ दोन्ही नको धरूं निंदा नको करूं नेणें हा संसारू तरशील॥ ३ ॥ तरशील भवसागरीं बुडतां॥सत्य चि अनंताचेनि नामें ॥ ४ ॥ नामरूपातीत जाण तो अनंत ॥ दास ह्मणे संतसंग धरा ॥ ५ ॥ पादसेवनपर अभंग ॥ ४॥ त्रिविधतापहारक हे गुरुपाय० ॥ अर्चनपर अभंग ॥ ५ ॥ पूजा देवाची प्रतिमा ॥ त्याची न कळे महिमा ॥ १ ॥ देव भक्तांचा विश्राम ॥ त्याशीं नेणे तो अधम ॥ २ ॥ नाना स्थानें भूमंडळीं ॥ कोणीं सांगावीं आ-

[1] कपट.

गळीं ॥ ३ ॥ ज्याचे चरणींचें उदक ॥ धन्य होती विश्वलोक॥ ४ ॥ ज्याचीं चरित्रें ऐकतां ॥ जनीं होय सार्थकता ॥५॥ रामीरामदास ह्मणे ॥ धन्य होइजे स्मरणें ॥ ६ ॥ वंदनपर अभंग ॥ ६ ॥ प्रेमाचि- या सन्निधानें ॥ देव आले साभिमानें॥१॥आतां आनंद आनंद ॥ देवभक्तां नाहीं भेद ॥ २ ॥ मुख्य पूजापरंपरा ॥ केला दासासि अधिकार ॥ ३ ॥ दास पाउलें वंदितो॥ पदा सन्निध राहातो ॥४॥ दास्यपर अभंग ॥ ७ ॥ रामदास्य आणि हें वायां जाईल ॥ ऐसें न घडेल कदाकाळीं ॥ १ ॥ कदाकाळीं राम दासा उपेक्षीना ॥ राम- उपासना ऐशी आहे ॥ २ ॥ ऐशी आहे सार राघोबाची भक्ती ॥ विभक्तीची शक्ती जेथें नाहीं ॥ ३ ॥ जेथें नाहीं कांहीं वाउगें मा- यीक ॥ रामउपासक दास ह्मणे ॥ ४ ॥ सख्यपर अभंग ॥ ८ ॥ देव असतां पाठीराखा ॥ त्रैलोक्याचा कोण लेखा ॥ १ ॥ नाना उद्वेग वाटती[1] ॥ नाना चिंता उद्भवती ॥ २ ॥ स्वस्थ वाटे ना अंतरीं ॥ नाना व्यवधान करी ॥ ३ ॥ रामदास ह्मणे भावें ॥ भजन देवाचें करावें ॥ ४ ॥ आत्मनिवेदनपर अभंग ॥ ९ ॥ आत्मनिवेदन नववें भजन ॥ येणें संतजन समाधानी ॥ १ ॥ समाधानी संत आत्मनि- वेदनें॥ज्ञानें मीतूंपणें सांडवलें॥२॥सांडवले सर्व मायिकसंगाशी ॥ रामीरामदासीं निःसंगता ॥ ३ ॥

॥ श्रीराम ॥ न्हाणी ॥ न्हाणी न्हाणी रामातें अरुंधती ॥ ऋषि- पत्न्या पाहुनि संतोषती ॥ रामलीला सर्वत्र मुनि गाती ॥ स्नानउ- दक यमुना सरस्वती वो ॥ १ ॥ ज्याच्या चरणीं कावेरी कृष्णा वेणी ॥ ज्याच्या स्नेहें कपिलादि ऋषीमुनी ॥ त्या रामातें न्हाणिलें प्रीति करूनी ॥ २ ॥ ज्याच्या नामें उपदेश विश्वजना ॥ ज्याच्या स्मरणें कळादि करिती करुणा ॥ ज्याच्या प्राप्ती स्तव करिती अ- नुष्ठान ॥ त्या रामातें न्हाणूनि फुंकी कर्णा ॥ ३ ॥ रमती योगी स्व-

[1] चिन्ता.

रूपीं आत्माराम ॥ निशीदिनीं चरणीं असावा नित्यनेम ॥ त्या रामाचा पालख विश्वधाम ॥ दास ह्मणे भक्तीचें देई प्रेम ॥ ४ ॥

॥ पाळणा ॥ हळू हळू गाई निज रे बाळा ॥ मोठा जटाधारी गोसावी आला ॥ खरचरभू जा जा रे फकीरा ॥ निजला माझा पालखीं हीरा ॥ हळू हळू गा० ॥ १ ॥ नको येऊं रे बागुलबावा ॥ निजला माझा पालखीं रावा ॥ सगुण गुणाचें बालक माझें ॥ कोणी दावा हो या सम ये दुजें ॥ हळू हळू गा० ॥ २ ॥ लागली दृष्टी कोण्या पापिणीची ॥ उतरे प्रभा मुखचंद्राची ॥ हालवी कौसल्या आला प्रेमपान्हा ॥ दास ह्मणे आला वैकुंठराणा ॥ हळू हळू गा० ॥ ३ ॥ जो जो जो जो रे श्रीरामा ॥ निजसुखगुणविश्रामा ॥ जोजो ॥ धृ० ॥ ध्याती मुनियोगी ॥ तुज लागीं ॥ कौसल्येचोत्संगीं ॥ १ ॥ वेदशास्त्रांची मति चाण ॥ स्वरूपीं झाली लीन ॥ २ ॥ चारी मुक्तींचा ॥ विचार ॥ चरणीं पाहति थोर ॥ ३ ॥ भोळा शंकर ॥ निशिदीनीं ॥ तुजला जपतो मनीं ॥ ४ ॥ दास गातसे ॥ पाळणा ॥ रामा लक्ष्मणा ॥ ५ ॥ जो जो० ॥

॥ ललितप्रकरण ॥ रामा तुज कल्याण मागणें ॥ रामा तुज कल्याण मागणें ॥ धृ० ॥ तूं जगजीवन तूं मनमोहन ॥ कोण आहे तुज विणें ॥ रामा० ॥ १ ॥ आह्मी हरिजन तूं जनपावन ॥ बोलति वेदपुराणें ॥ रामा० ॥ २ ॥ देव हि आले भक्त मिळाले ॥ आनंदे तुझे गुणें ॥ रामा० ॥ ३ ॥ भक्त सुखी ऋषि सुखी ॥ दास ह्मणे तुझें देणें ॥ रामा० ॥ ४ ॥

॥ पद हिंदुस्थानी ॥ जयहोमहाराजगरिबनवाज ॥ बंदकमीनाकहनाकेतुसाहेब तेरीहीलाज ॥ होमहाराज० ॥ १ ॥ मैं सेवक बहु सेवा मागू ॥ इतना है सब काज हो महा० ॥ २ ॥ छत्रपती तुम रोकदार सिव ॥ इतना हमारा अर्ज ॥ हो महा० ॥ ३ ॥ कपि स-

---

१. पाळणा.

कळ ही प्रयाणकाळीं ॥ प्रेमें वोसंडती दोही डोळीं ॥ नित्य आठवे सूखाची नव्हाळी ॥ ह्मणती रामा तुझी सवे लागली ॥ हो रामा० ॥ १ ॥ जो तूं अगोचर ब्रह्मादिकां ॥ ध्यानीं नातुडसी पंचमुखा ॥ तो तूं आह्मां झालासी निजसखा ॥ प्रेम दिधलें वायुसुता ॥ हो रामा० ॥ ३ ॥ तुझ्या वोळगे सुराशी न लगे हो ठावो ॥ आह्मी वानरें निकट उभीं राहों ॥ न्याहार धरूनि वदन तुझें पहा हो ॥ परि धाला नाहीं आमचा भावो ॥ हो रामा० ॥ ४ ॥ पद ॥ हो रामा कृपा बहुत असों देणें ॥ आह्मी धन्य जाहालों तुझे गुणें ॥ ध्रु० ॥ रामा गोड लागती तुझ्या गोष्टी ॥ हर्षें गुदगुल्या होताती पोटीं ॥ जणु सांपडली चणियाची मुठी ॥ वाटे धरावी तुझी हनुवटी ॥ रामा कृ० ॥ १ ॥ राम आलिंगोनी सप्रेमें बोले ॥ तुह्मी मज लागिं हे कष्ट केले ॥ सुखी करोनि सर्व गौरविले ॥ रामदासीं हनुमंत ठेले॥ रामा० ॥ २ ॥ श्लोक ॥ सिंहासना वरि रघूत्तम मध्यभागीं ॥ बंधू तिथे परमसुंदर पृष्ठभागीं ॥ वन्हीसुता निकट शोभत वामभागीं ॥ वीलासतो भिम भयानक पूर्वभागीं ॥ १॥ कपी सुग्रिवा अंगदा जांबवंता ॥ गज्या मारुता आणि नैर्ऋत्यनाथा ॥ समस्तासि सन्मानिलें रामचंद्रें ॥ सुधाउत्तरें तोषवीलें नरेंद्रें ॥ २ ॥ तुरे आणिले घातल्या पुष्पमाळा ॥ किती एक त्या रत्नमाळा सुढाळा ॥ करीं कंकणें मुद्रिका लेववीलीं ॥ यथासांग संपूर्ण सर्वांस दीलीं ॥ ३ ॥ अलंकार चीरें बहू सिद्ध केलीं ॥ असंभाव्य दिव्यांबरें आणवीलीं बहू भूपणांचे बहू ढीग केले ॥ जगन्नायकें ते कपी गौरवीले ॥ ४ ॥ सभामंडपीं फांकल्या रत्नकीळा ॥ समस्तांसि ते जाहली सौख्यवेळा ॥ किती एक सांगीतल्या कानगोष्टी ॥ महावीर आनंदले सर्व सृष्टीं ॥ ५ ॥ मुखीं बोलिजे वैद्यराजासि देवें ॥ कपी तुज ऊचित म्यां काय व्हावें ॥ वरू दीधला रामचंद्रें उचीती ॥ तुझ्या द-

१ न मिळसी.

र्शनें लोक आरोग्य होतें ॥ ६ ॥ समस्तांकडे पाहिलें राघवानें ॥ तयांसि रोमांच आले स्फुरणें ॥ नमस्कारिलें स्वामि देवाधिदेवा ॥ ह्मणे राम तो लोभ आलां असावा ॥ ७ ॥ असंभाव्य केली स्तुती राघवाची ॥ वद्धों लागली मंडळी प्रेमळांची ॥ कपी बोलती सत्य कारुण्यवाचा ॥ स्तुती ऐकतां रामसिंधू सुखाचा ॥ ८ ॥ अजयो नको रे जयवंत हो रे ॥ कापट्यकर्मीं सहसा नको रे ॥ निर्वाणचिंता चुकवीं अनंता ॥ शरणागतातें बहु घातपाता ॥ ९ ॥ अनुष्टुप्छंद ॥ स्मरणीया वयं राम न स्मरामि अहो कपे ॥ स्मरणं चेतसो धर्म स्तच्चित्तं हारितं मम ॥ १० ॥ जनीं जाहली पूर्ण हे रामनवमी ॥ कृपे तोषला स्वामि हा नित्यनेमीं ॥ यशस्वी दयानंद कल्याणमस्तू ॥ तथास्तू तथास्तू तथास्तू तथास्तू ॥ १ ॥ घडो सर्वदा भक्ति या राघवाची ॥ जळो कामना दुःख चिंता भवाची ॥ यशस्वी दयानंद कल्याणमस्तू ॥ तथास्तू० ॥ २ ॥ सदा सर्वदा चिंतितां देव पावो ॥ सदा वृत्ति हे शुद्ध निःसंग राहो ॥ यशस्वी दयानंद कल्याणमस्तू ॥ तथास्तू० ॥ ३ ॥ विकल्पाचिया मंदिरीं दीप नाहीं ॥ सदा शुद्ध संकल्प देहात्मगेहीं ॥ यशस्वी दयानंद कल्याणमस्तू ॥ तथास्तू तथास्तू तथास्तू तथास्तू ॥ ४ ॥

॥ पद ॥ रघुराजके दरबार धमडी गाजतु है ॥ तथैथैथै पकवाज बाजतु है ॥ धृ० ॥ सुरवर मुनिवर देखण आवतु है ॥ १ ॥ नारद तुंबर किन्नर सुरवर गावतु है ॥ शंख भेरी सुनके रोम थरकतु है ॥ २ ॥ लाल धुसर तवके वुडायतु है ॥ रामदास तहां बलि ज्यावतु है ॥ ३ ॥ रघु० ॥ ललितप्रकरण समाप्त ॥

॥ पद ॥ कृपाळू रघुवीरें खादलीं भिल्लटिबोरें ॥ उच्छिष्ट आदरें आंगिकारि रे ॥ धृ० ॥ वैभवीं नाहीं चाड देवातें भाव चि गोड ॥ पुरवितो कोड अनन्याचें रे ॥ १ ॥ दुर्लभ ब्रह्मादिकांसी सुलभ वा-

---

१ शबरीचीं.

नरासी ॥ काये तया पासीं भावें विण रे ॥ २ ॥ रामीरामदास ह्मणे देव हा दयाळूपणें ॥ उठवितो रणें वानरांचीं रे ॥ ३ ॥

॥ पद ॥ जन्मला चि नाहीं तो मरेल काई ॥ जीणें मरणें दोन्ही नाहीं रे ॥ धृ० ॥ जनीं जीवन्मुक्त वर्ततात हरिभक्त ॥ सद्गुरुबोधें ते अच्युत रे ॥ १ ॥ जिणें आणि मरणें येणें आणि जाणें ॥ साधु तो अचळ पूर्णपणें रे ॥२॥ सेवितां साधूचे चरण बाधिना दक्षणायन॥ रामीरामदासीं निज खुण रे ॥ ३ ॥

॥ पद ॥ भूषणमंडित माळा तेजाचा उमाळा ॥ सुंदर सुमन माळा ॥ भोंवता मधुकरपाळा ॥ १ ॥ रघुविर सुरवरदानी भक्तांचा अभिमानी ॥ योगी मुनिजन ध्यानीं राहाती समाधानी ॥धृ०॥ पीत वसन घन साजे ॥ मुरडीव वाकी वाजे ॥ वर तोडरीं ब्रीद गाजे ॥ कीर्ति विशाळ चि माजे ॥ २ ॥ अभिनव कार्मुकपाणी ॥ निगम माति पुराणीं॥विगळित होते वाणी ॥ समजतसे शूळपाणी ॥ ३ ॥ राम सकळ जन पाळी ॥ भक्तांला सांभाळी ॥ जन्ममरण दुःख टाळी ॥ अगणित सौख्यनव्हाळी ॥४॥ दास ह्मणे मज हीत ॥ माझें कुळदैवत ॥ जे जन होती रत ॥ ते सकळ ही तरत ॥ ५ ॥

॥ पद ॥ सामर्थ्याचा गाभा भीमभयानक उभा ॥ पाहतां सुंदर शोभा लाचावे मन लोभा ॥ धृ० ॥ हुंकारे भुभुकारें काळ ह्मणे अरे बा रे ॥ विघ्न तगे ना थारे धन्य हनुमंता रे ॥ १ ॥ दास ह्मणे विर माढा ॥ घसारित घनसर दाढा ॥ अभिनव हा चि पवाडा ॥ पहातां न दिसे जोडा ॥ २ ॥

॥ पद ॥ रावण सीता दडवी भीम निशाचर बडवी ॥ अघटित वे घडवी वर रजनीचर ते रडवी॥१॥धृ०॥ जाउनि शीता शोधी॥ सकळांचा विरोधी॥वानर मोठा क्रोधी ॥ त्रिकुटीं जन रोधी॥१॥ मोठी आली घाडी॥ पुच्छयानें पछाडी॥ होती ताडातोडी ॥

---

१ समूह

कंठीं झोडाझोडी ॥ २ ॥ दैतीं केले चाळे ॥ सुरवर बंदीशाळे ॥ त्या रागें उफाळे ॥ वन्हिचे उबाळे ॥ ३ ॥ वनीं वनें कडकावी ॥ बळकट शिक्षा लावी ॥ भुजा वळें भडकावी ॥ लंकेतें धडकावी ॥ ४ ॥ सीता शोधुन गेला ॥ हलकाल्लोळ केला ॥ भेटे राघवाला ॥ दासपत्वें निवाला ॥ ५ ॥

॥ एकताळपंचक ॥

॥ पद ॥ वेधु लागला रामाचा ॥ सुरवरविश्रामाचा ॥ धृ० ॥ तेथें सुरवरनरकिन्नरविद्याधरगंधर्वांचा मेळा ॥ तेथं न्यून कोकिळा मंजळ किळा॥कुळकीरम्य रसाळा ॥ तेथें गायनकळा रंग आगळा ॥ वाहे अमृतवळा ॥ तोसुखसोहळा देखून डोळां ॥ लांचावे मनमेळा ॥ १ ॥ एकताल मृदंगें श्रुतिउपांगें ॥ गाती नवरस रंगें ॥ एक रंग सुरंगें दाविती संगें सप्तस्वरांचीं आंगें ॥ एक अनेक ॥ रागें आलापयोगें ॥ बिकट ताल सुघांगें ॥ एक झकिटकिटकिटथरिकथरिक वाजती चपळांगें ॥ २ ॥ तेथें खणखणखणखण टाळ वाजती ॥ झणझणझणझण यंत्रें ॥ तेथें दणदणदणदण मृदंग मंजुळ ॥ तालबद्ध परतंत्रें ॥ तेथें चणचणचणचण शब्द बोलती ॥ वाणी चपळ सत्पात्रें ॥ तेथें घणघणघणघण घंटा वाजती ॥ अनुदातें शुळमंत्रें ॥ ३ ॥ तेथें झगझगझगझग झळकति रत्नें ॥ स्वचित बैसे शोभा ॥ तेथें धगधगधगधग तेज आगळें लावण्याचा गाभा ॥ तेथें मगमगमगमग सुगंधपरिमळ ॥ षट्पद घेती क्षोभा ॥ पवनतनुज दासाचें मंडण ॥ निकट राहिला उभा ॥ ४ ॥ ॥

॥ पद ॥ रामा चाल रे झडकरी ॥ त्रिभुवन हरुषें भारी ॥ धृ० ॥ सरयुनदीतिरीं आयोध्यापुरी रमणिय रचिली भारी ॥ तीसी प्रतिमल्लसरी ऐसी च दुसरी नाहीं पृथ्वी वरी ॥ ते वैकुंठमंदिरीं गमन सुंदरी सत्या मधें थोरी ॥ ऐसें जाणोनी श्रीकौसल्योदरीं ॥

---

१ भुंगे.

आनंद सचराचरीं ॥ १ ॥ तेथें ऋषिकुळ सकळ नांदति निर्मळ ॥ उत्साहाचेनि उसळें ॥ तेथें धोत्रें सोज्वळें झेलिती करतळें विभूतिचे गोळे ॥ तें ध्यानीं नाकळे मना नाढळे तें रूप पाहाती डोळे ॥ आणि क्रूर विशाळें वधिलीं दिसाळें ॥ पावोनि यत्नें फळे ॥ २ ॥ तेथें ब्रह्मनंदिनी शापबंधिनी असतां निजपतिवचनीं ॥ ते रामागमनीं ऐकतक्षणीं हरुषत अंतःकरणीं ॥ म्हणे त्या श्रीचरणीं होतां मिळणी पालटेन पाषाणीं ॥ ऐसें चिंतुनि दिवसरजनी पथा पाहतां लोचनीं ॥ ३ ॥ तेथें सुरवर नाचति वाद्यें वाजती वरुषति पुष्पें जि मुनी ॥ तेथें गंध वात गती नेत दिगंतीं घ्राणा होतसे तृप्ती ॥ तेथें दिशा झळकती सफळ वनस्पती पद शुभ बोलती ॥ आला म्हणती राम सीतापती ॥ जयजयकारें गर्जती ॥ ४ ॥ तेथें दशरथमानसीं रामश्रवणशशी तुंबळ सुखसिंधूसी ॥ तेथें जनकसरितेसि मिळणी कैसी होताहे गजरेंसीं ॥ तेथें भक्तचकोरासी आनंद अहर्निशी ॥ पाहतां ती उदयासी ॥ ऐसें देखुनि भक्ती नवमीसीं प्रकटत रामदासी ॥ ५ ॥

॥ पद ॥ फरफरफरफर वोढिती कुंजर धनुष्य आणिलें भूपें ॥ हरहरहरहर अति पण दुष्कर सुंदर रघुपती रूपें ॥ वरवरवरवर रघुपती वोढीत दशमुख संतापे ॥ करकरकरकरकर शकरारे थरथरथर भू कंपे ॥ धृ० ॥ रामें सज्जीलें वितंड परम चंड कोदंड ॥ रामें उचालिलें त्र्यंबक कौशिक ऋषि पुळकांक ॥ रामें ओढिलें शिवधनु सीतेचें तनुमनु ॥ रामें भंगिलें भवचाप असुरा सुटला कंप ॥ १ ॥ कडकडकडकड भग्न कडाडे ॥ तडतडतडक फुटे ॥ गडगडगडगड गगन कडाडी ॥ धडधडधड धडक उठे ॥ भडभडभडभड रविरथ चुके घडघडीत आर्[१]हाटे ॥ खडखडखड खचित दिग्गज चळीत्त कुळाचळ कुटे ॥ २ ॥ दुमदुमदुमदुमदुमित भुगोळें स्वर्ग

१ नाकाला. २ आडमार्गाला.

मृत्युपाताळें ॥ घुमघुमघुमघुम घुमकट कर्णी विषीस बैसले टाळे ॥ हळहळहळहळ अति कोल्हाळहळ ॥ हराशिरपंचक डोले ॥ खळखळ-खळखळ उचंबळत जळसिंधूसी मोहो आंदोळे ॥ ३ ॥ धकधकधक-धक धकीत धरणीधर बधिर झाले नयन ॥ चकचकचकचक च-कीत निशाचर करविलें दीर्घशयन ॥ थकथकथकथक थकीत सु-रवर वरुषती पुष्पें तसे ॥ लखलखलखलखलख रत्नमालिका ज-नकालिक लग्न ॥ ४ ॥ जयजयजयजय जयति रघुराजविरा जयकारें गर्जती ॥ धिमधिमधिमधिम नृप देवदुंदुभि गगन गर्जळे गजरें ॥ तरतरतरतर मंगळतुरें विविधवाद्यें सुंदरें ॥ समरसरसरस दासा मानसीं रामसीता वधूवरें ॥ ५ ॥

॥ पद ॥ रंगीं नाचतो त्रिपुरारी लीलानाटकधारी ॥ धृ० ॥ मंदरजावर त्रीपुरसुंदर अर्धनारीनटेश्वर ॥ नाचे शंकर सकळक-ळाकर ॥ विश्वासी आधार ॥ झुळझुळझुळझुळ शिरीं गंगाजळ झळ-झळ मुगुटीं किळा ॥ लळलळलळलळ लळित कुंडलें भाळीं इंदुज्वा-ळ ॥ सळसळसळसळ सळकती रसना वळवळवळीती व्याळ ॥ हळह-ळहळहळ कंठीं हळाहळ ॥ गायनस्वर मंजुळ ॥ १ ॥ थबथबथबथब गळती सद्या रुंडमाळिका कंठीं ॥ चपचपचपचप हस्तक लवति दस्तक धरी धूर्जटी ॥ खडखडखडखडखड व्याघ्रांबर गजचर्म परवंटी ॥ भडभडभडभडभड धूशर उधळत चिताभस्म निज उटी ॥ २ ॥ किणिकिणिकिणिकिणि वाजति किंकिणि घणघणघण ख-णाणी ॥ झणझणझणझण वांकी चरणीं ॥ दणदणदण धरणी ॥ खणखणखणखण टाळ उमाळे रुणझुण वेत्रें पाणी ॥ गुणगुणगुण-गुण वर्णिती वाणी ॥ खुणखुणखुण निर्वाणीं ॥ ३ ॥ टिमिटिमिटि-मिटिमि मृदंग गंभिर डिमिडिमिडिमिडिमि डिमर ॥ धिमिधिमिधि-मिधिमि दुंदुभि गर्जे झिमिझिमिझिमि झल्लर ॥ घुमघुमघुमघुम येव-

ज गमकत दुमदुमदुम अंबर ॥ ततथै ततथै धिकिट धिकिट ह्मणती विद्याधर ॥ ४ ॥ थरथरथरथर कंपित गमके गरगरगरगर भ्रमर ॥ सरसरसरसर कंपित चमके धुरधुरधुरधुर गंभिर ॥ परपरपर ह्मणती सुरवर हरहरहरहर शंकर ॥ वरवरवरवर दासा दिधला ॥ तरतरतर दस्तुर ॥ ६ ॥

॥पद॥ आठवे मनीं आठवे मनीं आठवे मनीं सदा राम चिंतनीं॥ धृ० ॥ मुकुटीं किरीटी वक्र भृकुटि रम्य गोमटीं नयनांबुजें ॥ १ ॥ मकरकुंडलें ठाण दंडलें तेज खंडलें मेघदामिनीं ॥ २ ॥ वाणली उटी कास गोमटी किंकिणी कटी क्षुद्रघंटिका ॥ ३ ॥ पदक मेखळा फांकती किळा ॥ रूळती गळा मुक्तमाळिका ॥ ४ ॥ तें सुलक्षणें रत्नभूषणें ॥ वीरकंकणें शोभती करीं ॥ धृ० ॥ रम्य रंगलें चाप चांगलें ॥ सैन्य भंगलें त्रीकुटाचळीं ॥ ६ ॥ अंदु नूपुरें वांकि गजरें ॥ तीं मनोहरें पाउलें वरीं ॥६॥ हृदय कवळीं मूर्ति सावळीं ॥ दास न्याहळी कूळदेवत ॥ ८ ॥

॥ पद ॥ नवमि करा नवमि करा नवमि करा भक्ति नवमी करा ॥ धृ ॥ अष्टमी परी नवमी वरी ॥ तये दुसरी न पवे सरी ॥ १ ॥ राम प्रकटे भेद हा तुटे ॥ अभेद ऊमटे ते चि नवमी ॥ २ ॥ शीघ्र नवमी येतसे ऊर्मी ॥ रामदास मी अर्पिली रामीं ॥ ३ ॥ दीनबंधु रे दीनबंधु रे दीनबंधु रे राम दयासिंधू रे ॥ धृ० ॥ भिल्लटीफळें भक्तवत्सलें ॥ सर्व सेविलीं दासप्रेमळें ॥१॥ चरणिं उद्धरी दिव्य सुंदरी॥ शापबंधनें मुक्त जो करी ॥ २ ॥ वेदगर्भ जो शीव चिंतितो ॥ वानरांसिं गूज सांगतो ॥ ३ ॥ राघवीं बिजे रावणानुजे ॥ करुनि पावला नीज राज्य जें ॥ ४ ॥ पंकजाननें दैत्यभंजनें ॥ दास पाळिले विश्वमोहनें ॥ ९ ॥

॥ पद ॥ मांबुजाननं मांबुजाननं मांबुजाननं मांबु देहि मे ॥धृ॥

---

१ कमल नेत्र रामानें.

योगिरंचनं चापभंजनं ॥ जनकजापतिंविश्वमोहनम् ॥ १ ॥ विबुद्ध-कारणं शोकहारणं ॥ अरिकुळांतकं भयनिवारणं ॥ २ ॥ जयकृपालयं दासपालयं ॥ चरणपंकजं देहि मे लयं ॥ ३ ॥

॥ पद ॥ ऐसें ध्यान मानसीं दिसे राम निरुपमलीळा ॥ सांवळें सुंदर रूप मनोहर शोभती सुमनमाळा ॥ धृ ॥ मुकुट किरीटीं कुंडलें मंडित गंडस्थळा वरि शोभा ॥ केयूरदंड उदंड विभूषण लावण्याचा गाभा ॥ १ ॥ सरळ कुरळ नयन कमळदळ श्याम सकोमळ साजे ॥ झळके इंद्रनीळ तळपे रत्नकिळ मुनिजनध्यानीं विराजे ॥ भाळ विशाळ रसाळ विलेपन परिमळ अनिळविलासीं ॥ मृगमद केशर धूसर आंगीं हासित वदन सुखराशी ॥ ३ ॥ कटतट वेंकट कासे पीत पट मिरवत उटी सुगंधें ॥ रुळत कल्लोळ सुढाळ माळिका डोलती तेणें छंदें ॥ ४ ॥ जडित पदक विरकंकण किंकिणी अंदु नूपुर वारे ॥ सकळ रिपूकुळ निर्मळ ऐसे वाकी तोडर ब्रीद गाजे ॥ ५ ॥ कर केशर चाप विलाप दानवा काळरुप मति भासे ॥ दास ह्मणे रणकर्कश रामें अंतक तो ही त्रासे ॥ ६ ॥

॥ पद ॥ मिरासीचा ठाव मिरासीचा ठाव मिरासीचा ठाव मिरासीचा ठाव धरा रे ॥ जेथुनि आले तिथे चि जाउनि मागुती वास करा रे ॥ धृ ॥ अज्ञानदारिद्य निरसलें ॥ ज्ञानलक्ष्मीतें कोण पुसे आपण चि सर्व ही अहंकार गोत्र ॥ जघातघेपा तेथें नेत ॥ एक पद तेथें विपट नाहीं सर्व ही सिद्धी विलसे ॥ ऐसी हे मिरासी टाकियेली थोर मस्तकीं अभिमान पिसें ॥ १ ॥ संत सनकादीक नारद तुंबर वृत्ती ते ही लक्षिली ॥ नागेव उघडे आपदा भोगुनि जीवेंसीं सदृढ धरिली ॥ वडिलांची जन्ममृत्युभूमी ते ही सर्वकाळ यत्न केली ॥ धिगींधिगींते जिणें पूर्वजाची वृत्ती असोनि हातींची गेली ॥ २ ॥ एकला एकला मी रामदास वृत्ती लागीं होयें पिसा ॥

---

१ कस्तूरी.

तनु मनु धनु सर्व ही अर्पुनि सोडिली जीवित्वआशा ॥ निष्कामता कोणी पाठीसी नाडले एक चि थोर कोंवसा॥ हे वृत्ती रक्षील माझा राम ॥ त्याचा मज भरंवसा ॥ ३ ॥

॥ पद ॥ आलिया अंगें चि होयिजे देव ॥ कोंदाटला ब्रह्मकटाव ॥ धृ० ॥ भवसिंधुचें जळ आटलें ॥ संसाराचें मुळ तुटलें ॥१॥ निजधनाची लाधली ठेवी ॥ रंक पावले राजपदवी ॥ अरे काळाची वेळ चुकली ॥ आनंदाची लुटी फावली ॥ ३ ॥ जे मायेनें जन्म दाविला ॥ ते मायेचा ठाव पूसिला ॥ ४ ॥ रामदासासि राम भेटला ॥ थोर संदेह हा तुटला ॥ ५ ॥

॥ पद ॥ वेडिया स्वामी च होउनि राहें ॥ हे उपाधी तुज न साहे ॥ धृ० ॥ अरे तुझा चि तूं सकळ ॥ तरी वांया चि का तळमळ ॥१॥ स्वामिसेवकपण हें वाव ॥ अभिमानासी कैंचा ठाव ॥ २ ॥ अमंगळें जाणसी साचें ॥ काय भूषणें सांगसी त्याचें रे ॥ ३ ॥ मीपणाचें मूळ तुटावें ॥ आनंदाचें सुख लोटावें ॥ ४ ॥ रामदास चि नांव हें फोल ॥ तेथें काय से लागती बोल रे ॥ ५ ॥

॥ पद ॥ देवाची करणी ऐसी ही ॥ धृ० ॥ पहा दशगुणें आवरणोदकीं ॥ तारियेली धरणी॥१॥सुरवर पन्नग निर्मुनियां जग ॥ नांदवी लोक तिन्ही ॥ २ ॥ अंडज जारज स्वेदज उद्भिज ॥ निवडिलिया खाणी ॥ ३ ॥ रात्रीं सुधाकर तारा उगवती ॥ दिवसा तो तरणी ॥ ४ ॥ सत्तासूत्रें वर्षत जळधर ॥ पीक पिके धरणी ॥ ५ ॥ आपण तरी स्थिर निज निर्गुण ॥ दासा हृद्भुवनीं ॥ ६ ॥

॥ पद ॥ गुरुदाता रे दाता रे ॥ अभिनव कैसें केलें ॥ धृ० ॥ एक चि वचनें न बोलत बोलुनी ॥ मानस विलया नेलें ॥ भूतसंगें कृतनेश्वर वोझें ॥ निजबोधें उतरिलें ॥ २ ॥ दास ह्मणे मज मीपणविरहित ॥ निजपदीं नांदविलें ॥ ३ ॥

---

१ आश्रय.

॥ पद ॥ भावबळें तरले मानव ॥ धृ० ॥ सारासारविचार विलो-कुनि ॥ भव हा निस्तरले ॥ १ ॥ रामनाम निरंतर वाचे ॥ निजपदीं स्थिरले॥२॥दास ह्मणे सुख सांग रे डोहीं॥ऐक्यपणें विराले ॥३॥

॥ पद ॥ देह दंडिसी मुंड मुंडिसी ॥ भंड दाविसी नग्न उघडा ॥ धृ० ॥ भस्मलेपनें तृण आसनें ॥ माळ भूषणें सोंग हें मूढा ॥१॥ अन्नत्याग रे हृदयोगरे॥फट काय रे हिंडसी वनीं॥२॥ऐक सांगतों रामदास तो ॥ ज्ञानयोग रे साधितां बरें ॥ ३ ॥

॥ पद ॥ हें काय तें काय ॥ योग काय भोग काय ॥धृ०॥ बाहेर जटाभार काय ॥ अंतरीं संसार काय ॥ १ ॥ बाहेर काषायं दंड काय ॥ आंत अवघें भंड काय ॥ २ ॥ बाहेर सात्विक ध्यान काय ॥ आंत मद्यपान काय ॥ ३ ॥ रामदास ह्मणे पाहें ॥ व्यर्थ भगल क-रून काय ॥ ४ ॥

॥ पद ॥ मिश्रित सारासार ॥ अरे निवडी तो चि चतुर ॥धृ०॥ ब्रह्म निरंजन अद्वयं सत्य ॥ माया जन पर द्वैत अनित्य ॥ १ ॥ मेळ-विलें जळ अमृत दोनी ॥ हंस जसा पय घे निवडोनी ॥ २ ॥ पारखी विण खरें निवडेना ॥ मूढ कसे जन हीत कळेना ॥ ३ ॥ दास ह्मणे निज कौतुक मोठें ॥ अनुभव बोलती शाब्दिक खोटें ॥ ४ ॥

॥ पद ॥ पळा पळा ब्रह्मपिसा येतो जवळी ॥ रामनामें हाक देउनी डोई कांडोळी ॥ धृ० ॥ वृत्तिशेंडी बंधनें विण सदा मोकळी॥ संसाराची धुळी करुनि आंगीं उधळी ॥ १ ॥ प्रपंच उकरड्या वरी बैसणें ज्याचें ॥ भोंता पाळा फिरोनि पाहे जन हे अविद्येचे ॥ २ ॥ धांवुनि बैसे उठोनि पळे दृश्य वाटतें ॥ अदृश्याचें रहाणें घेतां न चले कवण्याचें ॥ ३ ॥ आउट हात गज नवा ठायीं उतळले ॥ दाहा वाटांत ह्मणवून तेथें ठिगळ दिधलें ॥ ४ ॥ ऐसें मन हें चंचळ निवृ-त्तीसी गुंतलें ॥ परतुनियां आलें ह्मणवुनि जीवें चि मारिलें ॥ ५ ॥

---

१ भगवें वस्त्र.

मीपणाचें शहाणपण जळालें माझें ॥ कोण वाहे देहबुद्धि वस्त्रांचें ओझें ॥ ६ ॥ नलगे आह्मां मानअपमानाचें ओझें ॥ तुझें शुद्धी घेतां गेलें मीपण माझें ॥ ७ ॥ आह्मी जन धन देखुनि विचार करितों ॥ आपण ऐसे पिसे ह्मणऊनि उमज धरितों ॥ ८ ॥ अर्थे भेटों येती त्यांस वेड लावितों ॥ रामीरामदास ऐसें अबद्ध बोलतो ॥ ९ ॥

॥ पद ॥ कल्याणधामा रामा कल्याणधामा ॥ ध्रु० ॥ दुःखनिवारण नामक सुखा ये ॥ सुखमूर्ती गुणग्रामा रामा ॥ १ ॥ दास उदास करी तव कृपा ॥ अभिनवं नामगरीमा रामा ॥ २ ॥

॥ पद ॥ तूं ये रे रामा ॥ काय वर्णूं महिमा ॥ ध्रु० ॥ सोडविले देव तेतीस कोटी ॥ तेंवी सोडवी आह्मां ॥ १ ॥ राम लक्षुमण भरत शत्रुघन ॥ पुढें उभा हनुमान ॥ २ ॥ दास ह्मणे भवबंध निवारीं ॥ रामा गुण धामा ॥ ३ ॥

॥ पद ॥ हे राघवा देईं तुझें भजन ॥ ध्रु० ॥ अनुताप त्या वरी भक्तियोग ॥ मानिती हे सज्जन ॥ १ ॥ कीर्तन करावें नामें उद्धरावें अंतरिं लागो ध्यान ॥ २ ॥ दास ह्मणे मन आत्मनिवेदन ॥ सगुण समाधान ॥ ३ ॥

॥ पद ॥ नाम मंगळधाम हरीचें हो ॥ संतसज्जना विश्राम ॥ ध्रु० ॥ सकळ सकळ धर्म अचळ ॥ अर्थकामस्मरणें स्वानंदाभिराम ॥ १ ॥ गरळचाळशम शिवमनोरम ॥ दास उदास पूर्णकाम ॥ २ ॥

॥ पद ॥ संगत साधूची मज जाहाली ॥ अक्षयपदवी आली ॥ ध्रु० ॥ सर्व मी सर्वात्मा ऐसी ॥ अंतरीं दृढ मती झाली ॥ जागृती सहीत अवस्था तूर्या ॥ स्वरुपींसमुळ विराली ॥ १ ॥ बहु जन्माची जपतपसंपत्ती ॥ विमळ फळेंसि आली ॥ मी माझें हे सरली ममता ॥ समुळीं भ्रांती निमाली ॥ २ ॥ रामीं अभिन्न दास ऐसी ॥ हे जाणीव समूळ ही गेली ॥ न चळे न ढळे अचळ कृपा हे ॥ श्रीगुरुरायें केली ॥ ३ ॥

---

१ नवीन.

॥ पद ॥ अणुपासुनि जगदाकार ॥ ठाणठकार रघुवीर ॥ धृ० ॥ रामाकार जाहाली वृत्ती ॥ दृश्यादृश्य न ये हातीं ॥ रामीं हारपलें जग ॥ दास ह्मणे कैंचे मग ॥ २ ॥

॥ पद ॥ दशशतकरवंशीं अवतरणा ॥ दशमुखकुलसंहरणा ॥ दशशतवदनाग्रज रूपमदना ॥ दशरथनृपनंदन गुणसदना ॥धृ०॥ कौसल्यात्मज निजसुखकरणा ॥ कौशिकमखपालन शिवस्मरणा ॥ राजिवलोचन जानकीरमणा ॥ भवचिंताहरणा ॥ १ ॥ निजचरणीं अहल्याउद्धरणा ॥ भार्गववीरक्षितिपाळाहारमर्दना ॥ वालीकार्मुकधरणा ॥ अंजनिसुत सेवित तव चरणा ॥ २ ॥ दशदिशाव्यापक गुणसगुणा ॥ आत्माराम समस्ताभरणा ॥ जीवकदंबकपातकसंस्मरणा ॥ रामदास वंदित तवचरणा ॥ ३ ॥

॥ पद ॥ रामा विसरावें मग कासया जावें ॥ स्वहित दुरी तेव्हां दुःख पाळवी घ्यावें ॥ रवरव कुंभपाक अहोरात्र भोगावें ॥ तेथवां कोण सोडी वर्म न पडे ठावें ॥ धृ० ॥ भजनीं कानकोंडे राम न ह्मणे तोंडें ॥ आदळे दुःख आंगीं भोग भोगितां रडे ॥ कर्तृत्व आपुलें चि कैसें नाठवे वेडें ॥ देवासी बोल ठेवी केंवी स्वसुख जोडे ॥ १ ॥ विषयीं चित्त गोंवी ॥ हृदयस्थ नाठवी कामक्रोधलोभसंगें ॥ त्रास नुपजे जीवीं ॥ ममता दुःख परी आपणातें वाहवी ॥ विनवी रामदास भवसागर तरवी ॥ २ ॥

॥ पद ॥ साजिरें हो रामरूप साजिरें हो ॥ धृ० ॥ रूप प्रकटलें लावण्य लाजिलें ॥ मानसीं वैसलें ॥ १ ॥ सर्वांगें सुंदर ठाण मनोहर ॥ दासाचा आधार ॥ २ ॥

॥ पद ॥ देखिला हो राघव देखिला ॥ धृ० ॥ रूप रामाचें लावण्य साचें ॥ ध्यान विश्रामाचें ॥ १ ॥ चंचळ मानस पाहे वास ॥ रामीरामदास ॥ २ ॥

---

१ वाट.

॥ पद ॥ शरण मी राघवा हो ॥ धृ० ॥ अंतरध्याना गुणनिधाना ॥ मज पहा हो ॥ १ ॥ भजन कांहीं घडत नाहीं ॥ हें साहा हो ॥ २ ॥ रामदास धरून कास ॥ एक भावो ॥ ३ ॥

॥ पद ॥ रे मानवा उगीच आमुचां जिणीं ॥ आह्मां ध्यानीं भेटि-ची सिरणी ॥ धृ० ॥ नरापरीस वानर भले ॥ जिहीं डोळां राम देखियेले ॥ १ ॥ ज्यासी रघुराज हितगुज बोले ॥ कोण्या भाग्यें भगवंत भेटले ॥ २ ॥ रामिं मिनले ते असो नीचयाती ॥ त्यांच्या चरणांची वंदीन माती ॥ नित्यनव्हाळी गाऊनि करूं किती ॥ तेणें रघुनाथी उपजेल प्रीती ॥ २ ॥ रामीरामदास ह्मणे एक करूं ॥ यारे आह्मी तैसा चि भाव धरूं ॥ भक्तिप्रेमाचा दाऊं निर्धारू ॥ तेणें आह्मां भेटेल रघुवीरू ॥ ३ ॥

॥ पद ॥ कैंचें घर कैंचें दार ॥ मिथ्या सकळ ही व्यापार ॥ अंतीं सोइरा रघुवीर ॥ कां भुललासी ॥ १ ॥ कोणी नव्हेति रे कोणाचीं ॥ सकळही सांगाती दैवाचीं ॥ धरीं सोई त्या रामाची ॥ कां भुल-लासी ॥ २ ॥ बहु औघड आहे वाट ॥ कैसी न कळे उरकेल वाट ॥ होई रघुविरजीचा भाट ॥ कां भुललासी ॥ ३ ॥ फिर माघारा पर-तोन पाहें ॥ एक धर्म ची होउनि राहें ॥ धन जोडिलें नरा हें ॥ कां भुल० ॥ ४ ॥ ऐसी करावी बा जोडी ॥ राहें एथें तेथें गोडी ॥ सोडीं मिथ्या प्रपंचवोडी ॥ कां भुल० ॥ ५ ॥ केव्हां जाईल न कळे श्वास ॥ राहे तें घर पडेल वोस ॥ ये कुडीया उपजेल त्रास ॥ कां भु० ॥ ६ ॥ सावध होई रे बा ऐसा ॥ वेढीं जळते घरींचा वासा ॥ स्मर माझ्या रमाधीशा ॥ कां भु० ॥ ७ ॥ संसार पाण्याचा बुडबुडा ॥ यान्त नको करूं तो ओढा ॥ तूं समजेसीना मूढा ॥ कां भु० ॥ ८ ॥ करीं सीताराम मैत्र[1] ॥ होईल देह तुझा पवित्र ॥ वरकड भिंतीवरील चित्र ॥ कां भु० ॥ ९ ॥ कां रे बैसलास निश्चळ ॥ करिशील अनर्थास मूळ ॥

---

१ मित्र.

सांडुनी विश्रांतीचें स्थळ ॥ कां भु० ॥ १० ॥ मुख्य असूं द्यावी दया ॥ नाहीं तर सर्व ही जाईल वांया ॥ मिठी घालीं रामपायीं ॥ कां भु० ॥ ११ ॥ करिशील डोळ्यांचा अंधार ॥ पाहें जनासी नि-वैर ॥ सांडीं धनसंपत्तीचें वारें ॥ कां भु० ॥ १२ ॥ अंगीं धनसंपत्ती-चें वारें ॥ खाया मिळतील भुतें पोरें ॥ कामा नयेत रे निर्धारें ॥ कां भु० ॥ १३ ॥ रामदासाचें जीवन ॥ तूं कां न करिसी साधन ॥ राम तोडील भवबंधन ॥ कां भु० ॥ १४ ॥

॥ पद ॥ चातुर चातुरसे चटका ॥ धृ० ॥ एक एक गुणपरवारी डारूं ॥ तन मेरी तोरी गयो तटका ॥ १ ॥ सुनत देखत गुण प्रगट लोकनमें ॥ आजब लागे चटका ॥ २ ॥ रामदाससांई ॥ सबघट-व्यापक ॥ आनंदकी घटका ॥ ३ ॥

॥ पद ॥ बाई मी हो मी हो जाहली खरी ॥ खरी गुरुदास ॥ अ-खिल पदार्थीं उदास ॥ धृ० ॥ इह पर नश्वर जाणुनि हृदयीं ॥ आ-लासे बहु त्रास ॥ १ ॥ नित्यानित्यविवेक विचारुनि ॥ सेविती ब्र-ह्मरसास ॥ २ ॥ तुर्या उल्लंघुनि उन्मनी सेवुनी ॥ स्वस्वरुपीं निज-वास ॥ ३ ॥ निजतृप्तीसी देउनि तृप्ति ॥ केला अनुभवग्रास ॥ ४ ॥ रामदासप्रभु नित्य उदास ॥ सच्चरणीं विश्वास ॥ ५ ॥ आवडतो प्रिय पारि गवसेना ॥ धृ० ॥ स्वजना हुनि प्रिय देह आपुला ॥ तो हि विटे पारि आपण विटेना ॥ १ ॥ ज्या वरी धावती इंद्रिय मन ही ॥ सर्व ही दावुनि आपण दिसेना ॥ २ ॥ श्रीगुरुदास्य अनन्य घडे जरि ॥ अनुभवतंतु कधीं तुटेना ॥ ३ ॥ कोण मी मज कळत चीं नाहीं ॥ सारासारविचार शोधुनी पाहीं ॥ १ ॥ नारी ह्मणों तरी नर चीं भासें ॥ नर ह्मणों तरी समूळ विनासें ॥ २ ॥ दास ह्मणों तरि राम चि आहें ॥ राम ह्मणों तरि नाम्र न साहे ॥ ३ ॥ ॥ आता तरि जाय जाय जाय धरि सद्गुरुचे पाय ॥ धृ० ॥ संकल्प विकल्प

१ साधु.

सोडुनि राहें दृढ धरुनी पाय पाय पाय ॥ १ ॥ नामस्मरण ज्या मुखीं नाहीं त्याणें वांचूनी काय काय काय ॥ २ ॥ मानवतनु ही नये मागुती बरें विचारुनि पाहें पाहें पाहें ॥ ३ ॥ आत्मानात्मविचार न करितां व्यर्थ प्रसवली माय माय माय ॥ ४ ॥ सहस्त्र अन्याय जरी त्वां केले कृपा करील गुरुमाय माय माय ॥ ५ ॥ रामदास ह्मणे नामस्मरणें भिक्षा मागुनि खाय खाय खाय ॥ ६ ॥ आतां तरि० ॥

अरे नर सारविचार कसा ॥धृ०॥ क्षीरनीर एक हंस निवडिती ॥ काय कळे वायसां ॥ १ ॥ माया ब्रह्म एक संत जाणती ॥ सारांश घेती तसा ॥ २ ॥ दास ह्मणे वंद्य निंद्य वेगळें ॥ कर्मानुसार ठसा ॥ ३ ॥ अरे मन पावन देव धरीं ॥ अनहीत न करीं ॥धृ० ॥ नित्यानित्यविवेक करावा ॥ बहुजना उद्धरीं ॥ आत्मा कोण अनात्मा कैसा ॥ परपार उतरीं ॥ २ ॥ दास ह्मणे तुझा तूंची सखा रे ॥ हीत तुझें तूं करीं ॥ ३ ॥ ॥ अरे नर सारविचार करीं ॥ मन बरें विवरीं ॥ धृ० ॥ सारासारविचार[1] न येतां ॥ वाहसी भवपुरीं ॥ १ ॥ सकळ चराचर कोठुनि जालें ॥ कोठें निमालें तरी ॥ २ ॥ दास ह्मणे जरी समजसी तरी ॥ मुळींची सोय धरीं ॥ ३ ॥ अरे नर० ॥ ॥ भूतकाळीं कर्म केलें वर्तमानां आलें ॥ त्याचें सुख मानुनियां भोगितों आपुलें ॥ धृ० ॥ सुखदुःख भोग जाला तो चि मागिल ठेवा ॥ आतां दुःख मानूं नको करीं रामसेवा ॥ १ ॥ बाईल मेली पोर मेलें द्रव्य नाहीं गाठीं ॥ तळमळ लागली जीवा कां रे होशी कष्टी ॥ २ ॥ जें जें दुःख होतें जिवा तें चि मागील कर्म ॥ आतां त्याचें सुख मानीं स्मर रामनाम ॥ ३ ॥ नामा विण राहूं नको असा फजित होशी ॥ पुन्हा घडि नये बापा नरका मध्यें जाशी ॥ ४ ॥ भविष्याचा धोका तुझे हाता मध्यें आहे ॥ पळभर विसरूं नको नाहिं कोणी साह्य ॥ ५ ॥ सावध होई सावध होई किती सांगूं तुजला ॥ परिणाम कठिण

---

१ शाश्वत अशाश्वत याचा विचार.

मोठा शरण जाई गुरुला ॥ ६ ॥ दास ह्मणे जालें तें तरी होउनियां गेलें ॥ नको नको ह्मणतां हि भोगवि तें केलें ॥ ७ ॥ भूतकाळीं० ॥

॥ पद ॥ एकला जगदंतर जाहला ॥ आणीक कोणी च नाहीं तयाला ॥ १ ॥ चारी खाणी चारी वाणी ॥ हालवी बोलवी चालवी त्याला ॥ २ ॥ एक धरी एक त्यागीत आहे ॥ आपणा आपण भोगवीत आहे ॥ ३ ॥ दास ह्मणे हा बहुविध तमासा ॥ पाहिल तो मग होइल तैसा ॥ ४ ॥

॥ पद ॥ ज्या ज्या वेळे जें जें होईल तें तें भोगावें ॥ विवेकाला विसरुनि आपण कष्टी कां व्हावें ॥ धृ० ॥ एकदा एक वेळ बहु सुखाची गेली ॥ एकदा एक वेळ जिवा बहु पीडा झाली ॥ १ ॥ एकदा मागं जातां मिळती षड्रस पक्वान्न ॥ एकदा मागूं जातां न मिळे भाजीचें पान ॥ २ ॥ सुकृतदुष्कृत दोन्ही पूर्वदत्ताचें फळ ॥ ऐसें प्राणी जाणेना तो मूर्ख ची केवळ ॥ ३ ॥ देहदुःखास मूळ ऐसें बरवें जाणोन ॥ सुखदुःखा विरहित रामदास आपण ॥ ४ ॥ ज्या ज्या० ॥

॥ पद ॥ घटका गेली पळें गेलीं तास वाजे झणाणा ॥ आयुष्याचा नाश होतो राम कां रे ह्मणाना ॥ १ ॥ एक प्रहर दोन प्रहर तीन प्रहर गेले ॥ विषयाच्या संगा मुळें चारी प्रहर गेले ॥ २ ॥ रात्र कांहीं झोंप कांहीं स्त्रीसंगें गेली ॥ ऐशी अठा प्रहरांची वासलाद झाली ॥ ३ ॥ दास ह्मणे तास वाजे सकळां स्मरण देतो ॥ वेळोवेळां राम ह्मणा ह्मणोनि झणकारितो ॥ ४ ॥

॥ अंजनीगीत ॥ लंके हूनि अयोध्ये येतां ॥ राम लक्ष्मण सीता ॥ हनुमंतें अंजनिमाता ॥ दाखविली रामा ॥ १ ॥ चवघे केला नमस्कार ॥ कय बोले रघुवीर ॥ तुझ्या कुमरें आम्हां थोर ॥ उपकार केला ॥ २ ॥ सीताशुद्धि येणें केली ॥ लक्ष्मणाची शक्ति हरिली ॥ लंके जाळुनि निर्दाळिली ॥ राक्षसेना ॥ ३ ॥ अहिरावण महिराव-

---

१ पापपुण्य.

णा ॥ घात करिती आमुच्या प्राणा ॥ देवीरूपें दोघां जणां ॥ रक्षि-
लें माते ॥ ४ ॥ अठरा पद्म वानरभार ॥ श्रमें युद्ध केलें फार ॥ शि-
ळासेतू सागर ॥ समाप्त केला ॥ ५ ॥ माते तुझ्या उदरीं जाण ॥
हनुमान जन्मला रत्न ॥ येवढें माझें रामायण ॥ याचेनि योगें ॥६॥
ऐकुन पुत्राची ही स्तुति ॥ माता तुच्छ मानी चित्तीं ॥ व्यर्थ कां बा
रघुपती ॥ वाहसी भार ॥ ७ ॥ हा कां माझ्या उदरीं आला ॥ गर्भीं
हूनी नाहिं गळाला ॥ आपण असतां कष्टवीला ॥ श्रीराम माझा ॥
॥ ८ ॥ माझिया दुग्धाची मोठी ॥ कळिकाळाची नरडी मुरडी ॥
रावणादिक हें बापुडीं ॥ घुंगुरटीं तेथें ॥ ९ ॥ असत्य रामा वाटेल
बोली ॥ दुग्धधारा सोडियेली ॥ शैला उदरीं खोंचाकिली ॥ त्रि-
खंड तेव्हां ॥ १० ॥ वेणीदंड परताळिला ॥ लंके लागीं वेढा दिघ-
ला ॥ आणुनि रामाशी दाखविला ॥ अंजनीमातें ॥ ११ ॥ सीता
बोले अंजनीशीं ॥ कां कोपशी बाळकाशीं ॥ रामें आज्ञा हनुमंता-
शी ॥ दिधली नव्हती ॥ १२ ॥ आश्चर्य वाटलेंसे रामा ॥ म्हणे मा-
ते धन्य महिमा ॥ पादपद्में चवघां जणां ॥ वंदिलें भावें ॥ १३ ॥ अ-
त्यंत विलग सखा ॥ हनुमंत भक्त नीका ॥ रामदास पाठीराखा ॥
महारुद्र तो ॥ १४ ॥

॥पद॥ गणपति गणराज ढुंढिराज महाराज ॥ चिंतामणि मो-
रेश्वर या विण नाहीं काज ॥ध्रु०॥ अकार उकार मकार तुझी शुंडा
अनिवार ॥ ब्रह्मविष्णुमहेश तरि तुझे च अवतार ॥ १ ॥ त्रिगुण
तूं गुणातीत ॥ नामरूपविरहित ॥ पुरुष नामप्रकृतींत अंत नाहीं
हा ॥ २ ॥ सच्चिदानंद देवा ॥ आदि अंत तुला च ठावा ॥ दास म्ह-
णे वरद भावा ॥ कृपा दृष्टी हा ॥ ३ ॥

॥ पद ॥ प्रकट निरंजन प्रकट निरंजन आहे ॥ आगमं निगम सं-
तसमागम सद्गुरुवचन पाहे ॥ १ ॥ आत्मविचारें शास्त्रविचारें गुरु

---

१ शास्त्रे.

विचारें बोध ॥ मीपण तूंपण शोधुनि पाहतां ॥ आपण आपणा शोध ॥ प्रकट० २ ॥ जडाशि चंचळ चालविनाहे चंचळ स्थीर न राहे ॥ प्रचीत आहे शोधुनि पाहें निश्चळ होउन राहें ॥ ३ ॥ भजनीं भजन आत्मनिवेदन श्रवण मनन साधा ॥ दास म्हणे निज गुज शोधितां होत नसे भवबाधा ॥ प्रकट० ॥ ॥ पहा पहा या जगांत राम आहे ॥ राम आहे राम आहे राम आहे ॥ धृ० ॥ जग हें अवघें राम च सारा ॥ अंतरिं पाहें करिं विचारा ॥ १ ॥ एक सुवर्णी बहु अळंकारा ॥ तद्वत पाहीं सर्व पसारा ॥ विना कच्छु नाहीं थारा ॥ राम च राम ही घे घे सारा ॥ ३ ॥ दास म्हणे हा राम च भरला ॥ भरला उरला बोल च खुंटला ॥ ४ पहा पहा ० ॥

॥ पद ॥ गुरुदातारें दातारें ॥ अभिनव कैसें कैसें केलें ॥ धृ० ॥ एकचि वचनें न बोलत बोलुनी मानस विलया नेलें ॥ १ ॥ भूतसंगें कृतनश्वर बांझें ॥ निजबोधें उतरिलें ॥ २ ॥ दास म्हणे मज मीपणविरहित ॥ निजपदीं नांदविलें ॥ ३ ॥

॥ पद ॥ मिश्रित सारासार ॥ अरे निवडी तो ची चतुर ॥ धृ० ॥ ब्रह्मनिरंजन अद्वय सत्य माया जनपर द्वैत अनित्य ॥ १ ॥ पारखींवीण खरें निवडे ना ॥ मूढ कसें जन हीत कळेना ॥ २ ॥ मेळविलें जळ अमृत दोनी ॥ हंस जसा पय घे निवडोनी ॥ ३ ॥ दास म्हणे निज कौतुक मोठें ॥ अनुभव बोलती शाब्दिक खोटे ॥ ४ ॥

॥ अभंग ॥ प्रपंच त्यागियेला बुद्धि ॥ जडली परमार्थ उपाधी ॥ १ ॥ मना होईं सावचित्त ॥ त्याग करणें उचित ॥ २ ॥ संप्रदाय समुदाव ॥ तेणें जडे अहंभाव ॥ ३ ॥ रामदास म्हणे नेमें ॥ भिक्षा मागणें उत्तम ॥ ४ ॥

॥ अभंग ॥ प्रपंच केला तडातोडी ॥ पडली परमार्थाची बेडी ॥ १ ॥ सावधान व्हावें जीवा ॥ त्याग केला ची करावा ॥ २ ॥ काम



१ त्याप्रमाणें.

क्रोध राग द्वेष ॥ अंगीं जडले विशेष ॥ ३ ॥ रामदासें बरें केलें ॥ अवघें जाणूनि त्यागीलें ॥ ४ ॥

॥ अभंग ॥ नको ओळखीचे जन ॥ अंगीं वाजे अभिमान ॥१॥ आतां तेथें जावें मना ॥ जेथें कोणी ओळखेना ॥२॥ लोक ह्मणती कोण काय ॥ पुसतां ही सांगों नये ॥ ३ ॥ रामदास ह्मणे पाहीं ॥ जेथें कांहीं चिंता नाहीं ॥ ४ ॥

॥ अभंग ॥ तुह्मां आह्मां मुळीं झाली नाहीं तूटी ॥ तूटी वीण भेटी इच्छीतसां॥१॥इच्छीतसां योग नसतां वियोग ॥ तुह्मां आह्मां योग सर्वकाळ ॥ २ ॥ सर्वकाळ तुह्मी आह्मी एक स्थळीं ॥ वायां मृगजळीं बुडों नको ॥ ३ ॥ बुडों नको आतां सावध असावें ॥ रूप ओळखावें जवळीच ॥ ४ ॥ जवळी च आहे नका धरूं दूरी ॥ बाह्य अभ्यंतरीं असोनियां ॥ ५ ॥ असोनी सन्निध वियोगाचा खेद ॥ नसोनियां भेद लावूं नये ॥ ६ ॥ लावूं नये भेद मायिक संबंधीं ॥ रामदासा बोधीं भेटी झाली ॥ ७ ॥

॥ अभंग ॥ अनंताचा अंत पहावया गेलों ॥ तेणें विसरलों आपणासी ॥ १ ॥ आपणा आपण पाहतां दिसेना ॥ रूप गवसेना दोहीं कडे ॥ २ ॥ दोहीं कडे देव आपण चि आहे ॥ संग हा न साहे माझा मज ॥ ३ ॥ माझा मज भार जाहला बहूत ॥ देखतां देखत कळों आलें ॥ ४ ॥ कळों आला भार देखतां विचार ॥ पुढें सारासार विचारणा ॥५॥ विचारणा झाली रामीरामदासीं ॥ सर्व ही संगासी मुक्त केलें ॥ ६ ॥ मुक्त केलें मोक्षा मुक्तीची उपेक्षा ॥ तुटली अपेक्षा कोणी एक ॥ ७ ॥

॥ अभंग ॥ शाहाणे ह्मणवितां ब्रह्मज्ञानें वीण ॥ संसाराचा शीण करोनियां ॥ १ ॥ करोनी संसार रात्रंदिवस धंदा ॥ कैसे हो गोविंदा चूकलेती ॥ २ ॥ चुकलेती वायां तुह्मी कां बंध हो ॥ अंतरीं

१ मनांत.

संदेहो जन्मवरी ॥ ३ ॥ जन्मवरी वोझें वाहिलें वाउगें ॥ व्यर्थ काम-
रंगें रंगोनियां ॥ ४ ॥ रंगोनियां कामीं अंतरावें रामीं ॥ दास
ह्मणे ऊर्मी[1] कामा नये ॥ ५ ॥

॥ अभंग ॥ ज्ञान झालें भक्तजना ॥ सांडूं नये उपासना ॥ १ ॥
ऐका साराचें ही सार ॥ मुख्य सांगतों विचार ॥ २ ॥ हेंचि सर्वांचें
कल्याण ॥ मानूं नये अप्रमाण ॥ ३ ॥ दास ह्मणे अनुभवलें ॥ भजन
भगवंताचें भलें ॥ ४ ॥

॥ अभंग ॥ प्रवृत्ति सासुरें निवृत्ति माहेर ॥ तेथें निरंतर मन मा-
झें ॥ १ ॥ माझे मनीं सदा माहेर तुटेना ॥ सासुरी सुटेना काय करूं
॥ २ ॥ काय करूं मज लागला लौकिक ॥ तेणें हा विवेक दुरी जा-
य ॥ ३ ॥ दुरी जाय हित मज चि देखतां ॥ प्रयत्न करूं जातां होत
नाहीं ॥ ४ ॥ होत नाहीं यत्न संतसंगाविण ॥ रामदासी खूण सां-
गतसें ॥ ५ ॥

॥ अभंग ॥ ओळतां ज्ञान ओळखी मोडली ॥ भेटी हे जोडली
आपणासी ॥ १ ॥ आपणासी भेटी झाली बहुतां दिसां ॥ तुटला
वळसा मीपणाचा ॥ २ ॥ मीपणाचा भाव भावें केला वाव ॥ दास
ह्मणे देव प्रकटला ॥ ३

॥ अभंग ॥ दिसतें नासेल सर्वत्र जाणती ॥ वायां बोला वि-
त्पत्ति काय काज ॥ १ ॥ कार्यकारण हा विवेक पाहिजे ॥ तरी च
लाहिजे शाश्वतासी ॥ २ ॥ शाश्वतासी जागें येणें चि न घडे ॥
साकार हें मोडे दास ह्मणे ॥ ३ ॥

॥ अभंग ॥ मन हें विवेकें विशाळ करावें ॥ मग आठवावें पर-
ब्रह्म ॥ १ ॥ परब्रह्म मनीं तरी च नीवळे ॥ जरी बोधें गळे अहंकार
२ ॥ अहंकार गळे संताचे संगती ॥ मग आदीं अंतीं समाधान
॥ ३ ॥ समाधान घडे स्वस्वरूपीं राहातां ॥ विवेक पाहातां निः-

---

[1] कामादिकांचा आवेश. २ व्यर्थ.

संगाचा ॥ ४ ॥ निःसंगाचा संग दृढ तो धरावा ॥ संसार तरावा दास ह्मणे ॥ ५ ॥

॥ अभंग ॥ आह्मी सावधान गावें ॥ तुह्मीं सावध ऐकावें ॥ १ ॥ सकळ सृष्टीचा गोसांवी ॥ त्याची ओळख पुसावी ॥ २ ॥ स्वयें बोलिला सर्वज्ञु ॥ ज्ञानें विण अवघे पशु ॥ ३ ॥ दास ह्मणे नाहीं ज्ञान ॥ तया नरकीं पतन ॥ ४ ॥

॥ अभंग ॥ जेणें ज्ञान हें नेणावें ॥ पशु तयासी ह्मणावें ॥ १ ॥ जेणें केलें चराचर ॥ कोण विश्वासी आधार ॥ २ ॥ ब्रह्मादिकांचा निर्मिता ॥ कोण आहे त्या परता ॥ ३ ॥ अनंत ब्रह्मांडांच्या माळा ॥ विचित्र भगवंताची कळा ॥ ४ ॥ रामदासाचा विवेक ॥ सर्वां घटीं देव एक ॥ ५ ॥

॥ अभंग ॥ देह आरोग्य चालतें ॥ भाग्य नाहीं त्या परतें ॥ १ ॥ लाहो घ्यावा हरिभक्तीचा ॥ नाहीं भरंवसा देहाचा ॥ २ ॥ देह आहे क्षणभंगुर ॥ तुम्ही जाणतां विचार ॥ ३ ॥ रामीरामदास ह्मणे ॥ अकस्मात लागे जाणें ॥ ४ ॥

॥ अभंग ॥ ज्याचेनी जितासी त्यासी चुकलासी ॥ व्यर्थ चि झालासी भूमिभार ॥ १ ॥ भूमिभार जिणें तुझें गुरू विणें ॥ वचनें प्रमाणें जाण बापा ॥ २ ॥ जाणें तूं हे गती गुरू विण नाहीं ॥ पडसी प्रवाहीं माया जाळीं ॥ ३ ॥ मायाजाळीं वायां गुंतलासी मूढा ॥ जन्मा वरि वोढा तडातोडी ॥ ४ ॥ कांहीं तडातोडी कांहीं देव जोडीं ॥ आयुष्याची घडी ऐसी वेचीं ॥ ५ ॥ ऐशी वेचीं बापा आपुली वयसा ॥ दास ह्मणे ऐशा काळीं घालीं ॥ ६ ॥

॥ अभंग ॥ काय करितें हें मन ॥ साक्ष आपुला आपण ॥ १ ॥ काय वासना ह्मणते ॥ आपणास साक्ष येते ॥ २ ॥ मन असे वेरगळ ॥ केल्या होतसे विव्हळ ॥ ३ ॥ सोडीना हें सांसारिक ॥ कांहीं पहावे

---

१ लाभ. १ अनिवार.

विवेक ॥ ४ ॥ दास ह्मणे सावधान ॥ पदरीं बांधलें मरण ॥ ५ ॥

॥ अभंग ॥ करूनि अकर्ते होऊनीयां गेले ॥ तेणें पंथें चाले तो चि धन्य ॥ १ ॥ तो चि धन्य जनीं पूर्ण साधनानीं ॥ जनीं आणि वनीं सारिखा ची ॥ २ ॥ सारिखाची जेथें तेथें पालटेना ॥ नये अनुमाना कोणी एक ॥ ३ ॥ कोणी एक लोक देहाशी पाहाती ॥ अंतरींची गती कोण जाणे ॥ ४ ॥ कोण जाणे काय सांगतां मनींचें॥ जनासि जनाचें कळतसे ॥ ५ ॥ कळतसे परि अंतर शोधावें ॥ मनासी बोधावें दास ह्मणे ॥ ६ ॥

॥ अभंग ॥ तुम्ही आम्ही करूं देवाचा निश्चय ॥ जया नाहीं लय तो चि देव ॥ १ ॥ देव हा अमर नित्य निरंतर ॥ व्यापूनी अंतर देव आहे ॥ २ ॥ ज्ञान देहीं वसे तया देव दीसे ॥ अंतरीं प्रकाशे ज्ञानदृष्टी ॥ ३ ॥ ज्ञान देहीं होतां पाविजे अनंता ॥ हा शब्द तत्वता दास ह्मणे ॥ ४ ॥

॥ अभंग ॥ बोलवेना तें बोलावें ॥ चालवेना तेथें जावें ॥ १ ॥ नवल स्वरूपाच्या योगें ॥ जीवपणाचे वियोगें ॥ २ ॥ वाट नाहीं तेथें जावें ॥ जाणवेना तें जाणावें ॥ ३ ॥ रामदासीं दृढ बुद्धि ॥ होतां सहज समाधि ॥ ४ ॥

॥अभंग॥ गेलों वस्तूशीं भेटाया ॥ तिकडे ब्रह्म इकडे माया ॥१॥ दोहीं मध्यें सांपडलों ॥ मी च ब्रह्म ऐसें बोलों ॥ २ ॥ वस्तु निर्मळ निश्चळ॥ माया चंचळ चपळ ॥ ३॥ रामीरामदास ह्मणे ॥ अवघें मनाचें करणें ॥ ४ ॥

॥ दिवटा ॥ हुशार भाई हुशार ॥ अवघीं असावें खबरदार[1] ॥ काळोखें पडतें फार ॥ एकाशी एक दिसेना ॥ १ ॥ चोरांचे कळप फिरती ॥ अवचित दगा करिती ॥ निजोन कां जागविती ॥ मी दिवट्या साहेबाचा ॥ २ ॥ मी हराम नव्हे साहेबाचा ॥ नफर[2] इत-

---

[1] सावध. [2] सेवक.

बारांचा ॥ मज रातीं जागवयाचा ॥ हुद्दा दिधला ॥ ३ ॥ मी सारे रात जागतों ॥ अठरा महालांची खबर घेतों ॥ सा ही नजरेंत राखतों ॥ मनीं धरितों चहूंचे गुण ॥४॥ मी सकळिकांचें करितों बरें॥ परि मज मानिती अहंकारें ॥ चोरां लागती झोंपेच्या घोरें ॥ ते समूळ नागवती ॥ ५ ॥ जे मजला मानिती ॥ माझ्या विचारें वर्तती॥ तरि हरिगस्त झोला न पवती ॥ ते नाडेनात जी ॥ ६ ॥ जे जे झोपेनें पीडती ॥ ते ते अवघे चि नाडले ॥ यमयातनेशीं जुडले ॥ पाहुणेर द्यावया कारणें ॥ ७ ॥ जे मद्भरें जडले ॥ जन्ममरणा राहाटीं जोडले ॥ सुटिका नव्हती पाडिले ॥ बांधोनियां जी ॥ ८ ॥ अरे जागा स्वरूपीं जागा ॥ मुक्तीचा सोहोळा भोगा ॥ कर्म आपले अंगा ॥ लागों च नेदावें ॥ ९ ॥ अरे हुशार भाई हुशार ॥ झोपेनें नाडले थोर थोर ॥ म्यां जे जे केले खबरदार ॥ ते कडेशीं पडिले जी ॥ १० ॥ महादेव निजेनें भ्रमला ॥ विषें तळमळों लागला ॥ मग म्यां खबरदार केला ॥ तो वांचला दों अक्षरीं ॥ ११ ॥ स्वामी कार्तिक निजेनें भ्रमला॥बळें ची परस्त्री भोगूं लागला ॥ मातृगमन घडावें त्याला ॥ तों म्यां खबरदार केला ॥ १२ ॥ विष्णु निजेनें भ्रमला ॥ परस्त्रिये मोहें जोगी झाला ॥ तो म्यां खबरदार केला ॥ मोहो दवडीला शक्तीचा ॥ १३ ॥ ब्रह्मा निजेनें भ्रमला ॥ चोरांनीं समूळ नागविला ॥ सकळ धर्म बुडविला ॥ दुकाळ पाडिला मोठा जी ॥ १४ ॥ मग म्यां खबरदार केला ॥ तो बाबातें स्मरला ॥ तेणें जाउनि चोर मारविला ॥ लेकाचें वित्त दिधलें ॥ १५ ॥ नारद निजेनें भ्रमला ॥ बायको होऊनी साठ लेंक व्याला ॥ तो म्यां खबरदार केला ॥ मग पावला पहिला वेष ॥ १६ ॥ इंद्रें मानिलें नाहीं मजला ॥ सहस्र भोकें पडलीं त्याला ॥ शुक्रें डोळा फोडोनी घेतला ॥ न मानी मजला ह्मणवूनी ॥ १७ ॥ चंद्रें नाहीं मानिलें मज-

---

१ हमानचा.

ला ॥ अभिमानें सुखें निजला ॥ तो क्षयरोगी जाहला ॥ नाडला आपले करणीनें ॥ १८ ॥ दक्ष निजेनें भ्रमला ॥ मानिलें नाहीं मजला ॥ पूर्वशिराशी मुकला ॥ जाहला यो तो बोकडमुखी ॥ १९ ॥ गुरूनें नाहीं मानिलें मजला ॥ बाईल गमवुनी बैसला ॥ यम निजेनें व्यापिला ॥ झाला केवळ दासीपुत्र ॥ २० ॥ रावण निजेनें भ्रमला ॥ कुलक्षय करूनि शोकीं पडला ॥ मग म्यां खबरदार केला ॥ मग जाहला रामरूपी ॥ २१ ॥ ऐसे ऐकोनि दृष्टांत ॥ सावध करोनी करा स्वहित ॥ तरि आपुलें फळ भोगा समस्त ॥ मी सांगतों जी ॥ ॥ २२ ॥ मी सांगतों उतराई ॥ कोणाशीं कांहीं मागत नाहीं ॥ परोपकारास्तव पाहीं ॥ हुशार करितों ॥ २३ ॥ ऐसें दिवटा जाय बोलोनी ॥ घरटी घाली हाक देवुनी ॥ दास ह्मणे दिवट्या मानी ॥ तो चि तरला मोहरातीं ॥ २४ ॥

॥ पिंगळा ॥ भाकणूक ॥ वीरहनुमंतासी दुवा ॥ महंमायेसी दुवा ॥ संताचे सभेशी दुवा ॥ धर्माचे सभेशी दुवा ॥ राजमुद्रा देवमुद्रा ॥ ज्ञानमुद्रा ते धुरेशी दुवा हो ॥ वेदांतसिद्धांत दुवा ॥ धादांत तें मज पिंगळ्याचें बोलणें गाय नरायन हो ॥ १ ॥ ऐसें सर्वही सरेल ॥ परि अविनाशी वस्तु एक उरेल ॥ तें सज्ञान जाणतील गाय नरायन हो ॥ २ ॥ या पृथ्वीस प्रळय होईल ॥ महाकाल पडेल ॥ सकळ जीवनें आटेल ॥ हा मी पिंगळा बोलुनि जातों ॥ ३ ॥ शतवरुषें पाऊस जाईल ॥ तेणें जीवसृष्टी मरेल ॥ सुर्यो बारा कळीं तपेल ॥ तेणें पर्वता सहित पृथ्वी जळेल ॥ गाय० ॥ ४ ॥ पोळती शेषाचिया फडा ॥ तो विष वमी भडभडा ॥ पाताळ जळती धडधडा ॥ ऐशी ब्रह्मांडांची राखोंडी होईल ॥ गाय नरायन हो ॥ ५ ॥ पाऊस पडेल शुंडाधारी ॥ तेणें बुडेल धांत्री ॥ अग्नि प्रकटेल अंबरीं ॥ तो करिल बोहरी ॥ तया पाणियाची तेथें सुटेल वावधान ॥

---

१ उदक. २ पृथ्वी. ३ नाश. ४ महापूर.

तेणें विझेल तो अग्न ॥ वारियासी गिळितां गगन गगनासी राहे खावुन ॥ तो तामसअहंकार गाय नरायन हो ॥६॥ राजस बुडवील तामस अहंकारास सात्विक बुडवील ॥ राजस गिळील तामस सात्विक गिळिल अहंकारास ॥ गुण माया गिळील गुणास ॥ महंमाया करील गाय नरायन हो ॥ ७ ॥ गुणक्षोभिणी माये पोटीं ॥ माया मूळमाया पोटीं ॥ मूळमाया स्वरूपा पोटीं ॥ लीनहो गाय नरायन हो ॥८॥ विघ्न मोठें गाय राम नहो ॥ कांहीं शांति करा हो ॥ कांहीं त्याग कराहो ॥ उत्तम पाहा राजा गाय राय नहो ॥ ९ ॥ धुरेची रासी कोण ॥ बापाची राशी कोण ॥ म्यां खबर खोब मिथून कर्क सिंह कन्या तूळ वृश्चिक धन मकर कुंभ मीन ॥ १० ॥ मीनाचा मी रोग बरा लाभ आहे गाय रायन हो ॥ थोरल्या पुस्तकाचा शकून पाहें ॥ मज पिंगळ्याचे हातें नगाय०॥११॥बुद्धि कांहीं खोविला वरी ॥ निघाली रंकाशी राज्यपदवी॥ तुझी हरपली सांपडेल ठेवी ॥ तरी मज पिंगळ्याला विसरोन ॥ रामीरामदास सर्वदा भाकून[1] गेला निजपदा॥ त्याचिया नेमाची शब्दा ॥ जतन करा गाय न राय हो ॥ १२ ॥

॥जोगीछंद॥ काळ बाहिरी ससाणा ॥ बंधु तुळज्याचा जाणा॥ काळ पिळियेला घाणा ॥ बाहिरी हुमुंजी नाणा ॥ बहिरी जोग बोलणीं बोलती ॥ निळ्या घोड्याचा रावुत ॥ हातीं त्रिशूळ संगीत॥ कांवे घेतो लखलखित ॥ उंच कास तखतखीत ॥ तायडोबडसंति॥ तेथें बाहिरीचि प्रचिती ॥ नागखंडें झोंबती ॥ तयें बाहिरीची प्रचिती ॥ नागखंडें झोंबती ॥ तेथें बाहिरीचि प्रचिति ॥ पहिला देव तो बद्धाचा॥दुसरा देव मुमुक्षुचा॥तिसरा देव तो साधकाचा॥ चवथा देव तो वेगळा॥ अगम्य त्याची लिळा ॥ पाहिला गुण महेशाचा ॥ दुसरा गुण तो ब्रह्मयाचा ॥ तिसरा गुण तो विष्णूचा॥ चौथा गु-

---

१ शकुन सांगून.

ण तो वेगळा ॥ पहिला भक्त तो कायेचा ॥ दुसरा भक्त तो वाचे-
चा ॥ तिसरा भक्त तो मनाचा ॥ चौथा भक्त तो वेगळा ॥ आगम्य
त्याची लिळा ॥ कानफाटया ॥ आलेख जागी ॥ आलेख आलेख
सबकोहुकहे ॥ आलेख आलेख सो न्यारा ॥ जैसी किणीही वैसी
रहणी ॥ सोई नाथका प्यारा ॥ आलेख जागे ॥ साई आलेख जागे ॥
आलेख पाया कहणी आया उसकी बात झुटी ॥ गोरख गोरख स-
बकोउकहे ॥ गोरख नबुजे कोहे ॥ जोगींद्रकु जो कोउ रखे सोई
गोरख होय ॥ नवाककेनवतुकरे ज्यो रे प्राणालियो हे गाधाकंथा
छोड कंठ लगाय जोगी रहता नंगा ॥ जनमोसीगी मनमो त्यागी ॥
मनमो बद्धा जैनमो मुक्ता ॥ कथनी कहत लोक टफावे ॥ सोहि ज्ञा-
नका आंधा ॥ जोगी भीतर मडिया ॥ पैटे करवे भीतर बाई ॥ जी-
वनमे जीय देखन गया जोगी ॥ की सुरतपायीं ॥ फेरी करते घरघ-
र फीरे ॥ कीनरी बज्याईतारा ॥ कंथा आवे कंथा जावे ॥ जोगी
रहता न्यारा ॥ सिंगी बाजे बाबगाजे माईर संडी बाडे ॥ नाथ
न बुझे गुतमुत मेर ॥ नाथ बुझे सो छुटे ॥ मुद्रा फारीकानमो डारीं ॥
आपसे नफारीको ये आपसे फारे मुद्रा पैटी ॥ सोई गोरख होय ॥
जोग न ज्यानु जुगुत न जानु ॥ न जानु आसन ध्यान ॥ रामकि
कृपा दासन पाई ॥ आलख हुवा परिपूर्ण ॥ १० ॥

॥ अभंग ॥ (प्रश्न) नमो वागीश्वरी शारदा सुंदरी ॥ श्रोता प्रश्न
करी वक्तयाशी ॥ १ ॥ वक्तयाशी पूसे जीव हा कवण ॥ शिवाचें
लक्षण सांगा मज ॥ २ ॥ सांगा मज आत्मा कैसा तो परमात्मा ॥
बोलिजे अनात्मा कवण तो ॥ ३ ॥ कोणता प्रपंच कोणें केला संच ॥
मागुता विसंच कोण करी ॥ ४ ॥ कोण ते अविद्या सांगावी ते वि-
द्या ॥ कैसें आहे आद्या स्वरूप तें ॥ ५ ॥ स्वरूपीं ती माया कैशी मूळ-
माया ॥ इशी चाळावया कोण आहे ॥ ६ ॥ आहे कैसें शून्य कैसें

१ विघड.

तें चैतन्य ॥ समाधान अन्य कवण तें ॥७॥ कवण जन्मला कवणा मृत्यू आला ॥ बद्ध मुक्त झाला कवण तो ॥८॥ कवण जाणता कवणाची सत्ता ॥ मोक्षही तत्वता कोण सांगा ॥ ९ ॥ सांगा आ-ह्मां खूण सगुण निर्गुण ॥ पंचवीस प्रश्न दास करी ॥ १० ॥

॥ अभंग ॥२॥ (उत्तर) नमो वेदमाता नमो त्या अनंता ॥ सांगों प्रश्न आतां श्रोतयांचे ॥ १ ॥ श्रोतयांचा प्रश्न जीव तो अज्ञान ॥ जया सर्व ज्ञान तोचि शिव ॥२॥ शिवा पर आत्मा त्या नाम परमा-त्मा ॥ बोलिजे अनात्मा अनिर्वाच्य ॥३॥ वाचा हा प्रपंच मायीक जाणावा ॥ घडी मोडी देवा पासोनियां ॥४॥विषय अविद्या त्याग तो सुविद्या ॥ निर्विकल्प आद्या स्वस्वरूप ॥५॥ कल्पना हे माया सत्व मूळमाया ॥ इशी चाळावया चैतन्य तें ॥ ६ ॥ नकारें तें शून्य व्यापक चैतन्य ॥ ईश्वर अनन्य समाधान ॥ ७ ॥ जीव हा जन्मला जिवा मृत्यू आला ॥ बद्धमुक्त झाला तोचि जिव ॥ ८ ॥ ईश्वर जाणता ईश्वराची सत्ता ॥ मोक्ष हा तत्वता ईश्वर ची ॥ ९ ॥ ईश्वर निर्गुण चेतवी सगुण ॥ हे चि ब्रह्मखूण दास ह्मणे ॥१०॥ दास ह्मणे सर्व मायेचें करणें ॥ रूप सर्व जाणे अनुभवी ॥ ११ ॥

॥ अभंग ॥१॥ ( प्रश्न ) संतसंगें तुज काय प्राप्त झालें ॥ सांग प वहिलें मज पाशीं ॥ १ ॥ मज पाशीं सांग कोण मंत्र तुज ॥ का आहे गुज अंतरींचें ॥ २ ॥ अंतरींचें गुज काय समाधान ॥ मं जप ध्यान कैसें आहे ॥ ३ ॥ कैसें आवाहन कैसें विसर्जन ॥ कै पिंडज्ञान सांगें मज ॥ ४ ॥ सांग मज कोण तुझी उपासना ॥ मु ते आसना सांगें मज ॥५॥ सांग पंचीकरण चित्तचतुष्टय ॥ कैसें अद्वय जीवशिव ॥ ६ ॥ जीवशिवऐक्य झालें कोणे रीती ॥ सां मज प्रती अष्ट देह ॥ ७ ॥ अष्टदेहापिंडब्रह्मांडरचना ॥ तत्वविवं ना सांगें मज ॥ ८ ॥ सांग मज भक्ती कैशी ते विरक्ती ॥ सायुज्

१ लौकर.

तामुक्ती कवण ते ॥ ९ ॥ कोणतें साधन कोण तें बंधन ॥ ऐसे केले प्रश्न रामदासें ॥ १० ॥

॥ अभंग ॥ २ ॥ ( उत्तर ) ॥ संतसंगें मज काय प्राप्त झालें ॥ सांगतों वहिलें तुज पाशीं ॥ १ ॥ मंत्र हा तारक रामनाम एक ॥ गूज हरादिक चिंतिताती ॥ २ ॥ ज्ञान समाधान सगुणाचें ध्यान ॥ निर्गुणीं अभिन्न आपणचि ॥ ३ ॥ दृश्य आवाहन दृश्य विसर्जन ॥ तेथें पिंडज्ञान आढळेना ॥ ४ ॥ उपासना हरी मुद्रा अगोचरी ॥ सिद्धासना वरी समाधान ॥ ५ ॥ पंचीकरण पिंडब्रह्मांड आवरण ॥ साक्षी तो आपण एकलाची ॥ ६ ॥ जीवशिवऐक्य झालें येणे रीतीं ॥ प्रकृतीच्या अंतीं द्वैत कैचें ॥ ७ ॥ अष्टदेह स्थूळ सूक्ष्म कारण ॥ चौथा देह जाण महाकारण ॥ ८ ॥ विराट हिरण्य आणि अव्याकृती ॥ आठवा प्रकृती मूळमाया ॥ ९ ॥ एकतत्व जाण त्याचें नांव भक्ती ॥ जाणावी विरक्ती संगत्याग ॥ १० ॥ सायुज्यतामुक्ती ते चि ते अचळ ॥ साधनाचें मूळ गुरुदास्य ॥ ११ ॥ गुरुदास्यें चुके संसारयातना ॥ जाणतील खुणा अनुभवी ॥ १२ ॥ अनुभवें वीग होय सर्वंशीण ॥ निरसले प्रश्न दास ह्मणे ॥ १३ ॥

॥ अभंग ॥ अहो सद्गुरूची कृपा ॥ तेणें दाखवी स्वरूपा ॥ १ ॥ तो हा गुरु परब्रह्म ॥ जेणें केलें स्वयें ब्रह्म ॥ २ ॥ धरा सद्गुरुचरण ॥ जेणें चुके जन्ममरण ॥ ३ ॥ अहो सद्गुरु तो चि देव दास ह्मणे धरा भाव ॥ ४

॥ अभंग ॥ २ ॥ शिरीं आहे रामराज ॥ औषधाचें कोण काज ॥ १ ॥ जो जो प्रयत्न रामावीण ॥ तो तो दुःखाशीं कारण ॥ २ ॥ शंकराचें हळाहळ[1] ॥ जेणें केलें सुशीतळ ॥ आह्मां तो चि तो रक्षिता ॥ रामदासीं नाहीं चिंता ॥ ४ ॥

॥ अभंग ॥ २ ॥ अंतरीं गुरुवचन ॥ बाह्य नापिका वपनें[2] ॥ १ ॥

---

१ विष. २ मुंडन.

अंतर्बाह्य शुद्ध झालों ॥ रामदर्शनें निवालों ॥ २ ॥ मन मुंडिल्या उन्मन झालें ॥ शिर मुंडिल्या काय केलें ॥ ३ ॥ दासें तीर्थविधि केला ॥ रामीं पिंड समर्पिला ॥ ४ ॥

अभंग ॥ १ ॥ माझे मनीं सर्व सुख व्हावें तुज ॥ ह्मणोनियां गूज सांगतसें ॥ सांगतसें हीत त्वां जिवीं धरावें ॥ भजन करावें राघवाचें ॥ २ ॥ राघवाचें प्रेम जें करी विश्राम ॥ येर सर्व श्रम जाण बापा ॥ ३ ॥ जाण बा वचन हें माझें प्रमाण ॥ वाहातसें आण राघवाची ॥ ४ ॥ राघवाची भक्ती ते माझी विश्रांती ॥ असों द्यावी चित्तीं दास ह्मणे ॥ ५ ॥

॥ अभंग ॥ २ ॥ ज्याचें नाम घेशी तें चि तूं आहेसी ॥ पाहें आपणासी शोधूनियां ॥ १ ॥ शोधितां शोधितां मीपण चि नाहीं ॥ मीपणाचें पाहीं मूळ बरें ॥ २ ॥ मूळ बरें पाहा नसोनियां राहा ॥ आहा तैसें आहा सर्वगत ॥ ३ ॥ सर्वगत आत्मा तो चि तो परमात्मा ॥ दास अहमात्मा सांगतसे ॥ ४ ॥

॥ अभंग ॥ जो कां भगवंताचा दास ॥ तेणें असावें उदास ॥ १ ॥ काय देतिल तें चि घ्यावें ॥ कोणा कांहीं न मागावें ॥ २ ॥ आशा कोणाची न करावी ॥ बुद्धि भगवंतीं लावावी ॥ ३ ॥ सदा श्रवणमननें ॥ आणि इंद्रियदमनें ॥ ४ ॥ नानापरी बोधुनि जीवा ॥ आपुला परमार्थ साधावा ॥ ५ ॥ रामदासीं पूर्ण काम ॥ बुद्धि दिली हे श्रीराम ॥ ६ ॥

॥ अभंग ॥ बोलवेना तें बोलावें ॥ चालवेना तेथें जावें ॥ १ ॥ नवल स्वरूपाच्या योगें ॥ जीवपणाचे वियोगें ॥ २ ॥ वाट नाहीं तेथें जावें ॥ जाणवेना तें जाणावें ॥ ३ ॥ नसोनियां भेटी घ्यावी ॥ तुटी असोनि पाडावी ॥ ४ ॥ रामदासीं दृढ बुद्धी ॥ होतां सहजसमाधि[१] ॥ ५ ॥

---

१ चित्ताची एकाग्रता.

॥ अभंग ॥ एक घाय दोन खंडें ॥ ऐसें बोलावें रोकडें ॥ १ ॥ जेणें उठती संशय ॥ तें बोलणें कामा नये ॥ २ ॥ बहुविधा झालें ठावें ॥ सत्य कोणी ही जाणावें ॥ ३ ॥ रामीरामदास ह्मणे ॥ एकनिश्चयें बोलणें ॥ ४ ॥

॥ अभंग ॥ तोंवरी तोंवरी डगमगीना कदा ॥ देहाची आपदा झाली नाहीं ॥ १ ॥ तोंवरी तोंवरी परमार्थ स्वयंभ ॥ जंव पोटीं लोभ आला नाहीं ॥ २ ॥ तोंवरी तोंवरी अखंत सद्भाव ॥ विशेषें वैभव आलें नाहीं ॥ ३ ॥ तोंवरी तोंवरी सांगे निरभिमान ॥ देहाशीं अपमान झाला नाहीं ॥ ४ ॥ तोंवरी तोंवरी धीरत्वाची मात ॥ प्रपंचीं आघात झाला नाहीं ॥ ५ ॥ रामदास ह्मणे अवघे ची गाबाळी ॥ ऐसा विरळा बळी धैर्यवंत ॥ ६ ॥

॥ श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसद्गुरुसीतारामचंद्राभ्यां नमः ॥ श्रीमत्सकलजगद्वंद्य जगदाधाराखिलजगन्मातिनियंतृजगान्निवासानुयायीममगुरुपरंपरादिगुरुश्रीसमर्थरामदाससेवाशीलसखारामगुरुकृपा, शिष्यास संप्रदायपद्धतीचें ज्ञान व्हावें ह्मणून, रामकृष्णाचे हातून लिहविते. या इच्छेनें चाफळ, सज्जनगड, कल्याण महाराजांचें स्थान डोमगावीं रामदाससांप्रदायिकांचे नित्य नैमित्तिकोपयोगीं कांहीं अप्रसिद्ध आणि प्रसिद्ध ग्रंथ रामदासकृत नित्यनैमित्तिकपद्धतिसोपानाच्या सर्वांनीं स्वीकार करून न्यूनातिरिक्तापराधाची क्षमा करावी, याविषयीं सज्जनांस विनयपूर्वक प्रणति ॥ श्रीरस्तु ॥ श्रीसमर्थ रामदास हे सूर्याजीपंत कुळकर्णी जांबेकर यांचे कनिष्ठ पुत्र, श्रीएकनाथाचे भाचे, शालिवाहन शके १५३० सालीं जगदुद्धारार्थ अवतीर्ण होऊन पुढें आठवे वर्षी विवाहांत सावधानशब्दाबरोबर वैराग्यधारण करून अंतःपटाचे आड्न पळून गेले. आणि मार्गांत सात दिवस झाडास उलटें टांगून घेऊन त्यांनीं श्रीमारुतीस फार करुणा भाकिली. नंतर त्यांनीं

दर्शन देऊन झाडाचें सोडून पंचवटीस साक्षात् श्रीरामदर्शन करविलें. ते वेळीं श्रीरामांनीं त्रयोदशाक्षरीमंत्राचा उपदेश करून कैकेयीनें दिलेलीं वल्कलें प्रसाद दिलीं. अंगावर प्रावरण, मस्तकीं धारण करण्यास कावेचा कांहीं भेद हुमुंजी रंगाचीं वस्त्रें, घेण्यास आज्ञा दिली. संकटीं सर्वविघ्नविवारण करणारी उपासना मारुति, शक्ति देणार जानकी देवी, मुख्य मठ अयोध्या, मुखीं नाम, चित्तीं राम, ह्या स्वरूपसंप्रदायानें हीं लक्षणें बाळगून वागावें, व आणखी कांहीं पृथ्वीप्रदक्षिणेच्या मार्गीं श्रीदत्तरूपें चिन्हें देऊं. अशी आज्ञा देऊन अंतर्धान पावले. नंतर समर्थांनीं टाकळीमुक्कामीं तेरा कोटी मंत्राचें महापुरश्चरण बारा वर्षांत करून विसावे वर्षीं ज्येष्ठ शिष्य उद्धव यास तेथें ठेवून मुख्य वल्कलें देऊन मारुतिसेवा सांगून आपण पृथ्वीप्रदक्षिणेस गेले. मार्गीं दत्तांनीं अखिलविघ्नें दूर होण्याकारितां मणका गलोल, तिरकमठा, भिक्षेस झोळी व उभ्यानें समाधि साधावा अशी युक्ती सांगून तदुपयोगीं कुबडी दिली व ब्रह्मचर्यास्तव मस्तकीं जटा, नखें, श्वेतवस्त्राचीं कौपीन, कटिसूत्र, गुरूस अर्पण केलेला देह, या लक्षणांनीं संपन्न, नैष्ठिकब्रह्मचर्याश्रम, यथाकाळीं द्वादश तिलक गोपिचंदन आणि भस्म, श्रीरामत्रयोदशाक्षरमुद्रा, तुलसीरुद्राक्षमालाधारण, केवळ वैदिक धर्मानें तंत्रमार्ग सोडून श्रीरामनवमी, एकादशी, शिवरात्र, कृष्णजन्माष्टमी, हनुमंतजयंती हीं व्रतें, सर्व कुलदेवतांचा मान, मंत्रास छंदऋषिन्यास नाहींत, केवळ वेदाध्यायविधीनें जप, अशा प्रकारें कर्मोपासनापूर्वक भक्ति, ज्ञानवैराग्य स्थापन करून उद्धव, कल्याण, भोळाराम, दिवाकर, भीम, शिवाजी, वासुदेवगोसावी, मुसळगोसावी, प्रभृति शिष्य. अक्का, वेणु, बहिणा, प्रभृति मंडळीस सन्मार्ग लागावा यास्तव बोधक ग्रंथ केले ते— १ दासबोध. २ सगुणध्यान. ३ निर्गुणध्यान. ४

मानसपूजा. ५ एकवीससमासी. ६ सप्तपंचचतुः. ७ आत्माराम. ८ पूर्वारंभ. ९ पंचमानें. १० जुनाटपुरुष. ११ गोसावी. १२ श्लोकबद्धरामायण. १३ करुणाष्टकें. १४ मनबोध. १५ अष्टकें. १६ षड्रिपु. १७ अंतरभाव. १८ भीमरूपी. १९ पदें, अभंग, जोहार वगैरे. २० नामावळ्या. २१ आर्त्या, २२ पाळणे. २३ स्फुटग्रंथ. असे असंख्य ग्रंथ केले. आणि नित्य पद्धति उत्साहपद्धति, चाफळमुक्कामीं श्रीराममूर्ति स्थापून चालू करून शिवाजीचे आग्रहास्तव सज्जनगडीं वास करून शके १६०३ दुर्मतिनाम संवत्सरीं माघवद्य नवमीस मध्यान्हकाळीं सगुणरूप भावुकांच्या चित्तांत ठेवून आपण सज्जनगडीं सिद्धिगत झाले. नंतर अक्कांनीं मठांत बंधूचे पुत्र स्थापून शिष्यपरंपरासंप्रदाय वृद्धिगत केला.



# विक्रीस तयार असलेलीं पुस्तकें.

श्रीहरिवरदा या नांवाची श्रीमद्भागवतदशमस्कंधावरील मराठी ओवीबद्ध टीका श्रीमत्कृष्णदयार्णवस्वामींनीं केलेली. किंमत २० रु. ट. हा. ३ रु.

मोरोपंती भारताचीं अठरा पर्वें ( तीन भागांमध्येंनवनीताप्रमाणें बांधलेलीं ) कि. ५॥ रु. ट. ख. ९ आणे.

उद्धवसुतकृत रामदासस्वामाचें चरित्र( रामदासी कीर्तनसंग्रह )नवनीतासारखेंच बांधलेलें. पृष्ठसंख्या ५७५. किंमत १॥ रु. ट. ख. ३ आणे.

आत्मारामबोवाकृत रामदास स्वामींचें चरित्र, ओवीबद्ध पृष्ठसंख्या ४५०. किं, १। रु. ट. ख. २॥ आणे.

लघुबोध किं. १ आणा. ट. ख. अर्धा आणा.

श्रीसमर्थरामदासकृत जुना दासबोध. पृष्ठसंख्या ९२ किं. ६ आणे. ट. ख. ०॥ आणा.

श्रीसमर्थरामदासकृत नित्यनैमित्तिक. किं. १२ आणे. पृष्ठसंख्या १६०. ट. ख. १ आणा.

बाबाजी अनंत प्रभु तेंडुलकर,

" श्रीहरिवरदा " प्रिंटिंगप्रेसचे मालक.

गणेशरामजिची वाडी.–गिरगांव मुंबई.

# षड्रिपुविवेचनम्.



## अथ कामनिरूपणम्.

( अनुष्टुप्छंद. )

भल्यासीं वैर करिती ते सा ही वोळखा बरें ॥
षड्रिपू कामक्रोधादि मद मत्सर दंभ तो ॥ १ ॥
प्रपंच साहावा वैरी तयांना जिंकितां बरें ॥
भल्यासि लाविती वेडा परत्रमार्ग रोधिला ॥ २ ॥
काम आरंभिचा वैरी निष्काम बुडवी सदा ॥
कामना लागली पाठी काम काम करी जनीं ॥ ३ ॥
काम उपन्न होताहे ते वेळे नावरे जना ॥
कामवेड जडे ज्याला तो प्राणी आत्मघातकी ॥ ४ ॥
कित्येक योषिते साठीं कां तरी मृत्यु पावले ॥
झडा च घालिती नेटें पतंगा परि भस्मती ॥ ५ ॥
आपणा राखणें नाहीं शुद्धि नाहीं ह्मणोनियां ॥
सभाग्य करंटे होती वेश्येसी द्रव्य नासिती ॥ ६ ॥
कित्येक भोरपी झाले किती गेले उठोनियां ॥
बाटले भ्रष्टले मेले बुडाले कामसेवनीं ॥ ७ ॥
व्याधीनें नासती अंगें नासिकें झडती जनीं ॥
औषधें दंत ही जाती रूपहानि हि होतसे ॥ ८ ॥

---

१ परलोकाचा मार्ग.

रूपहानी शक्तिहानि द्रव्यहानि परोपरी ॥
कुळहानी यातिहानी सर्व हानि च होतसे ॥ ९ ॥
कित्येक नासिले भोगें लोकलाज चि सांडिली ॥
शुभाशुभ नसे तेथें नीचासीं उंच भ्रष्टती ॥ १० ॥
कामाचे व्यसनें गेले मातले रतले जनीं ॥
तारुण्य दों दिसां साठीं जन्म दुर्लभ नासिला ॥ ११ ॥
विधीनें विषयां घ्यावें अविधी नसतां बरें ॥
आश्रमीं न्यायनीतीनें प्रपंच करणें सुखें ॥ १२ ॥
लटके नासती काया चेटकें तीं परोपरी ॥
जारणामारणादीकें नाटकें चेटकें बहु ॥ १३ ॥
चेटका देवतें भूतें जन्महानि च होतसे ॥
ह्मणोनि काम हा वैरी आकळावा परोपरी ॥ १४ ॥
ऐसा निरूपिला काम क्रोध तो बोलिला पुढें ॥
कोप तो तामसी प्राणी तमोगुणें अधोगति ॥ १५ ॥
इतिश्री काम हा वैरी जेणें पाडियलें भवीं ॥
तो राही सकळां ठायीं विवेकें जाणिजे बरें॥ १६ ॥

॥ इति कामनिरूपणं समाप्तम् ॥ १ ॥

---

## अथ कोपनिरूपणम्.

कोप आरोपणा खोटी कोपें कोप चि वाढतो ॥
मोडतो मार्ग न्यायाचा अन्याय प्रबळे बळें ॥ १ ॥

---

१ शास्त्रमर्यादा न सोडितां.

क्रोध हा खेद संपादी जेथें तेथें चहूं कडे ॥
विवेक पाहतां कैंचा शुद्धि तेथें असे चि ना ॥ २ ॥
भ्रुकुटी कुटिला गांठी काळिमा वदनीं चढे ॥
कुर्कुरी बुर्बुरी रागें हस्तपाय च चोळितो ॥ ३ ॥
कुशब्द वोखटे काढी त्रासकें वचनें वदे ।
घेतसे बाळटें[1] ढाळें उणें काढी परोपरी ॥ ४ ॥
बोलतां हिसळे थुंका तांये ताये उसाळतो ॥
तांबडे जाहले डोळे रागें[2] राग च फुगला ॥ ५ ॥
शिरा कंठललाटींच्याफुगल्या घाम चालिला ॥
थरथरां कांपतो रागें रूपें भूत चि जाहला ॥ ६ ॥
धर्ते लोकांसि झिंजाडी सातां पांचासि नावरे ॥
कुस्ती लिथाडि पछाड्या[3] मारामारी धबाधबी ॥ ७ ॥
सुटलीं फिटलीं वस्त्रें नागवे दिसती जना ॥
लाज ते अंतरीं नाहीं गांधलें नीट धांवती ॥ ८ ॥
अनर्थ मांडला मोठा लाथा बुक्या चपेटिका ॥
कोपरें मारिति शिरीं काष्ठ पाषाणअंगळा ॥ ९ ॥
मुसळें मारिती काठ्या खिळी डांगा च ढेंकळें ॥
डसती झोंबती अंगा निकुरें लाविती कळा ॥ १० ॥
एकांहीं धरिल्या शेंड्या वृषणीं लाविती कळा ॥
पाडिले दांत भोकाडें मस्तकें फोडिलीं बळें ॥ ११ ॥

## ओवी

ताडिले पाडिले पडले रक्तबंबाळ जाहले ॥

---

१ भळते दोष. २ रागाच्या आवेशानें. ३ मागें लोटी.

घरचीं मारिती हांका हांका बोंबा परोपरी ॥ १२ ॥
दिवाणा माजि ते नेले मारिले दंड पावले ॥
क्रोधें करंटे ते केले क्रोध चांडाळ जाणिजे ॥ १३ ॥
भल्यानें कोप सांडावा शांतीनें असतां बरें ॥
क्षुल्लकें कोप पाळावा भल्याचें काम तों नव्हे ॥ १४ ॥
इतिश्री क्रोध रिपू । जेणें बहुत जाला दर्पू ॥
त्याचीं लक्षणें अमूपू । निरूपिलीं साक्षेपें ॥ १५ ॥

॥ इति क्रोधनिरूपणं समाप्तम् ॥ २ ॥

## अथ मदनिरूपणम्.

क्रोध तो बोलिला मागें मद तो आइका पुढें ॥
मदाचीं गुप्त ही कामें अंतरींचा कळे चि ना ॥ १ ॥
मद हा वोखटा मोठा मद हा खेदकारक ॥
मदानें पद लाधेना मद शोध करी भला ॥ २ ॥
देहाचा मद शक्तीचा द्रव्याचा मद अंतरीं ॥
विद्येचा मद राज्याचा मद रूप बहु विधा ॥ ३ ॥
मदानें थोंकली[1] विद्या पुढें आणीक होइ ना ॥
सर्वां माने मना ये ना आपुले होरटी कडे ॥ ४ ॥
कळे ना सृष्टि देवाची बहुरत्ना वसुंधरा ॥
मदाला नावडे कांहीं सर्व ही तुच्छ होतसे ॥ ५ ॥
मदानें भुलला प्राणी विचारें उमजे चि ना ॥
पराचें सत्य मानीना विवरेना कदापिही ॥ ६ ॥

१ बंद झाली.

वेदशास्त्रादि हो चर्चा नीति हो न्याय हो नव्हे ॥
आपणा पाहणें नाहीं विरंचीं बोलिला तरी ॥ ७ ॥
इतरा कोण तो लेखा संत साधू महंत हो ॥
आपणें न्याय केला तो आपुलें बोलणें बरें ॥ ८ ॥
चालणें थोर तें माझें माझा मी च बहू भला ॥
न्यायाची गोष्टि माने ना नीतीनें कोप येतसे ॥ ९ ॥
आपणा परतें नाहीं सर्व कांहीं भुमंडळीं ॥
गुणग्राहकता नाहीं परावें तुच्छ होतसे ॥ १० ॥
कैसेनीं उमजावा तो हेंकाड आंधळें गुरूं ॥
दिसे ना नाकळे कांहीं वळितां न वळे कदा ॥ ११ ॥
ऐशाचा संग तो खोटा हित तेथें असे चि ना ॥
स्वहीत आपुलें नाहीं परहीत कसें घडे ॥ १२ ॥
थोर आयुष्य मोलाचें मदें व्यर्थ चि नाशिलें ॥
पापी हा उमजों नेदी शेवटीं दूर होतसे ॥ १३ ॥
मरतां मद काशाचा पुसे कोण तया मदा ॥
पूर्वीं च कळला नाहीं तऱ्हेनें जन्म नाशिला ॥ १४ ॥
देह ही बळ ही गेलें द्रव्य गेलें वृथा चि तें ॥
डंब गेलें स्तोंब गेलें एकला जातसे खळ ॥ १५ ॥

## ओवी

इति श्रीमदरिपू । जेणें वाढविला भवरिपू ॥
तो हा टाकितां साक्षेपू । समाधान पावाल ॥ १६ ॥

॥ इति मदनिरूपणं समाप्तम् ॥ ३ ॥

---

१ ब्रह्मदेव. २ अवडंबर.

## अथ मत्सरनिरूपणम्.

मद तो तिसरा शत्रु चौथा मत्सर आयका ॥
मत्सरें सत्य मानेना सत्याचें लटकें करी ॥ १ ॥
बऱ्याचें वोखटें सांगे मज नाहीं ह्मणोनियां ॥
पैशून्य[1] नसतें काढी नसता कुंदे[2] लावणें ॥ २ ॥
नस्ते नस्ते ढाल[3] घेणें ऐसी हे जाति मत्सरी ॥
स्वयें आहे करंटा ही समर्था निंदितो सदा ॥ ३ ॥
टोणपा आपण असे सर्वज्ञा न मनी कदा ॥
आपणू घातकी आहे पुण्यवंता पडे चि ना ॥ ४ ॥
कुकर्मी आपण प्राणी सत्कर्मोच्छेदि तो सदा ॥
आपणू चोरटा आहे सकळां चोरटें करी ॥ ५ ॥
आपण भ्रष्टला आहे भल्याला भ्रष्ट भावितो ॥
आपणू घातकी मोठा पराला घातकी ह्मणे ॥ ६ ॥
पोटींचा कपटी मोठा जनाला कपटी ह्मणे ॥
आपणा भक्ति ठाके ना हरिभक्ति उछेदितो ॥ ७ ॥
आपणू नीच कूळींचा कुळवंत मना न ये ॥
आमणू ठायिंचा लंडी रणशूरासि हांसतो ॥ ८ ॥
आपण भ्याड ठायींचा धारिष्टा कर्कशू ह्मणे ॥
आपणू वोंगळू आहे निर्मळा कर्दमू ह्मणे ॥ ९ ॥
आपणू लालुची मोठा वैराग्याची उडावणी ॥
करवे ना देखवे ना ऐसा तो मत्सरू नरू ॥ १० ॥
आपुलें कर्म भोगीतो पराला कर्म लावितो ॥

---

१ वृथा दोष काढणें. २ दुर्दशा ३ दोषारोप.

जें कांहीं आपणा नाहीं तें सर्व उडवीतसे ॥ ११ ॥
भांडे तोंड चि तें वेडें भकाट्या करितो जनीं ॥
अखंड सुजना भांडे तंडे तंडे उदंडसा ॥ १२ ॥
धीट तोंडाळ तो प्राणी कांहीं केल्या विटे चि ना ॥
लंड तो कोटिगा मोठा लाज त्याला असे चि ना ॥ १३ ॥
मत्सरें भाग्य ही गेलें मत्सरें बुद्धि नासली ॥
भक्ति ना ज्ञान ना कांहीं अन्न ना पर ही नसे ॥ १४ ॥
पाहतां सख्य तों नाहीं लोधलों ताड उद्धटू ॥
मत्सरें लाविलें वेडा ज्याचें त्याला कळे चि ना ॥ १५ ॥

## ओवी.

इतिश्री मत्सररिपू । जाणिजे हा अमूपू ॥
जेणें वेढिला भवसंकल्पू । दुःखसागर ॥ १६ ॥
॥ इति मत्सरनिरूपणं समाप्तम् ॥ ४ ॥

## अथ दंभनिरूपणम्.

दंभ हा पांचवा जाणा महाशत्रु कळे चि ना ॥
या लागीं भांडणें लोका एकमेका पडे चि ना ॥ १ ॥
दंभ दंभा बरा वाटे या लागीं लोक भांडती ॥
भांडती मरती जाती दंभा लागीं निघोनियां ॥ २ ॥
सकळां पाहिजे दंभ परंतु मिळतो कसा ॥
या लागीं चुर्मुरीताती बुडाले दुःखसागरीं ॥ ३ ॥
स्वार्थ हा व्यर्थ जाणावा परंतु जन आंधळे ॥
दंभानें आंधळे केले ऐसा हा दंभ तस्करू ॥ ४ ॥

---

१ लोभयुक्त झाला.

शरीर मुख्य जायाचें दंभाची कोण ते कथा ॥
शब्द ची उमजे ना कीं वैर साधी परोपरी ॥ ५ ॥
देहाचा दंभ तो खोटा परंतु आवडे जना ॥
विवेक पाहतां नाहीं दुःखी होती ह्मणोनियां ॥ ६ ॥
ज्ञातया दंभ बाधे ना एकाएकीं खडोखडी ॥
उठोनि चालिला योगी दंभ ते कुतरे किती ॥ ७ ॥
वैराग्य पाहिजे अंगीं उदास फिरती लिळा ॥
दंभ उड्डाण तें नेटें लोलंगता चि खुंटली ॥ ८ ॥
निश्चया दंभ बाधी ना निश्चयो पाहिजे बरा ॥
अंतरें अंतरा भेदी तेथें दंभ चि नाढळे ॥ ९ ॥
दंभ तो चोर जायाचा लालची करिती मुंढें ॥
शेवटीं सर्व ही जातें प्रेत होतें भुमंडळीं ॥ १० ॥
मढ्याला कासया व्हावें जाणावें पहिलें चि हो ॥
लावावें कारणीं देहें दंभ कैंचा उरेल तो ॥ ११ ॥
अखंड आठवा राम रामाचें ध्यान अंतरीं ॥
तेव्हां वैराग्य चि उठे दंभ लुंठे परोपरी ॥ १२ ॥
मांसाचा मोधळा याचा दंभ तो कोण तो किती ॥
सावधा दंभ बाधी ना दुश्चिताला पछाडितो ॥ १३ ॥
नेणतां चोरटें येतें जाणतां पळतें बरें ॥
शून्या च सारिखें जाणा तें कायसें तरी मढें ॥ १४ ॥
विवेकी धन्य तो राजा वैराग्य बळ आगळें ॥
भक्तीनें वोळला साधू दंभ तेथें दिसे चि ना ॥ १५ ॥

---

१ मूर्ख लोक.

## ओवी

इतिश्री दंभरिपू ॥ जेणें वाढविला भवसंकल्पू ॥
तयाचें निर्दळण करी जो साक्षेपू ॥ तो चि धन्य ॥ १६ ॥

॥ इति दंभनिरूपणम् ॥ ९ ॥

---

## अथ प्रपंचनिरूपणम्.

प्रपंच हा महा वैरी परत्र अंतरीं दुरीं ॥
अवघा तो चि तो जाला तेणें देव दुरावला ॥ १ ॥
पदार्थीं बैसली बुद्धि शुद्धि नाहीं परात्रिंची ॥
प्रपंच शेवटीं कैंचा गेल्या हा देह हातिंचा ॥ २ ॥
देव तो राहिला दूरीं ऐसा वैरी प्रपंच हा ॥
बाळत्वीं छंद मायेचा खेळतां राहिला दुरी ॥ ३ ॥
लागला छंद पोरांचा क्षणक्षण चुकावितो ॥
सांगते माय माने ना लिही ना ना घरीं असे ॥ ४ ॥
हाणिती मारिती पोरें रडतो पडतो बहु ॥
सोशितो आपुल्या जीवें खेळा साठीं गुलां कडे ॥ ५ ॥
कांहींसा शाहणा झाला शिकविला परोपरी ॥
लोभानें लग्न हीं केलें वोढला सासऱ्या कडे ॥ ६ ॥
नोवरी आवडे जीवीं नटावेंसें मनीं उठे ॥
तारुण्य बाणतां अंगीं कामलोभें चि भूलला ॥ ७ ॥
खेळ तो राहिला मागें काम तो पडिला पुढें ॥
मोहिला शक्तिनें प्राणी तिज वांचोनि नावडे ॥ ८ ॥

---

१ परलोकचो.

उदंड जाहलीं पोरें खर्च तो वाढला पुढें ॥
उद्वेग लागला जीवा मेळवीतां मिळे चि ना ॥ ९ ॥
उदंड करंटा जाला हिंडे चहुं कडे फिरे ॥
प्रीति ते राहिली मागें अशक्त जाहला बहु ॥ १० ॥
फिटे ना ऋण तें वाढे ताडातोडी चहूं कडे ॥
मिळे ना अन्न ना वस्त्र वार्धक्यें खंगला बहु ॥ ११ ॥
कष्टला शेवटीं मेला गेला प्रापंच हातिंचा ॥
घातला मागुती जन्म ऐसा वैरी प्रपंच हा ॥ १२ ॥
जन्मासि घातलें देवें काय येऊनि साधिलें ॥
भुलले चुकले देवा प्रपंच घातकी पहा ॥ १३ ॥
आधीं च सर्व जाणावें काय येतें समागमें ॥
निर्वाणीं अंतिचा देवो कोणी एकें चुकों न ये ॥ १४ ॥
घर गांव स्थान माझें वाडे शेत मळे गुरें ॥
पुत्र कन्या बंधु माझे सर्व सांडोनि चालिला ॥ १५ ॥
माझें माझें ह्मणे वेडा स्वार्थबुद्धि बहूत ची ॥
सर्व सांडोनि गेला रे एकाएकीं उठोनियां ॥ १६ ॥
प्रपंचीं भुलला प्राणी व्यर्थ आयुष्य वेंचलें ॥
देव ना धर्म ना कांहीं ऐसा हा साहवा रिपु ॥ १७ ॥
प्रपंचा कारणें कष्टी सर्वस्वें वेंचला जिवें ।
कांहीं च वेंचिलें नाहीं शेवटीं हात झाडिला ॥ १८ ॥
अपेशी सर्वदा जाला मायाजाळें चि भूलला ॥
आपुलें मानिलें जें जें तें तें सर्वत्र राहिलें ॥ १९ ॥

---

१ धर्म केला.

जाहला खोत पापाचा सर्वांचें पाप घेतलें ।
यातना भोगणें लागे चुकला शाहणा कसा ॥ २० ॥
आधीं च जाणिजे सर्व विवेकी त्यास बोलिजे ॥
प्रपंच लाथिला[1] बा रे वैरी हा सोडिला कसा ॥ २१ ॥
सर्वांसी योग साधे ना पुण्य ऊदंड पाहिजे ।
सहस्रां माजि तो एक ज्ञानवैराग्यनेटका[2] ॥ २२ ॥
षड्रिपू जिंकिले जेणें तो चि ज्ञानी महाभला ॥
दीक्षेनें उद्धरी लोकां वैरागी तो उदासिनु ॥ २३ ॥

## ओवी

इतिश्री प्रपंचरिपू । जेणें वाढविला भवसंकल्पू ॥
जाणिजे हा अमूपू । दुःखसागर ॥ २४ ॥

इति प्रपंचनिरूपणम्.

---

# भीमरूपिस्तोत्रें.

## श्लोक

जनीं ते अंजनी माता । जन्मली ईश्वरी तनु ॥
तमू मनू तो पवनू । एक ची पाहतां दिसे ॥ १ ॥
त्रैलोक्यीं पाहतां बाळें । ऐसें तों पाहतां नसे ॥
अतूल तुलना नाहीं । मारुती वात-नंदनू ॥ २ ॥
चळे तें चंचळे नेटें । बाळ मोवाळ[3] साजिरें ॥
चळताहे चळवळी । बाळ लोवाळ गोजिरें ॥ ३ ॥

---

१ लाथेनें उडविला. २ ज्ञानानें व वैराग्यानें शुद्ध. ३ मृदु.

हात कीं पाय कीं सांगों । नखें बोटें परोपरी ॥
दृष्टिचें देखणें मोठें । लांगूळ लळूलळीतसे ॥ ४ ॥
खडी खाडी दडे तैसा । पीळ पेंच परोपरी ॥
उड्डाण पाहतां मोठें । झेंपावे रवि-मंडळा ॥ ५ ॥
बाळानें गिळिला बाळू । स्वभावें खेळतां पहा ॥
आरक्त पीत वाटोळें । देखिलें धरणी वरी ॥ ६ ॥
पूर्वेसि देखतां तेथें । उडालें पावलें बळें ॥
पाहिलें देखिलें हातीं । गिळिलें जाळिलें बहू ॥ ७ ॥
थुंकोनी टाकितां तेथें । युद्ध जालें परोपरी ॥
उपरी ताडिला तेणें । एक नाम चि पावला ॥ ८ ॥
हा गिरी तो गिरी पाहे । गुप्त राहे तरूवरीं ॥
मागुता प्रकटे धांवे । झेंपावे गगनोदरीं ॥ ९ ॥
पळ ही राहि ना कोठें । बळें ची घालितो झडा ॥
कडाडां मोडती झाडें । वाडवांडें उलंडती ॥ १० ॥
पवना सारिखा धांवे । वावरे विवरें बहू ॥
अपूर्व बाळ-लीला हे । रामदास्य करी पुढें ॥ ११ ॥

इति भीमरूपिस्तोत्र संपूर्ण ॥ १ ॥

---

कोपला रुद्र जे काळीं । ते काळीं पाहवे चि ना ॥
बोलणें चालणें कैंचें । ब्रह्म-कल्पांत मांडला ॥ १ ॥
ब्रह्मांडा हून जो मोठा । स्थूळ उंच भयानकू ॥
पुच्छ तें मुर्डिलें माथां । पाऊल शून्य-मंडळा ॥ २ ॥

---

१ मोठ. मोठी.

त्या हून उंच वज्राचा । सव्यं[1] बाहो उभारिला ॥
त्यापुढें दूसरा कैंचा । अद्भूत तुळना नसे ॥ ३ ॥
मार्तंड-मंडळा ऐसे । दोन्ही पिंगाक्ष ताविले ॥
कर्करा घर्डिल्या दाढा । उभे रोमांच ऊठिले ॥ ४ ॥
अद्भूत गर्जना केली । मेघ चीं वोळले भुमी ॥
तुटले गिरिचे गाभे । फुटले सिंधु आटले ॥ ५ ॥
अद्भूत वेश आवेशें । कोपला रण-कर्कशू ॥
धर्म-संस्थापने साठीं । दास तो ऊठिला बळें ॥ ६ ॥

इति भीमरूपी-स्तोत्र संपूर्ण.

---

अंजनी-सुत प्रचंड । वज्रपुच्छ कालदंड ॥
शक्ति पाहतां वितंड । दैत्य मारिले उदंड ॥ १ ॥
धगधगी तसी कळा वितंड शक्ति चंचळा ॥
चळचळीतसे लिळा । प्रचंड भीम आगळा ॥ २ ॥
उदंड वाढला असे । विराट धाकुटा दिसे ॥
त्यजून सूर्य-मंडळा । नभांत भीम आगळा ॥ ३ ॥
लुलीत बाळकी लिळा । गिळोनि सूर्य-मंडळा ॥
बहूत पोळतां क्षणीं । थुंकिला ततक्षणीं ॥ ४ ॥
धगधगीत बूबुळा । प्रतक्ष सूर्य-मंडळा ॥
कराळकाळमूख तो । रिपूकुळासि दुःख तो ॥ ५ ॥
रुपें कपी अचाट हा । सुवर्ण कट्ट कासतो ॥
फिरे उदास दास तो । खळास काळ भासतो ॥ ६ ॥

---

१ डावा.

